**—. s Moral and Interesting Book Series.**

No. V

# PRANAYI MÁDHAVA.

*Translated from Sanskrit*

by

**PANDIT VAMAN SHÁSTRI ISLÁMPURKAR,**

AND PUBLISHED BY

**WASUDEV MORESHVAR POTDAR.**

*New Edition.*

**Bombay:**

PRINTED AT THE JOINT-STOCK PRESS.

1889.

*Price One Rupee.*

पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला.

नंबर ५.

# प्रणयिमाधव.

हें पुस्तक संस्कृत ग्रंथाच्या आधारें

**पंडित वामन शास्त्री इसलामपूरकर**

यांणीं मराठींत तयार केलें.

बहिः सर्वाकारप्रगुणरमणीयं व्यवहरन्
पराभ्यूहस्थानान्यपि तनुतराणि स्थगयति ।
जनं विद्वानेकः कपटमभिसन्धाय सकलम्
तटस्थः स्वानर्थान् घटयति च मौनं च भजते ॥

**वासुदेव मोरेश्वर पोतदार**

यांणीं

मुंबईंत

"धी जॉइंट-स्टॉक" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

सन १८८९.

किंमत १ रुपया.

**RÁO BAHADOOR A. SHRINIVÁSRÁO B. A.,**

*(CHIEF-JUSTICE OF GWALIOR STATE.)*

THIS WORK

IS

# DEDICATED

AS A TOKEN OF WARM FRIENDSHIP AND

IN ADMIRATION OF HIS KEEN PER-

CEPTION AND UPRIGHTNESS,

BY HIS FRIEND,

THE AUTHOR.





हें पुस्तक प्रसिद्ध महाकवि **श्रीभवभूति** याच्या **मालतीमाधव** नांवाच्या ग्रंथाच्या आधारानें लिहिलें आहे. **मालतीमाधव** याचीं जीं लक्षणें आहेत, त्यांवरून या पुस्तकाची प्राचीन ग्रंथकारांनीं **दृश्य-**काव्याच्या प्रकरण नामक भेदांत गणना केली आहे. प्रकरणाच्या लक्षणांवरून त्यांतलें संविधानक स्वकपोल-कल्पित असावें असें कित्येकांचें मत आहे; पण ती चूक आहे. कारण साहित्यशास्त्रकर्त्यांनीं प्रकरणाचें जें लक्षण वर्णन केलें आहे, त्यावरून प्राचीन भारतादि इतिहास व पुराणें यांत जी कथा वर्णन केलेली नाहीं, अशी कोणती तरी लौकिक ह्मणजे पुराणप्रसिद्ध नस-लेली कथा घेऊन तिचें संविधानक रचून जो ग्रंथ तयार केला असेल, त्याला प्रकरण ह्मणावें असें सिद्ध होतें. प्रकृत ग्रंथांत—**मालती, माधव, मकरंद** इत्यादि पात्रें केवळ कवीनें कल्पिलेलीं असावीं असें वाटतें. कारण, **मालती** शब्द मोगरीच्या वेलीचा वाचक आहे. **माधव** ह्मणजे वसंतऋतु अथवा वैशाख मास, **मकरंद** ह्मणजे पुष्पाचा रस, असें आहे तरी इतर पात्रांचीं नांवें या प्रमाणेंच कल्पित मानतां येणार नाहींत. व जर कवि-कल्पित संविधानक असेल तर सर्वच पात्रें कल्पित घाल-ण्यांत **भवभूती**सारख्या निपुण कवीला कांहीं कठीण पडलें असतें कीं काय ? या शंकेचें समाधान होत नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, या ग्रंथांतील संविधानक पुराणादि

प्राचीन ऐतिहासिक ग्रंथांतील घेतलेलें नसून तें लौकिक ह्मणजे—त्या ग्रंथांत वर्णन केलेलें नाहीं तरी खरोखर झालेलें, असें वृत्त घेऊन मूळ ग्रंथ तयार केला आहे, यांत कांहीं संशय नाहीं.

भवभूतीची करुणरस वर्णन करण्याच्या संबंधानें मोठी ख्याति आहे. त्याप्रमाणें या ग्रंथांत जेथें जेथें तो प्रसंग आला आहे, तेथें तेथें तो रस उत्तम प्रकारें साधला आहे. शाकुंतलादि ग्रंथ फार उत्तम मानिले आहेत, तरी त्यांत सर्व रसांचा समावेश झाल्याचें दिसून येत नाहीं. पण या ग्रंथांत बीभत्स, रौद्र इत्यादि जे रस साधणें कठीण ते देखील उत्तम प्रकारें साधले आहेत. एकंदरींत श्रृंगारादि आठही रस यथायोग्यस्थळीं कवीनें यांत साधले आहेत.

यांतली नायिका **मालती** ही एका कुलीन गृहस्थाची मुलगी असून तिचें **माधवा**वर मन बसलें होतें; तथापि त्याच्याशीं आपला विवाह होण्याचा योग येईल असें तिला वाटत नव्हतें. आईबापांची मनापासून त्या कामीं संमती होती, तरी बापाचा यजमान राजा **चित्रसेन** याणें ती आपल्या खुषमस्कऱ्याला द्यायची असें ठरविलें होतें. **मालती**, माधवाची प्राप्ति न झाली, तर प्राण देखील ठेवायचा नाहीं असा निश्चय करून बसली होती. तरी चोरुनमारून बापाच्या संमतीवांचून आपला हेतु पूर्ण करून घेण्याविषयीं ती मुळींच तयार नव्हती. कुलीन सद्वर्तनी कन्या कशी असते व तिचें आचरण कसें असतें, हें ज्याला पहायाचें असेल त्यानें या ग्रंथाची नायिका **मालती** हिचें वर्तन पहावें.

**कामंदकी**सारखी युक्तीनें मन वळविण्याच्या कामांत

चतुर असूनही तिला मालतीचें मन—बापाला न कळत विवाह करून घेण्याच्या कामीं अनुकूल करून घेण्याविषयीं किती प्रयास पडले, व तिनें कांहींतरी निमित्त करून मालतीकडून तसें कबूल करून घेण्याविषयीं प्रयत्न केले असतां त्यावर तिणें कशीं उत्तरें दिलीं, ह्या गोष्टी विशेष ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. सारांश, आईबापांच्या इच्छेविरुद्ध एक पाऊल देखील टाकण्यास तयार न होणारी व कितीही असह्य दुःख झालें तरी तें सहन करणारी अशी एक हीच नायिका होय. हिला दुसरी उपमाच नाहीं. आह्मीं सांप्रत उपलब्ध असलेलीं संस्कृत भाषेंतील सर्व नाटकें वाचलीं आहेत; पण त्यांत मालतीला उपमा देण्यासारखी एकही नायिका आढळली नाहीं. कुलीन, सद्वर्तनी, परम चतुर व आईबापांविषयीं प्रेमळ असून त्यांच्या वचनांत वागणारी व अत्यंत सोशीक अशा मुलीचें उदाहरण घ्यावयाचें असेल तर या ग्रंथाची नायिका मालती हिचेंच घ्यावें. व सांप्रत स्त्रीशिक्षण स्त्रीशिक्षण ह्मणून डांगोरा पिटून स्त्रियांना सुधारण्याची इच्छा करणाऱ्या लोकांनीं व मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या हातांत हात मिळवून सुशिक्षित ह्मणविणाऱ्या टारग्या पोरींनीं आमच्या या मालतीच्या वर्तनाचा कित्ता गिरवून मर्यादशीलता वगैरे गुण संपादन करून आपलें वर्तन सुधारावें, अशी आमची त्यांस शिफारस आहे.

या ग्रंथांत मुळापासून शेवटपर्यंत कारस्थानें व मसलती पुष्कळ भरल्या आहेत. राजकीय प्रकरणाशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध नाहीं, तरी परंपरेनें संबंध जडलेला

आहे. पौराणकाळानंतरच्या या देशांतल्या रीतिभाती कशा होत्या, त्यांचेंही यांत यथायोग्य वर्णन केलें आहे. लग्नाच्यापूर्वीं मुलीची स्थिति कशी असते व ग्रामदेवता इत्यादिकांची लग्नाच्या वेळीं पूजा करणें इत्यादि आचार त्या वेळींही होते असें उघड दिसतें. स्त्रीशिक्षणाचा मोठा प्रसार होता; मोठमोठ्या पाठशाळा होत्या; त्यांत स्त्रिया आणि पुरुष एके ठिकाणीं राहून विद्याभ्यास करीत असत, हें यावरून व्यक्त होतें. ब्राह्मणासारख्या उंच वर्णाच्या मुलींचे विवाह प्रौढपणीं होत असत, हेंही यावरून सिद्ध होतें.

धर्मसंबंधानें पाहिलें तर या वेळीं बौद्धधर्माचा सर्वत्र प्रसार होता, तरी वैदिकधर्मी लोक त्यांचा द्वेष करीत नव्हते असें दिसतें. कारण, आह्मीं केलेल्या "**चारुदत्त आणि वसंतसेना**" या ग्रंथांत बौद्धभिक्षु झालेला **संवाहक** समोर दृष्टीस पडला तेव्हां **चारुदत्ता**सारख्या समदर्शी गृहस्थानें देखील तो अपशकून मानला. तसेंच "**आर्यचाणक्य**" या ग्रंथांत **सिद्धार्थका**ला सकाळींच **जीवसिद्धि** नांवाच्या जतीचें दर्शन झालें, तें त्यानें मोठें अपवित्र मानलें, पण येथें विवाहासारख्या मंगलकार्यांत बौद्धभिक्षुकी झालेल्या **कामंदकी**ला फिरण्यास मोकळीक होती, इतकेंच नव्हतें तर ती नवऱ्यामुलींच्या अगदीं बरोबर होती; तरी तिच्याविषयीं कोणी तिरस्कार प्रदर्शित केला नाहीं. व जे बौद्ध लोक वैदिकधर्मी लोकांच्या देवळाचें देखील दर्शन घ्यावयाचे नाहींत त्यांतलीच **कामंदकी** खुशाल **महादेवाच्या** देवळांत गेली, इतकेंच नव्हे तर **मालती**कडून त्याची पूजा देखील तिणें करविली. यावरून वैदिक

फार बदलली होती, यांत कांहीं संशय नाहीं. बौद्धांनीं ज्या धर्मतत्वाला मुख्य मानून त्याचा सर्वत्र प्रसार केला व प्राणिहिंसा करणाऱ्या वैदिकधर्माला लाजवून—त्यांची हिंसारूप यज्ञयागांची प्रवृत्ति शिथिल केली, तें तत्व या वेळीं बौद्धधर्मांत राहिलें नव्हतें. ते लोक मंत्रतंत्रादिकांच्या खटपटींत पडून जारणमारणादि भयंकर कर्में करीत होते असें दिसतें.

याशिवाय प्राचीन काळच्या स्थितीच्या संबंधानें या ग्रंथांत ठिकठिकाणीं पुष्कळ माहिती मिळते; पण ती सर्व या लहानशा प्रस्तावनेंत दर्शवितां येणार नाहीं. तरी आह्मीं, मध्यम प्रतीचें शिक्षण मिळालेल्या सामान्य रसिक वाचकांच्या उपयोगाकरितां ह्मणून हा प्रयत्न केला आहे. तेव्हां होतां होईल तों सरळ व सोप्या रीतीनें रचना करण्याविषयीं आमचा विशेष प्रयत्न आहे हें सांगणें नलगे. तशी विशेष विवेचनपूर्वक प्रस्तावना लिहिली, तर ती बरीच मोठी होऊन दुर्बोधही होईल. याकरितां येथें दिग्दर्शन मात्र केलें आहे, तेवढ्यावरून आमचा विशेष विवेचन न करण्याचा हेतु मार्मिक वाचकांस सहजच कळून येईल.

आह्मीं मूळ ग्रंथाचें अक्षरशः भाषांतर करण्याचा प्रयत्न केला नाहीं, व तो प्रयत्न निरुपयोगी आहे असें आमचें मत आहे. कारण, कोणत्याही एका भाषेंतील ग्रंथ अक्षरशः दुसऱ्या भाषेंत उतरण्याचा प्रयत्न केला

तर तो व्हावा तसा सिद्ध होत नाहीं. तथापि कदाचित् तशी विशेष खटपट केली तर होईल; पण तो प्रयत्न एखाद्या शास्त्रीय ग्रंथाविषयीं केला तर योग्य आहे. केवळ नीतिपर असून मनोरंजक अशा पुस्तकाचें अक्षरशः भाषांतर केलें असतां त्यापासून ह्मणण्यासारखा कांहीं उपयोग तर नाहींच; पण उलट रसभंग मात्र होतो. याकरितां मुळांतील मतलब न सोडतां हें पुस्तक तयार केलें आहे. आतां याचा वाचकांना कितपत उपयोग होईल हें सांगण्याचें काम आमचें नसून वाचकांचें आहे. वाटेल त्याप्रमाणें त्याचा ते उपयोग करतीलच.

ही प्रस्तावना समाप्त करण्यापूर्वीं आमचे विद्वान् मित्र रा० रा० श्रीधर रामकृष्ण भांडारकर एम्. ए. असिस्टंट रेजिस्ट्रार ऑफ् धी युनिव्हर्सिटि ऑफ् बॉंबे यांचे विशेष आभार मानले पाहिजेत. मूळ ग्रंथ डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांणीं फारच उत्तम रीतीनें शुद्ध केलेला सरकारांनीं छापून प्रसिद्ध केला आहे. त्याचीच दुसरी आवृत्ति काढण्याकरितां विशेष शुद्ध करून व सुधारून तयार केलेली प्रत—आपल्या कामाची अडचण करून, त्यांणीं आह्मांस दिली होती व हें पुस्तक तयार करण्याच्या कामीं तिचा फारच उपयोग झाला हें कळविण्यास विशेष आनंद वाटतो. व अशा प्रकारें आमच्या विद्वान् मित्रांनीं जें आम्हांस साह्य केलें त्याबद्दल आभार प्रदर्शित केल्यावांचून राहवत नाहीं.

मुंबई.
२० पोर्चुगीजचर्च लाईन, गिरगांव, ता० ८ सप्तंबर १८८९ इ. } वा० शा० इ०



# प्रणयिमाधव.

ॐ नमः श्री गणेशाय ।

सानन्दं नन्दिहस्ताहतमुरजरवाहूतकौमारबर्हि- ।
त्रासान्नासाग्ररन्ध्रं विशति फणिपतौ भोगसङ्कोचभाजि ॥
गण्डोड्डीनालिमालामुखरितककुभस्ताण्डवे शूलपाणेर् ।
वैनायक्यश्चिरं वो वदनविधुनयः पान्तु चीत्कारवत्यः ॥ १ ॥

*विदर्भदेशांत **कुंडिनपूर** या नांवाचें मोठें शहर असून त्या देशाच्या राजधानीचें मुख्यस्थान हेंच होतें. तेथें एक मोठी पाठशाळा होती. निरनिराळ्या देशांतून विद्यादेवीची आराधना करूं इच्छिणारे पुष्कळ विद्यार्थी तेथें अभ्यासाकरितां येऊन राहिले होते. त्यांत **देवरात** आणि **भूरिवसु** नांवाचे दोघे ब्राह्मणाचे मुलगे अभ्यास करीत होते. एके ठिकाणीं अभ्यास करणें, एकत्र राहणें इत्यादि कारणांनीं व बहुत दिवस निकट सहवास होऊन—उभयतांला परस्परांचें वर्तन वगैरे आवडल्यामुळें—त्या दोघांची मैत्री जमली होती. प्रत्येक कामांत **देवरात** आणि **भूरिवसु** हे उभयतां मित्र अगदीं एक विचारानें वागत असत.

पूर्वकाळीं पुरुषांप्रमाणें स्त्रियाही आजन्मपर्यंत अविवाहित राहून विद्याभ्यास व तपश्चर्या यांत आयुष्य घालवीत

* सांप्रत ज्याला 'वऱ्हाड' असें ह्मणतात तोच 'विदर्भदेश' असें अर्वाचीन शोधक लोकांचें मत आहे व तें संगतवार दिसतें. तथापि त्या देशाची राजधानी कुंडिनपूर याविषयीं कांहीं अद्याप विशेष माहिती मिळत नाहीं.

असत. पण **देवरात** आणि **भूरिवसु** यांच्या वेळीं ह्या संप्रदायांत थोडासा फेरफार झाला होता. ह्मणजे स्त्रियांला—त्या प्रौढ होईतोंपर्यंत—अविवाहित स्थितींत राहून विद्याभ्यास करूं देत असत ; पण नंतर त्यांणीं विवाह करून घेतल्यावांचून राहूं नये, असा नियम झाला होता.

या वेळीं ह्या **भरतखंडांत बौद्ध**धर्माचा विशेष उत्कर्ष नव्हता, तरी **वैदिक**धर्म आणि **बौद्ध**धर्म या दोहोंची सामान्यतः बरोबरीच होती. प्रत्येक गांवांत अथवा शहरांत या दोन्ही धर्मांच्या लोकांची संख्या कमिजास्ती प्रमाणानें असली तरी एकंदरींत उभय धर्मांतले लोक सारखेच होते. कांहीं राजेरजवाडे **बौद्ध**धर्मी होते, व कांहीं **वैदिक**धर्मी होते, यामुळें दोन्ही धर्मांचें प्राधान्य चालत होतें.

इतर सर्व गोष्टींपेक्षां यावेळीं दुसरा एक महत्वाचा फेरफार झाला असून तो ध्यानांत ठेवण्यासारखा होता. तो हाकीं, अगदीं प्रथम प्रथम ह्मणजे **बौद्ध**धर्माचा उत्कर्ष होण्याच्या वेळीं **वैदिक**धर्मी लोक **बौद्धांचा** अति द्वेष व छळ करीत असत, तो निंद्य प्रकार यावेळीं अगदीं नाहींसा झाला होता. **वैदिक**धर्मानें आपल्याभोंवतीं एक मोठा तट बांधून घेतला होता. या तटाला एकच द्वार असून त्या वाटेनें आंत असलेल्या मनुष्याला बाहेर—ह्मणजे इतर धर्मांत—जातां येत होतें ; पण बाहेरच्या मनुष्याला कोणत्याही रीतीनें ह्या तटाच्या आंत येण्याची सवड नव्हती !

**बौद्ध**धर्माची स्थिति याहून अगदीं निराळ्या प्रकारची होती. त्याला परचक्राचें वगैरे बिलकुल भय वाटत नसे ह्मणूनच कीं काय, त्यानें आपल्याभोंवतीं तटबंदी वगैरे घालण्याचा प्रयत्न मुळींच केला नाहीं. इतकेंच नव्हे,

त्यानें आपल्या अधिकाराची हद्द देखील घातलेली नव्हती! बौद्धलोक तर सर्व विश्वांत आमचाच अधिकार आहे असें मानीत असत; व प्रतिपक्षांशीं लढाई करतांना किल्लेकोट वगैरेंचा आश्रय न करितां मोकळ्या मैदानांत राहून सामना करण्यास तयार होत! यामुळें नेहमीं त्यांच्या पक्षाला पुष्कळ मदत मिळत असे.

सर्वकाळ असेंच चालेल तर हळूहळू आपण नामशेष होईन, असा विचार करूनच कीं काय, यावेळीं वैदिकधर्मानें आपल्या भोंवतीच्या तटाला पुष्कळ दरवाजे केले. आणि पूर्वी केवळ आंतला मनुष्य बाहेर जाऊं शकत होता; पण बाहेरच्याचा आंत प्रवेश होत नसे, ही अडचण सांप्रत बहुतकरून नाहींशी केली. कित्येकांच्या मतें वैदिकांनीं आपण होऊन आपल्या खुषीनें दरवाजे खुले केले नसून बौद्धांनीं वरचेवर हल्ले करकरून त्यांच्या तटाला शेंकडों ठिकाणीं खिंडी व भगदाडें पाडलीं. तेव्हां वैदिकांनीं आपआपसांत विचार करून कदाचित् हा आपला तट जमीनदोस्त होऊन जाईल, या भीतीनें प्रतिपक्षांशीं सल्ला करून कांहीं नियमित दरवाजे ठेवून बाकीचा तट दुरुस्त केला! तें कसेंही असो; पण एकंदरींत यावेळीं उभयतांचा वैरभाव नाहींसा होऊन परस्पर गोडीगुलाबीनें व सुखासमाधानानें राहत असून एकमेकांत दळणवळण अव्याहत रीतीनें चालू होतें, असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं.

या प्रकारची स्थिति असल्यामुळें लोक धर्मसंबंधानें आपल्या इच्छेप्रमाणें वागत असत. ह्मणजे वैदिकधर्मी मनुष्याला बौद्धधर्माचा स्वीकार करावा असें वाटलें तर तो त्या धर्मांत जात असे; व बौद्धधर्मांतल्याला वैदिक-

धर्माचा स्वीकार करावा असें वाटलें तर त्यालाही वैदिक आपल्या धर्मांत घेत असत, आणि उभयतांचा व्यवहार एक ठिकाणीं चालत असे.

**देवरात** आणि **भूरिवसु** हे दोघे मित्र ज्या पाठशाळेंत विद्याभ्यास करीत होते, तींतच **कामंदकी** आणि **सौदामिनी** नांवाच्या दोघी कुमारिका विद्याभ्यास करीत होत्या. यावेळीं स्त्रिया आणि पुरुष यांला विद्या शिकण्याच्या कामांत सारखीच मोकळीक असून उभयतांलाही एक ठिकाणीं राहून अभ्यास करण्याविषयीं कांहीं मनाई नव्हती व त्याबद्दल कोणी शंकाही घेत नव्हतें. यामुळें त्या पाठशाळेंत कुमार आणि कुमारिका हीं एकाच ठिकाणीं राहून खुशाल विद्याभ्यास करीत होतीं. **देवरात** आणि **भूरिवसु** यांची जशी गट्टी जमली होती तशी **कामंदकी** आणि **सौदामिनी** या उभयतांचीही विशेष मैत्री झाली होती. पुढें सहवास होतां होतां या दोघींची व **देवरात** आणि **भूरिवसु** यांची घसण पडून कांहीं दिवसांनीं हे उभयतां कुमार व त्या दोघी कुमारिका यांचें अकृत्रिम सख्य जमलें. हीं चौघेंही जेवण-खाण, हिंडणें फिरणें व विद्याभ्यास वगैरे कामांत अगदीं एक विचारानें आणि जुटीनें वागत असत. चौघेंही ब्राह्मण—कुळांत उत्पन्न झालीं असून कुल-शीलादिकेंकरून कोणी कमी अथवा अधिक नव्हतें. चौघांलाही एकमेकांचा स्वभाव व चालचलन आवडल्यावरून दिवसेंदिवस त्यांचा स्नेहसंबंध अधिकाधिक वाढत गेला.

यद्यपि हा त्या चौघांचाही स्नेह अगदीं निष्कृत्रिम असून त्यांत कोणत्याही प्रकारचा विशेष हेतु मुळींच नव्हता; तथापि त्याचा परिणाम निराळ्या प्रकारचा झाला नसता

असें खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. कारण एक ठिकाणीं बहुत दिवस सहवास झाल्यानें त्यांला परस्परांच्या स्वभावाची वगैरे चांगली माहिती झाली होती. तेव्हां अर्थात् विद्याभ्यास पुरा झाल्यावर ह्या कुमार आणि कुमारिका ह्यांच्या मैत्रीला स्त्री-पुरुषत्वाचें रूप मिळण्याचा बराच संभव होता. व अशा प्रकारचीं उदाहरणें प्राचीन इतिहासांत पुष्कळ उपलब्ध होत असून ह्या गोष्टी मानवी स्वभावाच्याही विरुद्ध आहेत, असें नाहीं.

तात्पर्य, **देवरात** व **भूरिवसु** आणि **कामंदकी** व **सौदामिनी** यांचा यावेळीं संकेत ठरून विद्यार्थिदशेंतून पलीकडे गेल्यावर त्यांचा विवाहसंबंध घडला असता ; पण हे कुमार आणि कुमारिका यांचे पुढच्या स्थितीच्या संबंधाचे विचार परस्परांशीं अगदीं विरुद्ध होते. ह्मणजे **देवरात** आणि **भूरिवसु** हे उभयतां चांगले विद्वान् होऊन घरदार संसार करावा व लोकांत मानमान्यता मिळवावी, अशा विचारांत निमग्न असून त्यांची प्रवृत्तिमार्गावर विशेष आसक्ति होती ; व **कामंदकी** आणि **सौदामिनी** या दोघींला संसाराची कटकट नको होती. वि-द्याभ्यास पुरा झाल्यावर ईश्वरसेवेंत व इतर परोपकाराच्या कृत्यांत काळ घालवून आयुष्याचें सार्थक करावें असा त्यांचा दृढ निश्चय झाला होता.

याप्रमाणें दोघां कुमारांचा प्रवृत्तिमार्गाकडे, व दोघीं कुमारिकांचा निवृत्तिमार्गाकडे विशेष ओढा होता. दिवसेंदिवस तीं प्रौढ होत चाललीं होतीं व यावेळीं त्यांच्या वर्तनांत कांहीं विशेष प्रकारचा हेतु उत्पन्न होण्याचा संभव असतांही—आयुष्याचे पुढचे दिवस घालवि-

ण्याचे मार्ग उभयतांचे एकमेकांच्या अगदीं उलट असल्य कारणानें—तशा प्रकारचा कांहीं हेतु उत्पन्न झाला नाहीं. समान वयाच्या स्त्रिया आणि पुरुष यांचें विशेष सख्य जमलें तर त्यांत बहुतकरून दोन प्रकारचे मनोविकार असलेच पाहिजेत. ह्मणजे तीं स्त्री-पुरुषें नवरा-बायकोच्या नात्यानें एकमेकांवर प्रेम करतील, किंवा बहिण-भावंडांचें नातें ठेवून प्रेम करतील. याशिवाय तिसरा प्रकार असण्याचा संभव नाहीं. कारण प्रीति केव्हां तरी नात्याच्या रूपानें परिणामाला पावल्यावांचून राहत नाहीं!

**देवरात** आणि **भूरिवसु** व **कामंदकी** आणि **सौदामिनी** यांचे परस्परांविरुद्ध हेतु असल्यामुळें त्यांची ती प्रीति नवरा-बायकोच्या रूपाचा स्वीकार न करितां बहीण-भावंडांच्या नात्यानें परिणामाला पावली. तात्पर्य ते दोघे कुमार व त्या दोघी कुमारिका परस्पर बहीण-भावंडांच्या नात्यानें वागूं लागलीं. हा ह्या कुमार-कुमारिकांच्या प्रीतीचा परिणाम झाला. पण त्या उभयतां कुमारांच्या प्रीतीचा याहून निराळ्या प्रकारचा परिणाम झाला होता. **देवरात** आणि **भूरिवसु** हे दोघेही विद्यार्थि-दशेंत असून अविवाहित होते. अर्थात् आईबापांच्या आज्ञेंत राहून त्यांच्या तंत्रानें त्यांना वागलें पाहिजे होतें. उभयतांचाही आपसांत नात्याचा संबंध व्हावा, असा हेतु होता, तरी स्वतःबद्दल त्यांच्यानें कांहीं निश्चय करवला नाहीं. कारण ती गोष्ट त्यांच्या अधिकारांतली नव्हती. ह्मणून त्यांनीं आपल्या संततीच्या संबंधानें निश्चय केला. तो असा कीं, उभयतांतून ज्याला मुलगी होईल त्याणें ज्याला मुलगा होईल त्याला ती द्यावी. अर्थात् **भूरिवसु** किंवा **देवरात**

यांतून ज्याला मुलगी होईल त्यानें ती दुसऱ्याच्या मुलग्याला द्यावी, व त्यानें ती घ्यावी, असा विचार होऊन **कामंदकी** आणि **सौदामिनी** ह्या गुरुभगिनींच्या विद्यमानें उभयतांनीं निश्चय ठरवून व्याहीपणाचें नातें करून घेण्याबद्दल परस्परांला वचनें दिलीं !

चौघेंही उत्तम बुद्धिवान् असून त्यांच्या अंगीं ग्राहकशक्ति विशेष असल्यामुळें बरोबरीच्या इतर विद्यार्थ्यांहून तीं फार पुढें गेलीं. त्यांनीं पाठशाळेंत असतां गुरूच्या आज्ञेंत राहून लक्ष्यपूर्वक अध्ययन करून आपला विद्याभ्यास पुरा केला. व आजपर्यंत ब्रह्मचर्यांत दिवस गेले, ते यापुढें दुसऱ्या आश्रमाचा स्वीकार करून त्यांत घालविण्याचा समय आला. विद्याभ्यास पूर्ण झाला असें पाहून गुरूनीं त्या चौघांलाही आपल्या इच्छित मार्गाला लागण्याविषयीं आज्ञा दिली !

**देवरात** आणि **भूरिवसु** यांचें कोणतें नातें झालें तें वर सांगितलेंच आहे. गुरूची आज्ञा घेऊन चौघेंही आपापल्या ठिकाणीं जाण्यास निघालीं, त्यावेळीं **देवरात** व **भूरिवसु** यांना पुढें संसार करावयाचा होता, ह्मणून ते आपआपल्या घरीं जाण्यास सिद्ध झाले. **कामंदकी** आणि **सौदामिनी** यांना संसार करावयाचा नव्हता; ह्मणून त्यांनीं **बौद्ध**धर्माचा स्वीकार करण्याचा निश्चय केला. कारण **वैदिक**धर्मांत–विद्याभ्यास पुरा झाल्यावर स्त्रियांनीं अविवाहित राहतां कामां नये, असा निर्बंध असल्यामुळें त्यांला **बौद्ध**धर्माचें अवलंबन करणें भाग पडलें ! यावेळीं दोन्हीही धर्मांच्या संबंधानें अधिकउणेपणा नसल्यामुळें **बौद्ध**धर्माचा स्वीकार करण्यांत त्यांना मुळींच कांहीं

कठीण वाटलें नाहीं. याप्रमाणें चौघांच्याही तयाऱ्या झाल्या.

गृहस्थाश्रम हा इतर आश्रमांत राहणाऱ्या लोकांनां साधारणतः आश्रयभूत आहे. तशांतून स्त्रिया तर बहुतकरून पुरुषांला अवलंबून असतात. तेंव्हां गृहस्थाश्रमांत राहूं इच्छिणाऱ्या **देवरात** आणि **भूरिवसु** यांणीं तापसी होणाऱ्या **कामंदकी** आणि **सौदामिनी** ह्यांला-पुढें योगायोग जमून येईल तर तुह्मीं दोघींनीं आमच्या सहवासांत रहावें, अशी विनंती केली व स्नेहपाशानें बद्ध झाल्यामुळें त्या दोघींनींहीं तसें करण्याचें कबूल केलें. नंतर एकमेकांचा प्रेमपूर्वक निरोप घेऊन—वियोग होऊं नये, अशी उत्कट इच्छा असतांही, पुनः एकत्र सहवास होण्याकरितां—**देवरात** आणि **भूरिवसु** आपआपल्या घरीं गेले; व **कामंदकी** आणि **सौदामिनी** बौद्धधर्माच्या नियमाप्रमाणें जोग घेऊन त्या दोघीही मठवासिनि झाल्या!

**देवरात** आणि **भूरिवसु** दोघेही मोठ्या प्रसिद्ध कुळांतले व श्रीमान् असून नामांकित विद्वान् झाल्यामुळें त्यांचा चोहोंकडे मोठा नांवलौकिक झाला. लवकरच त्यांच्या योग्य व अनुरूप अशा कन्यांशीं त्यांचा विवाह होऊन ते दोघेही गृहस्थाश्रमी झाले. दिवसेंदिवस त्यांची ख्याती विशेष वाढत गेल्यावरून **विदर्भ**देशचा राजा **वीरवर्मा** याणें **देवराताला** मोठ्या सन्मानपूर्वक आपल्या भेटीला येण्याविषयीं विनंती केली. विद्वान् व ज्याच्या अंगीं कर्तृत्वदशा विशेष असेल त्याला राजाश्रयाची अपेक्षा असतेच. **वीरवर्म्यानें** बोलावणें पाठविलें तेंव्हां **देवरातानें** मोठ्या आनंदानें त्याची भेट घेतली. **देवराताची** विद्या व व्यवहारचा-

तुर्य वगैरे अप्रतिम गुण पाहून **वीरवर्म्यानें** त्याला आपल्या मुख्य प्रधानकीचा अधिकार देऊन राज्यकारभार त्याच्या हातीं दिला आणि तो खुशाल आनंदांत सुखाचा उपभोग घेऊं लागला. **देवराता**सारख्या विद्वान् व हुषार मनुष्याच्या हातीं राज्यसूत्रें येतांच त्याणें जिकडे तिकडे अशी कांहीं उत्तम व्यवस्था ठेविली कीं, तीबद्दल त्याची व त्याच्या राजकार्यधुरंधरत्वाची सर्वत्र विशेष तारिफच होऊं लागली!

जसा **देवरात विदर्भ**राजाचा दिवाण झाला, तसा **भूरिवसु**ही दिवाण झाला. **मालव**देशांत **पारा** आणि **सिंधु** या दोन नद्यांच्या संगमाजवळ **पद्मावती** नांवाची मोठी प्रसिद्ध नगरी असून **मालवदेश**च्या राजधानीचें मुख्य स्थान तेथेंच होतें. यावेळीं तेथें **चंद्रकेतु** नांवाचा राजा गादीवर होता. **चंद्रकेतू**ला आपल्या राज्याची व्यवस्था फार उत्तम प्रकारें चालवावी अशी मोठी इच्छा होती. आपल्या राज्यरीतींत कोणत्याही प्रकारचा दोष राहूं देऊं नये, ह्याविषयीं तो रात्रंदिवस झटत होता. त्याला विद्वान् असून मोठा हुषार व प्रामाणिक असा दिवाण मिळाला नव्हता, ह्मणून तो त्याच्याविषयीं फार शोध करीत होता. कर्णपरंपरेनें **भूरिवसू**चा नांवलौकिक त्याच्या कानावर गेला. तेव्हां—तो कदाचित् आपल्याला पाहिजे त्या प्रमाणें कारभार चालवील, असें वाटल्यावरून राजानें त्याला सत्कारपूर्वक बोलावून नेलें व आपल्या खात्रीस उतरल्यावरून **भूरिवसू**ला मुख्यप्रधान नेमून राजानें सर्व कारभार त्याच्या हातीं सोंपविला! **भूरिवसु**ही मोठा हुषारच होता. त्यानें राजा आणि प्रजा ह्या उभयतांला-

हीं पसंत पडेल अशा रीतीनें कारभार चालवून राजकार्य-धुरंधरपुरुषाला उचित असा नांवलौकिक मिळविला.

या प्रमाणें **देवरात** आणि **भूरिवसु** हे इतर गुणांनीं जसे एकमेकांशीं तुल्य होते, तसे अधिकार व भाग्य आणि योग्यता यांनींही उभयतांची अगदीं बरोबरी झाली. कांहीं दिवसांनीं **देवराताची** स्त्री गरोदर होऊन तिला उत्तम पुत्र झाला. त्याला त्याणें **माधव** असें नांव ठेविलें. तो रूपानें आणि गुणांनीं बापापेक्षांही वर्णनीय होता. **देवराता**-ला पुत्र झाल्यावर चारदोन महिन्यांच्या अंतरानें **भूरिवसू**-ची स्त्री प्रसूत होऊन तिला अत्यंत रूपवती व सर्वलक्षण संपन्न **मालती** नांवाची कन्या झाली. हीं उभयतां मुलें आपआपल्या आईबापांला परम आनंद देत दिवसेंदिवस वाढत गेलीं.

**माधव** उपनयन करण्याला योग्य झाला, तेव्हां **देवरातानें** मोठ्या समारंभानें त्याचें मौंजीबंधन केलें. द्रव्यादिकांचें अनुकूल्य असून **देवरातही** मोठा उदार हो-ता, ह्मणून त्यानें ह्या कार्यांत दानधर्म वगैरे पुष्कळ केला. लेखन वाचन व साधारण इतर विषयांचें ज्ञान **माधवाला** उपनयनापूर्वींच झालें होतें. उपनयन झाल्यावर तो पाठशाळेंत जाऊन वेद-शास्त्रांचा अभ्यास करूं लागला. क्रमाक्रमानें त्याचा अभ्यास बहुतकरून पुरा झाल्यासारखा होता; तरी अजून तर्कशास्त्राचें अध्ययन करावयाचें राहिलें होतें.

**भूरिवसूची** कन्या **मालती** हीही दिवसेंदिवस आई-बापांच्या आनंदसमुद्राला भरतें आणणाऱ्या शुक्लपक्षां-तल्या चंद्रिकेप्रमाणें वाढत होती. ती सुमारें सात आठ वर्षां-

ची झाली, तेव्हां तिला लेखन, वाचन इत्यादिकांचें ज्ञान प्राप्त झाल्यावरून बापानें तिला सांगीतशाळेंत पाठविलें. तेथें नृत्य, गायन, चित्रें काढणें, इत्यादि कलांचा ती अभ्यास करूं लागली. **देवरात** आणि **भूरिवसु** हे उभयतां मोठ्या अधिकारावर असून त्यांच्या मागें कामांचा जंवजाळही विशेष होता, व उभयतांच्या राहण्याच्या ठिकाणांत अंतरही बरेंच होतें. कामाकाजाच्या गर्दीमुळें त्यांच्या भेटी वरचेवर होत नसत. तरी पूर्वींच्या स्नेहांत कांहींच अंतर पडलें नव्हतें. दोघेही मोठ्या प्रेमानें आपआपला समाचार परस्परांला कळवीत असून स्नेहसंबंध उभयतांनींही अव्याहत चालविला होता.

पूर्वसंकेताप्रमाणें **देवराताला** मुलगा झाला व **भूरिवसूला** मुलगी झाली असून त्या उभयतांचा संबंध होणें योग्य होतें; पण त्यासंबंधानें ह्मणण्यासारखी कांहीं तयारी चालली नव्हती. दोघांचा स्नेहसंबंध कायम असल्यामुळें **माधवाला** **भूरिवसूची** मुलगी करावयाची व **मालती** **देवराताच्या**-च मुलास द्यावयाची, असें **देवरात** आणि **भूरिवसु** या उभयतांच्या मनांत होतें.

शरीरसंबंध होतो, त्यांत बहुतकरून मुलीच्या बापाकडून बोलण्याची सुरवात होत असते. मुलाचा बाप-त्या संबंधानें मनापासून विशेष अगत्य असलें तरी-बाह्यात्कारें आतुरपणा दाखवीत नाहीं. मुलगी लग्नाला योग्य झाली, तरी **भूरिवसूनें** त्याबद्दल कांहीं उपक्रम काढला नाहीं, असें पाहून **देवरातानें** परभारें योगायोग घडून यावेत असा विचार करून दुसरीच एक युक्ति काढिली. **माधवाचा** इतर सर्व अभ्यास पूर्ण होऊन त्याला तर्कशा-

त्याचें अध्ययन करावयाचें होतें. **पद्मावतीनगरींतल्या** पाठशाळेंत तर्कशास्त्राचें शिक्षण फार उत्तम प्रकारें मिळतें आणि तेथील त्या शास्त्राचा अध्यापक न्यायविद्येंत मोठा प्रवीण असून त्याची शिकविण्याची पद्धतिही चांगली आहे. तेंव्हां **माधवाला पद्मावतीनगरींतल्या** पाठशाळेंत तर्कविद्येच्या अभ्यासाकरितां पाठवावयाचें, असें निमित्त करून त्याणें त्याला मुद्दाम **पद्मपुरींत** नेऊन ठेविलें. जातेवेळीं **माधवाचा** बालमित्र **मकरंद** व आवडता हुजऱ्या **कलहंस** आणि इतर नोकर-चाकर मंडळी त्याच्याबरोबर दिली होती.

**माधवाला पद्मावतीला** पाठविलें यांत **देवराताचे** दोन हेतु होते. त्याचा शास्त्राभ्यास व्हावा हा तर हेतु होताच; पण **पद्मावतींत** त्याचें राहणें झालें ह्मणजे कांहीं कार्यप्रसंगानें **मालतीची** आणि त्याची दृष्टादृष्ट होईल; व वरचेवर तसा योग आल्यानें परस्परांची प्रीति जमून उभयतांचा समागम होण्याचा योग आपोआपच घडून येईल, असें त्याच्या मनांत होतें. पण बाह्यात्कारें त्यांतला कांहीं एक संबंध न दाखवितां केवळ विद्याभ्यासाचें निमित्त करून त्यानें **माधवाला** तिकडे पाठविलें.

**कामंदकी** आणि **सौदामिनी** ह्या बुद्धतापसी झाल्याचें वर सांगितलेंच आहे. त्या दोघींनीं पाठशाळेंत असतांना सारखाच अभ्यास केला होता. तरी **कामंदकीला** तर्कशास्त्र विशेष आवडत असल्यावरून तिनें नंतर त्या शास्त्रावर विशेष व्यासंग करून न्यायशास्त्रांत ती मोठी प्रवीण झाली. स्वभावतः तिला राजकीय कारस्थानें पाहिजे होतीं, ह्मणून तिनें राजव्यवहारांतही मोठी प्रवीणता

संपादन केली. **सौदामिनी**ला न्यायशास्त्राचें विशेष ज्ञान नव्हतें. तें संपादन करावें, अशी इच्छा झाल्यावरून तिणें **कामंदकी**चें शिष्यत्व स्वीकारिलें. **कामंदकी**पेक्षां थोडीशी ती वयानेंही लहानच होती, यामुळें उभयतांचा गुरुशिष्य-भाव असून **सौदामिनी**नें **कामंदकी**जवळ न्यायशास्त्राचा अभ्यास पुरा केला. यानंतर तिला मंत्रशास्त्राचा नाद लागून जारण मारण इत्यादिकांतही ती मोठी प्रवीण झाली.

या दोघींचे गुरुबंधु **देवरात** आणि **भूरिवसु** यांचा मोठा ऊर्जित काळ असून ते यांच्याविषयीं विशेष अगत्य बाळगीत होते व—तुह्मीं दोघींनींही आमच्या सहवासांत रहावें, असें त्यांचें त्यांना सांगणें होतें; व त्यांनींही त्यांचा हेतु पुरविण्याचें कबूल केलें होतें. तथापि त्या दोघींनीं जो मार्ग आचरण केला होता, तो अगदीं निराळा असल्यामुळें कोणाच्या घरीं जाऊन दिवस घालविण्यासारखी त्यांची स्थिति नसून तें त्यांला इष्टही नव्हतें. याकरितां बंधूंचा हेतु पुरवावा व आपलें वचनही खरें करावें, ह्मणून **कामंदकी** आणि **सौदामिनी**, **देवरात** आणि **भूरिवसु** यांच्या घरीं जाऊन येऊन असत व प्रसंगविशेषीं त्यांना योग्य साह्य करीत. ते उभयतां मुख्य प्रधान असल्यामुळें कधीं कधीं मोठीं बिकट राजकारस्थानें उपस्थित होत असत. त्यावेळीं **कामंदकी**च्या न्यायशास्त्रपटुत्वाचा व बुद्धिमत्तेचा आणि **सौदामिनी**च्या मंत्रशास्त्रनिपुणत्वाचा **देवरात** आणि **भूरिवसु** यांला मोठा लाभ होत असे. पुष्कळ दिवसपर्यंत त्यांनीं आपली राहण्याची जागा नियमित केली नव्हती; पण नंतर **कामंदकी**ला **पद्मावतीं**त व **सौदामिनी**ला **श्रीपर्वता**वर रहावें असें वाटल्यावरून त्या दोघी-

ही त्याठिकाणीं राहूं लागल्या. **श्रीपर्वत**[1] हा **पद्मावती** नगरीपासून बऱ्याच अंतरावर होता. तेथें **सौदामिनीनें** मठ करून तें आपल्या राहण्याचें मुख्यस्थान केलें. **कामंदकीनें पद्मावतींतच** शहराबाहेर एक चांगलेंसें स्थल पाहून त्या ठिकाणीं मठ बांधून ती तेथें राहिली.

**देवराताचा** मुलगा **माधव** विद्याभ्यासाकरितां **पद्मावतींत** रहात होता हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आपला बाप **देवरात** आणि **कामंदकी** यांचा विशेष स्नेह असून परस्परांचें बहीणभावंडांचें नातें आहे, हें त्याला ठाऊकच होतें. ह्मणून तो फावल्यावेळीं **कामंदकीच्या** मठांत जाऊन—आईबापांच्या वियोगापासून होणाऱ्या दुःखाचा—बापाच्या गुरुबहिणीच्या सहवासानें, विसर पाडून घेत होता. **भूरिवसु** हा प्रत्यक्ष तिचा गुरुबंधु असून **कामंदकीनें** आपल्या जवळ रहावें अशी त्याची विशेष इच्छा होती, पण तिनें तसें केलें नाहीं. तरी ती **पद्मावतींत** राहायला आली, याचा त्याला अतिशय आनंद झाला. **कामंदकी** नेहमीं **भूरिवसूच्या** घरीं येत जात असे, व **भूरिवसूची** स्त्री **मेधावती** व मुलगी **मालती** ह्याही कधीं मधीं तिच्या मठांत जात असत; तरी **माधवाची** आणि **मालतीची** दृष्टादृष्ट होण्याचा योग कधींही घडून आला नाहीं.

**देवरात** आणि **भूरिवसु** या उभयतांचा पाठशाळेंत असतांना जो संकेत झाला होता, तो **कामंदकीच्या**

---

१ 'श्रीपर्वत' हा कोठें होता वगैरे बद्दल कांहीं विशेष माहिती मिळत नाहीं. रत्नावली नाटिकेंतही या पर्वताचें नांव आलें असून तें एका मांत्रिक मनुष्याच्या संबंधानेंच आलें आहे. तेव्हां श्रीपर्वत हें मांत्रिकाचें स्थान असावें असें वाटतें.

विद्यमानेंच झाला असल्यामुळें तिला त्याचें चांगलें स्मरण होतें. दैवयोगानें तो पुरा करण्याचीही संधी जमून आली होती. ह्मणजे **देवराता**ला प्रथमच मुलगा झाला असून **भुरिवसू**लाही मुलगी झाली. ते उभयतां परस्परांचे मित्र असून त्यांनीं एकमेकांला वचन दिलें आहे. दोघांचा स्नेह दिवसेंदिवस वृद्धिंगत होत आहे. कुल-शिलादिकें करून व अधिकार आणि संपत्ति यांनीं देखील उभयतांची बरोबरीच आहे. **देवराता**चा मुलगा जसा सर्वलक्षणसंपन्न तशीच **भूरिवसू**ची मुलगीही सर्वलक्षण-संपन्नच होती. तात्पर्य परस्परांचा शरीरसंबंध होण्याला ज्या गोष्टी अनुकूळ असल्या पाहिजेत त्या सर्व होत्या. तशांतून दोघेही सूज्ञ व आपआपल्या वचनांला पाळणारे होते. ह्मणून **कामंदकी**ला, **देवरात** आणि **भूरिवसु** यांचा शरीरसंबंध झाल्याचें पहावें अशी फार उत्कंठा होती; तरी तिणें त्यासंबंधानें मुळींच कांहीं प्रयत्न केला नाहीं. वेळ येईल तेव्हां त्यांचा विवाह होईल. आपण त्या खटपटींत पडण्याचें कांहीं कारण नाहीं, असें समजून ती प्रथम स्वस्थ होती; पण लौकरच तिला-आपल्या तापसीवेषाच्या व भगव्या वस्त्राच्या विरुद्ध—उलाढालींत मन घालण्याचा प्रसंग प्राप्त झाला.

**पद्मावती**चा राजा **चंद्रकेतु** याचा आपला मुख्य प्रधान **भूरिवसु** यावर अतिशय विश्वास होता. **चंद्रकेतू**जवळ एक खुषमस्कऱ्या असून त्याला **नंदन** नांवाचा पुत्र व **मदयानिका** नांवाची एक उत्तम कन्या होती. **नंदन** रूपगुण-संपन्न होता तरी त्याची नुकतीच पन्नाशी उलटली होती.

एके दिवशीं राजा **चंद्रकेतु** याणें **नंदना**चा आतां विवाह

कडे लागलें तरी तें फारवेळ तेथें टिकत नाहीं. दुसरें कांहीं मनांत आलें कीं, लगेच पहिल्या गोष्टीचें विस्मरण होतें! यावेळीं **नंदना**च्या लग्नाची गोष्ट निघाली ; पण ती तितक्यावरच राहिली. तिचा त्यानंतर कांहींच उपक्रम निघाला नाहीं. तथापि महाराजांचा **नंदना**चें लग्न करण्याचा बेत आहे असें स्वतः **नंदना**च्या व त्याच्या आप्तांच्याही लक्षांत पूर्णपणें येऊन चुकलें. बोलून चालून तो खुषमस्कऱ्याच होता. यजमानाला खुष करून त्याच्या पासून द्रव्य उपटणें हें त्याचें मुख्य कामच होतें. अशा मनुष्याला राजा आपलें लग्न करितो आहे हें समजल्यावर किती आनंद होईल, तें सांगितलें पाहिजे असें नाहीं.

**नंदन** हा राजाच्या मेहरबानींतला खुषमस्कऱ्याचा मुलगा व त्यांतून स्वतः तोही राजाचा आवडता असल्यामुळें दरबारांतील लहानमोठ्या कामदारलोकांचें त्याच्याकडे जाणें येणें असून त्यांच्यावर त्याचें विशेष वजन होतें. मुख्य प्रधान **भूरिवसु** याच्या घरींही तो वारंवार जात असे. व **मालती** लहान असतां पुष्कळ वेळ त्याच्या पाहण्यांत आली असून त्याणें तिची बरीच ओळख धरली होती. सांप्रत तिच्या विवाहाचा विचार चालला आहे, तेव्हां आपण तिच्याविषयींच प्रयत्न करावा असें त्याच्या मनांत आलें. स्वतः **भूरिवसू**कडे याबद्दल गोष्ट काढली तर तो कदाचित् मान्य करील किंवा नाहीं, याविषयीं त्याला शंका होती. कारण शरीरसंबंध होण्याला बहुतकरून उभयपक्षांची कांहीं अंशीं बरोबरी

**भूरिवसु** पडला दिवाण. तेव्हां आपल्या मुलाला तुझी मुलगी दे, असें **भूरिवसू**ला सांगण्याची **नंदना**च्या बापाची छाती झाली नाहीं.

राजा **चंद्रकेतु नंदना**चा विवाह करण्यास तयार झाला होता हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां त्याच्याकडून **भूरिवसू**कडे मागणी करविली तर राजाचा शब्द त्याच्यानें मोडवणार नाहीं व अशा रीतीनें आपला हेतु सिद्धीस जाईल, असा विचार करून राजाची मर्जी प्रसन्न आहे असें पाहून **नंदना**च्या बापानें **मालती**बद्दल त्याच्याकडे विनंती करून—माझ्या मुलाला तीच मुलगी योग्य आहे, व आपण सांगितलें तर **भूरिवसु** ही गोष्ट अमान्य करणार नाहीं. तेव्हां कसेंही करून **मालती नंदना**ला मिळेल, अशी तजवीज करण्याविषयीं त्यानें आग्रहपूर्वक प्रार्थना केली. **नंदन** राजाचा आवडता होताच, व कांहीं अंशीं तो त्याला आपल्या मुलासारखा मानीत होता, असें ह्मटलें तरी चालेल. तेव्हां **नंदनानें** ही आपल्याला **मालतीच** बायको पाहिजे असा हट्ट धरिला.

राजेलोक बहुतकरून लहरी असतात. **नंदन** व त्याचा बाप या दोघांच्या आग्रहावरून **मालती**बद्दल **भूरिवसू**कडे मागणी करावी, असें चंद्रकेतूच्याही मनांत आलें; व ही गोष्ट 'जी सरकार' ह्मणणाऱ्या जवळच्या इतर लोकांलाही फार पसंत पडली. '**नंदन** फारच गुणी आहे. याच्यासारखा नवरा मिळायला **मालती**ला नशीब

हीराजांनीं ही गोष्ट मनावर घेऊन एकदाचें हें कार्य क-रून टाकावें, अशी जवळच्या मंडळींनीं भर दिल्यावरून राजाच्या मनांत ती गोष्ट पूर्णपणें बिंबली. वस्तुतः **नंद-नाची** योग्यता काय! **भूरिवसु** केवढ्या योग्यतेचा मनुष्य! आपली मुलगी तो पाहिजे त्याला देईल. त्या कामांत आपण आपलें वजन खर्च करावें, तें कां? यागोष्टीचा राजानें विचार केला पाहिजे होता; पण तिकडे त्याचें मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. असो.

एके दिवशीं **भूरिवसु** व दरबारची इतर कांहीं मंडळी बसली असतां राजानें **मालती नंदना**ला द्यावी, अशी गोष्ट **भूरिवसू**जवळ काढिली, व त्यासंबंधानें अवांतर कारणें वगैरे दाखविलीं. राजाच्या एकंदरींत बोलण्याच्या झोंकावरून **मालती नंदना**ला द्यावी, याविषयीं त्याचा केवळ हेतुच आहे असें नाहीं, तर विशेष आग्रह आहे; असें **भूरिवसू**च्या लक्ष्यांत आल्यावरून त्याला मोठें संकट पडलें. कारण, **देवराता**चा पुत्र **माधव** याला **मालती** द्यावयाची असा पूर्वींच संकेत ठरला होता; व ती गोष्ट **भूरिवसू**च्या मनांत घोळत होती. तशांतून आपली मुलगी खुषमस्कऱ्याच्या मुलाला व त्यांतूनही उतार वयाच्याला द्यावी, हें त्याला मुळींच आवडलें नाहीं. तथापि प्रत्यक्ष आपल्या यजमानानें तिची मागणी केली असून त्याचा त्याविषयीं आग्रह आहे, तेव्हां आपण नाहीं ह्मटलें, तर त्याचा परिणाम चांगला होणार नाहीं, असा विचार करून **भूरिवसूनें** मोठ्या शहाणपणानें मोघम उत्तर दिलें.

तसा अर्थ करतां येतो. यांत **नंदनाला** मुलगी देतों किंवा देत नाहीं, याविषयीं स्पष्ट असें कांहींच उत्तर नाहीं. तेव्हां राजाला अथवा इतरांला यासंबंधानें संतोष मानण्यारखें कांहींच नव्हतें. तरी आपण सत्ताधारी आहे; आपलें वचन **भूरिवसु** कधींही अमान्य करणार नाहीं, असा निश्चय असल्यावरून **भूरिवसूनें** मुलगी देण्याचें कबूल केलें, असाच राजानें त्याच्या बोलण्याचा अर्थ घेतला व त्यावरून त्याला फार आनंद झाला.

परंपरेनें ही गोष्ट साऱ्या शहरभर पसरली. **मालती नंदनाला** देतात, हें वर्तमान ऐकून **नंदनाच्या** हितचिंतकांला फार आनंद होऊन ते त्याबद्दल राजाची तारीफ करूं लागले. कित्येकांला खुषमस्कऱ्याच्या मुलाला दिवाणसाहेब आपली मुलगी देतात, हें मुळींच योग्य वाटलें नाहीं. ते ह्याबद्दल **भूरिवसूला** दोष देऊं लागले. तात्पर्य ज्याची ज्याची जशी जशी समजूत होती, व जसें व्हावें असें त्याला इष्ट वाटत होतें, त्याची त्याची तदनुसार साऱ्या शहरभर ह्या विषयाच्या संबंधानें चर्चा सुरू झाली.

**भूरिवसूचा देवराताशीं** पूर्वी झालेला संकेत पुरा करावयाचा असाच हेतु होता. पण राजाला राग न येतां व त्यांत आपलें अंग कांहीं न दाखवितां परभारें ती गोष्ट व्हावी, असा हेतु धरून त्यानें या विषयाच्या संबंधानें आपला खरा अभिप्राय कोणालाच कळविला नाहीं. मुलीच्या लग्नाच्या संबंधानें त्याच्याजवळ कोणी गोष्ट काढली, तर तो

राजाजवळ जें उत्तर दिलें, तेंच त्यांना सांगत असे. पण आंतून त्याचा दुसरा बेत चाललाच होता. राजाला कांहीं संशय न येऊं देतां साधेल त्या रीतीनें **मालतीचा माधवाशीं** विवाह करून द्यावा, ही मसलत सिद्ध होण्याकरितां त्यानें आपली चतुर मैत्रीण **कामंदकी** हिची मुद्दाम त्या कामीं योजना केली होती; व अंतस्थ रीतीनें तिला तो सर्व प्रकारें साह्य करीत होता.

हा वेळपर्यंत **कामंदकीनें** ह्या लग्नाच्या भानगडींत मुळींच मन घातलें नव्हतें, हें वर सांगितलेंच आहे. **भूरिवसु नंदनाला** आपली मुलगी देणार, व या कामांत खुद्द **चंद्रकेतु** राजानें आपलें वजन खर्च केलें आहे, अशी बातमी जेव्हां तिच्या कानावर आली, तेव्हां तिला—आपल्या भगव्या छाटीला उचित अशा गोष्टींकडे दुर्लक्ष्य करून—संसारी मनुष्यानें करण्याला योग्य अशा उलाढालींत मन घालून कांहीं विचित्र व्यूहरचना करावी लागली.

**वस्तुतः** तिला या भानगडींत पडण्याचें कारण नव्हतें; पण **देवरात** आणि **भूरिवसु** व **माधव** आणि **मालती** यांच्यावर तिचें विलक्षण प्रेम असून पाठशाळेंत असतांना झालेला संकेत प्रत्यक्ष तिच्या विद्यमानें झाला होता. तेव्हां तो पुरा करवावा म्हणून स्नेहवश झालेल्या **कामंदकी**च्या मनांत तसें आलें यांत फारसें आश्चर्य नाहीं. भगवीं वस्त्रें अंगावर घेतलीं तरी मानवी स्वभावाला अगदीं खिळून राहणारे विकार एकदम नाहींसे होणें फार कठीण आहे. तशांतून दिलेलें वचन पुरें करविण्याविषयीं प्रयत्न करणें हें तिच्यासारख्या निरपेक्ष मनुष्याचें कर्तव्य आहे असें म्हटलें तरी चालेल.

नये व **भूरिवसूवर** ही कांहीं संकट न येतां आपला हेतु सिद्धीस जावा. **अवलोकिता** नांवाची तिची एक प्रिय शिष्यीण असून **कामंदकीनें** तिला आपल्या मसलतींत घेतलें होतें.

एके दिवशीं दोघीही आपल्या मठांत बसल्या असतां **कामंदकी अवलोकितेला** ह्मणाली, 'अग **अवलोकिते**, दैवशाली **देवराताचा** पुत्र **माधव** आणि **भूरिवसूची** मुलगी **मालती** या दोघांचा विवाह घडून येईल असें तुला वाटतें का?' इतक्यांत तिचा डावा डोळा लवला. स्त्रियांचा डावा डोळा लवणें हें शुभसूचक चिन्ह आहे. तें यावेळीं झालें यावरून आपण जी गोष्ट काढिली ती सिद्ध होईल, असें वाटून मोठ्या आनंदानें ह्मणाली, 'अग, अंतर्गत हेतु स्पष्ट करावा ह्मणूनच कीं काय माझा हा डावा डोळा स्फुरण पावत आहे. तेव्हां यावरून कार्यसिद्धि खचित होईल असें वाटतें.'

हें ऐकून **अवलोकिता** ह्मणाली, '**भगवति**, आपल्या चित्ताला हा एक मोठा विक्षेपच झाला आहे, असें वाटतें. मला तरी आई, याचें मोठें आश्चर्यच वाटतें. फाटकें तुटकें भगवें वस्त्र परिधान करून केवळ देहरक्षणाकरितां एक घासभर अन्न खाऊन राहणाऱ्या आपल्यासारख्या निरपेक्ष मनुष्याला असल्या खटपटी कशाला पाहिजेत? अमात्य **भूरिवसु** अशा कामांत आपल्याला प्रयत्न करावयास सांगतो व आपणही संसाराची दगदग सोडली असून या कामांत प्रवृत्त होतां, याचें मला मोठें नवल वाटतें.'





हें ऐकून **कामंदकी** ह्मणाली, 'मुली, असें बोलूं नकोस. **भूरिवसु** मला या कामांत प्रवृत्त करितो, त्यांत दुसरा कांहीं हेतु नसून तें त्याच्याशीं माझा जो अकृत्रिम स्नेह आहे त्याचेंच फळ होय. मला तर असें वाटतें कीं, माझी सगळी तपश्चर्या किंवा प्राण देखील भरीस घालून—मित्राचें हें कार्य माझ्या हातून सिद्ध झालें तर त्याबद्दल मला मोठा संतोष होईल.

**कामंदकी**च्या ह्या बोलण्यावरून तिला ह्या कामाविषयीं किती अगत्य आहे तें व्यक्त झालें; तथापि **अवलोकिते**चें एवढ्यानें समाधान झालें नाहीं, असें पाहून **कामंदकी** पुनः ह्मणाली, 'अग, **भूरिवसू**करितां मी इतकी खटपट करतें याचें तुला मोठें गूढ वाटत असेल; पण त्याचा आणि माझा काय संबंध आहे, हें तुला अद्याप माहीत नाहीं. **देवरात** आणि **भूरिवसु** यांच्या हिताकरितां मला पाहिजे ती खटपट केलीच पाहिजे. लहानपणीं पाठशाळेंत होतों तेव्हांपासून त्यांचा आमचा स्नेह जडलेला असून, माझ्या आणि **सौदामिनी**च्या समक्ष उभयतांची ह्या गोष्टीच्या संबंधानें प्रतिज्ञा झाली आहे. व **देवराता**नें विद्याभ्यासाचें निमित्त करून **माधवा**ला येथें पाठविण्याचा तरी हेतु काय? शरीरसंबंधाची जी कांहीं आपली प्रतिज्ञा झाली आहे, तिची **भूरिवसू**ला वरचेवर आठवण व्हावी, व अलौकिक उत्तम गुणवान् असा आपला पुत्र **माधव मालती**च्या मनांत भरण्याचा योग यावा, हाच त्याचा मुख्य हेतु असावा.'

यावर **अवलोकिता** ह्मणाली, 'असें असेल तर अमात्य **भूरिवसु** आपल्या मुलीला **माधवा**ला कां देत नाहीं? असें कारस्थान करून गुप्तपणें विवाह होण्याविषयीं तुह्माला तो कां प्रेरणा करितो?'

ताबेदारच आहे. तेव्हां उघडपणें मुलगी देत नाहीं ह्मणून सांगितलें तर राजाची मर्जी जाऊन कदाचित् त्याचा भलताच परिणाम होईल, ह्मणून त्यानें हा उपाय योजला आहे.'

हें ऐकून **अवलोकितेला** फार आश्चर्य वाटलें. ती ह्मणाली, 'प्रधानजींच्या बाह्यवर्तनावरून त्यांला **माधवाचें** नांव देखील माहीत नसावें, असें दिसतें; व लोकांचीही समजूत अशीच असून अंतस्थ कारस्थानें मात्र अशीं चाललीं आहेत, तेव्हां ह्यांत काय समजावें?'

हें ऐकून **कामंदकी** हंसून ह्मणाली, 'अग, तूं भोळी आहेस. तो **भूरिवसु** मोठा गंभीर व कारस्थानी आहे. त्याणें पुढें जो बेत योजला आहे, त्यांत आपलें कांहीं अंग आहे, असा कोणाला संशय देखील येऊं नये ह्मणून त्याणें हें अजाणतेपणाचें पांघरूण घेतलें आहे; पण आंतून सर्व त्याच्याच खटपटी चालल्या आहेत. आतां माझें यांत काय कर्तव्य आहे, तें मी तुला सांगतें. **मालती** आणि **माधव** या उभयतांचा एकमेकांवर अनुराग आहे ही गोष्ट साऱ्या गांवभर लोकांना माहीत झाली असून तसें व्हावें हेंच आ-ह्मांला इष्ट आहे. आतां कांहीं युक्ति प्रयुक्ति करून राजा आणि **नंदन** या दोघांलाही जागच्या जागीं बसवून **मालती** आणि **माधव** या दोघांचा विवाह करून टाकायचा ह्मणजे झालें.'

'मी या कामांत पडलें आहे तरी मी देखील आपलें

अंग उघडपणें दाखविणार नाहीं. भूरिवसूचा आणि माझा किती स्नेह आहे, हें राजाला ऐकून ठाऊक आहे. तेव्हां मी खटपट करतें असें त्याला समजलें तर तो भूरिवसूच्या सांगण्यावरूनच मी त्या कामांत पडलें आहें, असें समजल्यावांचून राहणार नाहीं. व तसें झालें तर त्यांत भूरिवसूचें अहित असून माझेंही वजन कमी होईल, किंवा कांहीं तरी भलताच प्रसंग येईल, किंवा भूरिवसूविषयीं राजाचें मन शुद्ध राहणार नाहीं. ह्मणून मलाही मोठ्या बेताबातानें वागून पुरता कारस्थानीपणा स्वीकारिला पाहिजे. बुद्धिवान् पुरुष बाह्यात्कारें सर्व रीतीनें लोकांला गोड वाटेल,असें आपलें वर्तन ठेवून ज्या गोष्टीवरून लोकांला संशय येण्यासारखा असेल त्यांचीं द्वारें अगदीं गच्च बंद करून टाकतो ; आणि युक्तीनें दुसऱ्याला फसवून आपण अगदीं दूर राहून मनांतला हेतु सिद्ध करून घेतो; पण त्याबद्दल एक चकार शब्द देखील दुसऱ्याजवळ काढीत नाहीं. अशाच रीतीनें मीही या कामांत तटस्थ राहून आपला हेतु सिद्ध करून घेणार.'

यावर अवलोकिता ह्मणाली, 'भगवति, हा तुमचा हेतु अनुमानानें मीं यापूर्वींच जाणला आहे. तरी आपल्या तोंडानें काय तें समजून घ्यावें ह्मणून आतां मुद्दाम विचारलें. वरचेवर भूरिवसूच्या आणि तुमच्या गोष्टी चालत त्या मी ऐकत होतें, त्यावरून ही गोष्ट माझ्या लक्ष्यांत आली. आणि ह्याला अनुसरूनच आपल्या हेतु कांहीं तरी निमित्त करून माधवाला वरचेवर दिवाणजीच्या घरावरून घेऊन जाण्याचा मी मुद्दाम प्रसंग आणीत असतें.'

कामंदकी ह्मणाली, 'होय हें मलाही माहीत आहे.

**मालती**ची आवडती दासी **लवंगिका** हिणें मला परवां सहज सांगितलें कीं,—आतांशा आमच्या हवेलीजवळच्या रस्त्यानें **माधव** वरचेवर जात येत असतो. व जेव्हां तो त्या वाटेनें येतो तेव्हां अगदीं वरच्या मजल्याच्या खिडकींत उभी राहून **मालती** उत्सुक होऊन त्याच्याकडे एकसारखी पहात असते. व त्याचा प्रत्यक्ष कामासारखा सुंदर पुतळा पाहून **मालती** रतीसारखी उत्कंठित होऊन तळमळत असते.'

यावर **अवलोकिता** ह्मणाली, 'तें खरें आहे असें वाटतें. कारण, **मालतीनें** आपल्या मनाच्या विनोदाकरितां **माधवा**-ची तसबीर काढली असून ती **लवंगिकेनें मंदारिके**च्या हातीं दिली आहे.'

हें ऐकून **कामंदकी** अंमळ विचार करून ह्मणाली, 'हो हो. असें केलें असलें तर हें बरें झालें ह्मणायचें. कारण **माधवा**चा हुजऱ्या **कलहंसक**, ती विहारदासी[१] **मंदा-रिका** हिला भाळला असून तिच्याविषयीं त्याचा प्रयत्न चालला आहे, असें मीं ऐकलें. तेव्हां **लवंगिकेनें** तिच्या-जवळ तसबीर दिली असेल तर ती कांहीं प्रसंगानें **कलहं-सका**च्या दृष्टीस पडल्यावांचून राहणार नाहीं, व तो ती तसबीर **माधवा**जवळ नेल्यावांचून राहणार नाहीं! अर्थात् ह्या तसबिरीवरून **मालती** आपल्याविषयीं किती उत्कंठित आहे हें **माधवा**च्या लक्ष्यांत येईल.'

---

१ बौद्धधर्मीतील सन्यासी व सन्यासिणी ज्या जागीं रहात असत त्याला **विहार** ह्मणत. **मंदारिका** ही त्याठिकाणीं काम करणारी होती, ह्मणून तिला '**विहार**दासी' असें ह्मटलें आहे.

अवलोकिता ह्मणाली, 'भगवती, मी आज दुसरीच कांहीं योजना करून ठेविली आहे. मकरंदोद्यान नांवाच्या बागेंत आज मोठा उत्सव होणार आहे. तेथें मदनमहोत्सव आज बरेच दिवसपर्यंत चालत असून त्याची आज समाप्ति होणार. मालती आपल्या सख्यांसहवर्तमान तेथें जाणार असें समजल्यावरून मी माधवाला पुष्कळ सांगून त्याला उत्सव पाहण्यास जाण्याची भर दिली व त्याप्रमाणें तो तिकडे गेला देखील. तेव्हां सहज त्या दोघांची दृष्टादृष्ट तेथें होईल असें वाटतें.'

आपल्याला पाहिजे होतें, तेंच हिणें केलें असें पाहून कामंदकी तिला शाबासकी देऊन ह्मणाली, 'वत्से अवलोकिते, फार चांगलें केलेंस. मी न सांगतां केवळ तर्कानें माझा अभिप्राय जाणून तूं जी ही गोष्ट केलीस, तिच्या योगानें माझी पहिली शिष्यीण सौदामिनी हिची मला तूं आज आठवण दिलीस. ती ही अशीच हुषार होती. माझ्या मनांत काय आहे, तें धोरणानें समजून ती त्याला अनुकूळ अशा कांहीं गोष्टी न सांगतां करीत असे.'

यावर अवलोकिता ह्मणाली, 'हो, बरी आठवण झाली ! मी तें तुह्मांला सांगायला वरचेवर विसरतेंच. त्या सौदामिनीची हकीकत अलीकडे तुमच्या ऐकण्यांत आली नसेल. तिनें तर आताशीं मोठेंच प्रकरण आरंभिलें आहे. तिला पूर्वीपासून मंत्रशास्त्राचा नाद होता, हें तुह्मांला माहीत असेलच. नुकतेंच तिनें कांहीं मोठें अनुष्ठान केलें असून, त्याची तिला सिद्धि प्राप्त झाली आहे.

आणि सांप्रत ती [1]कापालिकाचें व्रत घेऊन **श्रीपर्वतावर** राहिली आहे असें समजतें!'

यावर **कामंदकीनें**—तुला ही गोष्ट कोणीं सांगितली? ह्मणून विचारलें. तेव्हां **अवलोकिता** ह्मणाली, 'या शहराच्या दक्षिणेस मोठी मसणवट आहे. तेथें **कराला** नांवाची मोठी उग्र **चामुंडा**[2] देवी आहे. तिच्या स्थानांत **श्रीपर्वताहून** कोणी साधक[3] आला होता. तो बहुतकरून

---

१ तांत्रिकमार्गांत निरनिराळे अनेक पंथ आहेत. **कापालिक** हा त्यांतीलच एक होय. हे लोक सार्वकाळ कपाल ह्मणजे कोणच्या तरी प्राण्याच्या डोक्याची कौंची हातांत धारण करीत असतात, ह्मणून ह्याला **कापालिक** ह्मणतात. या लोकांचीं कृत्यें फार भयंकर असतात. उग्र मंत्राचा प्रयोग करून मनुष्याला मारणें याची तर त्यांला मुळींच कांहीं पर्वा वाटत नाहीं. त्यांच्या पूजाअर्चा वगैरे कृत्यांत बळी अवश्य असलाच पाहिजे. इतरांपेक्षां मनुष्य प्राण्यांवर यांचा विशेष डोळा असतो!

२ सांप्रत कांहीं बायका डांकणी होतात अशी अशिक्षित लोकांची समजूत आहे. निदान उत्तर हिंदुस्थानांतील लोकांत तर ही समजूत विशेष आहे यांत कांहीं संशय नाहीं. **डांकणी** ह्या लहान पोराटोराला मारून खातात असें लोक समजतात. **कराला** ही त्यांची एक देवता आहे. इला संस्कृतांत **चामुंडा** अथवा **डांकिनी** असें सामान्य नांव आहे.

३ कोणत्या तरी मंत्राची सिद्धि होणें ह्मणजे—पाहिजे तेव्हां तो मंत्र जपतांच त्यापासून जें फळ प्राप्त होतें, असें शास्त्रांत सांगितलें आहे तें तत्काल प्राप्त होणें. अशी मंत्राची सिद्धि प्राप्त होण्याकरितां जो मनुष्य प्रयत्न करीत असतो त्याला **साधक** ह्मणतात. **अघोरघंटाला** आणखी कित्येक मंत्र सिद्ध झाले असून सांप्रत तो एका मंत्राच्या सिद्धीविषयीं प्रयत्न करीत होता, ह्मणून त्याला येथें '**साधक**' असें ह्मटलें आहे.

रात्रीचा संचार करीत असून **कराला** ज्या ठिकाणीं आहे, तिच्या जवळच एका जंगलांत तो रहातो. त्याचें नांव **अघोरघंट.** त्याच्याजवळ **कपालकुंडला** नांवाची एक त्याची शिष्यीण आहे. ती वरचेवर **करालेच्या** स्थानांत येत जात असते. तिणें ही **सौदामिनीची** गोष्ट सांगितली.'

हें ऐकून **कामंदकी** ह्मणाली, 'होहो! **कराला** नांवाची जाज्वल्य **चामुंडा** त्या स्मशानांत आहे, असें मी ऐकिलें आहे खरें. आणि ती पुष्कळ प्राण्यांचा बळी घेते, असेंही लोक ह्मणतात. **सौदामिनीची** हकीकत तूं तिच्या स्थानांत ऐकिलीस काय? तर बहुत करून ती खरी असली पाहिजे. ती **सौदामिनी** काय करील आणि काय नकरील याचा कांहीं नेम नाहीं. ती पाहिजे तें करील अशी माझी संभावना आहे.'

**अवलोकिता** ह्मणाली, 'ह्या गोष्टी असोत, ती कांहीं का करिना बापडी! त्यांत आमचें काय गेलें. आपण आपली गोष्ट बोलूं या. जसा **मालती** आणि **माधव** यांचा विवाह होणें आपल्याला इष्ट वाटतें, तसेंच त्या **माधवाचा** बालमित्र **मकरंद** हाही अविवाहित आहे. व **नंदनाची** बहीण सुस्वरूप असून उपवर झाली आहे. तेव्हां तिच्याशीं त्याचा विवाह होण्याचा योग घडून येईल तर तुह्मांला मोठा आनंद होऊन दुसरी एक आवडती गोष्ट झाली असें होईल नाहीं बरें?'

हें ऐकून **कामंदकी** ह्मणाली, 'मला आनंद होईल ह्मणजे यांत काय संशय? **माधवाच्या** संबंधानें मला **मकरंद** अत्यंत आवडताच आहे; पण मी याबद्दल अद्याप उदासीन राहिलें नाहीं. माझी प्रियशिष्यीण **बुद्धरक्षिता**

हिला मी त्या कामावर नेमली असून, ती त्याविषयीं प्रयत्न करीत आहे.'

हें ऐकून **अवलोकितेला** फार समाधान वाटलें. ती ह्मणाली, 'आपण ही फार चांगली व्यवस्था केली. **बुद्धरक्षिता** मोठी चतुर असून ती तो योग घडवून आणल्यावाचून राहणार नाहीं.'

यानंतर **कामंदकी** आणि **अवलोकिता** दोघीही पुढें काय करावयाचें याचा कांहीं वेळ विचार करून **माधवा**चा समाचार घेऊन नंतर **मालती**कडे जावें ह्मणून निघून गेल्या. **अवलोकितेनें माधवाला मकरंदोद्यानांत** पाठविलें होतें, हें वर सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें तो तिकडे गेला व तेथें **मालती**ची आणि त्याची दृष्टादृष्ट झाली. तेव्हां पासून तो तिच्या भेटीविषयीं अगदीं उत्कंठित होऊन वेड्यासारखा झाला. बागेतून परत घरीं आला; पण तेथें त्याला चैन पडेनासें झाल्यावरून पुनः ज्याठिकाणीं **मालतीचें** दर्शन झालें होतें, त्या **मदनोद्यानांत** जाऊन इकडे तिकडे संचार करून कसें तरी आपल्या जिवाचें समाधान करून घेत होता.

**मालतीनें माधवाची** तसबीर काढली होती ती **लवंगिकेनें मंदारिके**जवळ दिली, हें वर सांगितलेंच आहे. आषकमाषुकांचें संधान जमलेलें असलें ह्मणजे तेथें एकमेकांजवळ कांहीं पडदा राहत नाहीं. बारिक सारिक गोष्टी देखील तीं परस्परांला कळवितात. आपला यार **कलहंसक** हा **माधवा**चा चाकर असून **माधवाची मालती**वर विशेष प्रीति आहे, हें **मंदारिकेला** माहीत होतें. **मालतीनें** आपली तसबीर काढली हें पाहून **माधव** फार खुष होईल, व त्या-

योगानें आपल्या यारावर त्याची मोठी मेहेरबानी होईल, असें समजून **मंदारिकेला** **कलहंसका**ला ती तसबीर केव्हां दाखवीन, असें झालें होतें. तो भेटतांच आधीं तिणें ती तसबीर त्याच्या हातांत दिली.

**कलहंसका**ला तसबीर हातांत मिळतांच ती आपल्या धन्याला कधीं दाखवीन असें झालें! तो तसबीर घेऊन एकदम तेथून निघाला, तो थेट **माधवा**च्या बिऱ्हाडीं आला; पण **माधव** यावेळीं तेथें नव्हता. ह्मणून निराश होऊन त्याला आतां कोठें शोधावा? हा विचार करीत चालला होता. त्याणें **माधवाचीं** बसण्याचीं ठिकाणें होतीं तीं सर्व धुंडून पाहिलीं; पण त्याचा कोठें पत्ता लागला नाहीं. तेव्हां **कलहंसका**ला दम निघेनासा झाला. चहूंकडे फिरतां फिरतां तो अगदीं श्रमला होता.

त्याला वाटेंत **मदनोद्यान** लागलें. तेव्हां—घटकाभर येथें विश्रांती घेऊन पुढें जावें, असा विचार करून तो बागेंत गेला. तेथें चहूंकडे हिंडतां हिंडतां उदास होऊन ह्मणाला—बरें, साक्षात् मदनासारख्या सौंदर्यानें **मालती**च्या मनाला वेड लावून सोडणाऱ्या, आमच्या धन्याला आतां कोठें तरीं पाहूं? हावेळपर्यंत फिरतां फिरतां माझे पाय अगदीं थकून गेले; आतां मी घटकाभर या बागेंतच विश्रांती घेत धन्याची वाट पहात बसतों. उत्कंठित झालेल्या मनाची विश्रांती करण्याकरितां स्वारी कदाचित् इकडे येण्याचा संभव आहे. तेव्हां येथेंच बसावें, असा विचार करून तो एका झाडाखालीं विश्रांती घेत बसला.

यादिवशीं **माधव** एकटाच बाहेर फिरावयास गेला होता. **मकरंद** नेहमीं त्याच्याबरोबर असावयाचा; पण आज तो-

देखील नव्हता. **माधव** आपल्याला न सांगतां एकटाच कोठें निघून गेला ह्मणून **मकरंदा**नें शोध केला, तेव्हां तो **मदनोद्याना**ंत एकटाच गेला आहे, असें समजलें. तेव्हां त्याचा शोध करण्याकरितां **मकरंद**ही त्या बागेंत येऊन पोहोंचला. तो आपल्याशींच ह्मणाला, **अवलोकितेनें**-**माधव** येथें आला आहे, असें सांगितलें; पण मी इतका वेळ फिरून पाहिलें तरी अद्याप तो कोठें दिसत नाहीं. तेव्हां त्याला आतां कोठें शोधावा? बरें असो. तो उत्कंठित झाला आहे, तेव्हां कोठें तरी एके ठिकाणी बसून त्याला मुळींच करमायचें नाहीं. बहुतकरून चहूंकडे फिरून तो कसा तरी वेळ घालवीत असेल. तेव्हां आपण या येथें अगदीं नाक्यावर बसावें. कोणीकडूनही आला तरी तो या वाटेनें आल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां अर्थात् त्याची भेट होईल. उगीच इकडे तिकडे फिरत राहिलों तर मुळींच पत्ता लागायचा नाहीं. असा विचार करून **मकरंद** तेथें नाक्यावर एका झाडाखालीं **माधवा**ची वाट पहात बसला.

कांहीं वेळानें फिरत फिरत **माधव**ही तिकडेच आला. मानसिक व्यथेनें या वेळीं त्याचें शरीर अगदीं निस्तेज झालें होतें. दुरून त्याला पाहून **मकरंद** आपल्याशींच ह्मणाला, अरेरे! याची काय दशा झाली आहे ही? याचीं पावलें अगदीं हळूहळू पडत आहेत. आसमंतात् इतके पदार्थ आहेत तरी याला जणूं कांहीं ते दिसतच नाहींत! याचें शरीर अगदीं विकळ झालें आहे. वरचेवर श्वासोश्वास सोडतो आहे. तेव्हां याला हें असें झालें आहे तरी काय? अम्मळ विचार करून ह्मणाला, पण या संबंधानें इतका विचार मुळींच करायला नको. कारण, का-

सुंदर वस्तु मनांत भरून त्याविषयीं उत्कंठा उत्पन्न होणें व त्या वस्तूची प्राप्ति न झाल्यामुळें अशी स्थिति होणें हें अगदीं साहजिक आहे.

**मकरंद** आपल्याशीं असें बोलत आहे इतक्यांत **माधव** त्याच्या अगदीं जवळ येऊन पोहोंचला. यावेळीं तो नादिष्टासारखा होऊन आपल्याशींच कांहीं बोलत चालला होता. तो ह्मणाला, चंद्रासारखें जिचें मुख अत्यंत सुंदर आहे, अशा तिची (**मालतीची**) आठवण करून माझें चित्त कितीही प्रयत्न केला तरी मुळींच ठिकाणावर येत नाहींसें झालें आहे. एकवेळ तिच्या ठिकाणीं जें जडलें, तें कांहीं केल्या मागें ह्मणून फिरत नाहीं. आणि लज्जेला जिंकून व धैर्याला पिटाळून देऊन, विचारशक्तीला अगदीं मंद करून भलत्याच वेळीं मदनानें माझी अगदीं गाळण करून सोडली आहे. ह्या बागेंत मला तिचें दर्शन झालें त्यावेळीं माझें मन प्रथमच तिच्यावर गेलें. आणि तेव्हां त्याला तिचें तें रूप पाहून जो कांहीं विस्मय वाटला, त्या विस्मयाच्या रसांत निमग्न होऊन तें तेथें अगदीं निश्चल झालें. यामुळें विस्मयावांचून दुसरे विकार अगदीं नाहींसे झाले. अतिशय आनंद झाल्यामुळें अतिरिक्त लावण्यामृत प्राशनानें त्याला जडपणा आला आहे कीं काय असें वाटतें. अशी माझ्या हृदयाची स्थिति ती जवळ असतांना झाली होती; पण सांप्रत ती दिसेनाशी झाल्यामुळें इंगळ्यांत पडल्यासारखी त्याची स्थिति झाली आहे. हा काय चमत्कार! मी अद्याप बाळपणांतच आहें. असें असून मला हे विकार

इतक्यांतच कसे होऊं लागले कोणास ठाऊक ? असा विचार करीत करीत तो चालला आहे.

आपण जवळ असतांही आपल्याकडे पहात देखील नाहीं, असें पाहून **मकरंद** त्याला हाक मारून ह्मणाला, 'गड्या **माधवा,** पुढें कोठें चाललास ? असा इकडे ये.'

कांहीं तरी विचार करीत करीत जाणाऱ्या मनुष्याची दृष्टि बहुतकरून खालीं असते. त्याप्रमाणें **माधव** खालीं मान घालून चालला होता. **मकरंदानें** एकाएकीं त्याला हांक मारली तेव्हां दचकल्यासारखें होऊन त्यानें एकदम वर पाहिलें. इतक्यांत हंसत हंसत **मकरंद** पुढें येऊन त्यानें त्याचा हात धरिला आणि दोघेही एकमेकांला भेटले.

**मकरंद** ह्मणाला, 'सख्या **माधवा,** सूर्य अगदीं मध्यावर आला आहे. उन्हाचा ताप फार होतो आहे. तेव्हां आपण कोठें तरी एका झाडाखालीं घटकाभर विश्रांती घेत बसून ही उन्हाची वेळ टाळूंया. हें त्याचें सांगणें **माधवा**लाही मान्य झालें. तोही बराच वेळ भटकतां भटकतां थकला होता. तेव्हां दोघेही दाट सावलीच्या एका झाडाखालीं जाऊन बसले.

इकडे **कलहंसक** अम्मळ विश्रांती घेऊन पुनः **माधवा**चा शोध करण्यास निघाला. तों **माधव** आणि **मकरंद** एका सुंदर बकुळीच्या झाडाखालीं कांहीं बोलत बसले होते, ते त्याच्या दृष्टीस पडले. **माधवा**ला पाहून—मदनाच्या वेदनेनें खिन्न झालेल्या आपल्या डोळ्यांना सुख वाटण्याकरितां **मालतीनें माधवाची** तसबीर काढिली होती, ती लवकर त्याला दाखवावी ह्मणून तो गडबडीनें त्याच्याकडे येण्यास निघाला; पण पुनः त्याच्या मनांत असें आलें कीं, हा

फार वेळ श्रमून नुक्ताच विश्रांती घेत बसला आहे. तेव्हां अम्मळ त्याला स्वस्थपणीं विसावा घेऊं द्यावा, असा विचार करून तो एका कांचनार झाडाखालीं उभा राहिला.

इकडे **मकरंद** ह्मणाला, 'गड्या **माधवा**, आज ह्या नगरांतल्या स्त्रियांनीं मदनोत्सव केला, तो तूं पहायला गेला होतास. तेथून परत आल्यापासून तुझी वृत्ति कांहीं चमत्कारिक झाली आहे, असें मला वाटतें. रतिरमणाच्या बाणाच्या टप्प्यांत थोडा तरी तूं सांपडला आहेस, हें खरेंना?'

**मकरंद** हा **माधवाचा** अगदीं बालमित्र असल्यामुळें त्याच्याजवळ भीड धरण्याचें कांहीं कारण नव्हतें; तथापि त्या गोष्टी तशाच कांहीं चमत्कारिक आहेत कीं, केव्हां केव्हां त्यांत आपलीच आपल्याला लाज वाटते. मग मित्राची लाज वाटेल, यांत काय आश्चर्य! असो. **मकरंदानें** अगदीं मनांतली गोष्ट विचारल्यावरून **माधवाला** आनंद झाला, तरी तो लाजून खालीं पाहूं लागला. वस्तुतः त्याणें **मकरंदाच्या** प्रश्नाला होय किंवा नाहीं कांहीं उत्तर दिलें नाहीं; तरी त्यानें मान खालीं घातली, हें एक प्रकारचें उत्तरच मिळालें. व यावरून त्यानें विचारलेली गोष्ट खरी, असें सिद्ध झालें.

**मकरंद** हंसून पुनः त्याला ह्मणाला, 'अरे, तसें असेल तर त्यांत काय वाईट आहे? हें सुंदर मुखकमल खालीं घालून लाजण्याचें कांहीं कारण नाहीं. असें पहा, सामान्य रजोगुण तमोगुण यांणीं ग्रासलेले इतर मनुष्य आणि साक्षात् विश्वाला उत्पन्न करणारा **ब्रह्मदेव** या दोघांवरही ह्या मदनाचा प्रभाव सारखाच चालत आहे. ह्मणजे आ-

मच्या सारख्या मनुष्याला जशी कामाची पीडा होते, तशी **ब्रह्मदेवा**ला देखील होते! त्यांत लाजायचें कांहीं कारण नाहीं. तेव्हां खरें काय असेल तें सांग. ही गोष्ट चोरून ठेऊन त्याचा भलताच परिणाम व्हावा हें कांहीं चांगलें नव्हे.'

आपल्या मनांत ज्या कांहीं गोष्टी आल्या असतील त्या प्रियमित्राला सांगण्याविषयीं फार उत्कंटा असतेच. तशांतून त्यापासून कांहीं दुःख होत असलें तर मित्राला सांगितल्यानें कांहीं तरी चांगली युक्ति निघेल, ह्मणून **माधवा**ला—आपल्याला जी कांहीं स्थिति प्राप्त झाली होती, ती आपल्या मित्राला कळविणें विशेष इष्ट वाटलें. याबद्दल तो आपल्याला कदाचित् दोष देईल, ही त्याला भीति होती, ह्मणून हावेळपर्यंत त्यानें मौन धरलें होतें; पण तोही आपल्याला अनुकूळच आहे, असें पाहून **माधव** ह्मणाला, 'गड्या **मकरंदा**! सांप्रत माझी अवस्था अशी कां झाली आहे, हें तुला मी कां बरें सांगणार नाहीं? तुला न सांगणें ह्मणजे स्वतःच्या मनाला देखील चोरून ठेवण्याचा प्रयत्न केल्यासारखें होणार आहे. आतां मी तुला मुळापासून सर्व हकीकत सांगतों ती ऐक. **अवलोकिता** माझ्याकडे येऊन तिणें कामदेवाच्या उत्सवाची फारच तारिफ केली. यामुळें मला तो पहायला जाण्याविषयीं मोठें कौतुक वाटलें. तुला बरोबर घेऊन जावयाचें; पण तूं कोठें बाहेर गेला होतास व उत्सवाची वेळ होऊन गेली, तेव्हां मी एकटाच निघून गेलों. तेथें इकडे तिकडे पहात पहात बराच वेळ फिरून अनेक चमत्कार पाहिले. फिरतां फिरतां अम्मळ श्रम झाल्यासारखे वाटल्यावरून—ज्याच्या सुवासाला लुब्ध होऊन भ्रमर आस-

मंतात् घोंगावत आहेत, अशा एका बकुळीच्या झाडाखालीं थोडा वेळ विश्रांती घेण्याकरितां त्याच्या आळ्याच्या बांधावर जाऊन बसलों. यावेळीं मंद मंद वारा वहात होता. व त्याच्या योगानें जणुं काय रत्नांची वृष्टिच होत आहे, अशीं त्या झाडाचीं फुलें पटापट खालीं पडत होतीं. तीं पाहून बसल्यां बसल्यां एक सुंदर हार गुंफावा, असें माझ्या मनांत आलें. आणि जवळ पडलेलीं फुलें जमा करून मी हार गुंथूं लागलों.

थोडक्याच वेळानें भगवान् मकरकेतु कामराज याची सर्व जगाला जिंकावयास निघालेली केवळ पताकाच (निशाण) कीं काय अशी, बहुमोल हिरे माणिक इत्यादिकांचे अलंकार व उत्तम वस्त्रें इत्यादिकांनीं भरगच्च व सुंदर नटलेली असून नुकताच तारुण्याचा उदय जिच्या अंगांत होत आहे, अशी बरोबर दास दासी इत्यादि मोठा परिवार घेऊन कामदेवाच्या गाभाऱ्यांतून निघून परत आपल्या घराकडे चाललेली एक सुंदर कुमारी माझ्या दृष्टीस पडली! गड्या मकरंदा! तुला काय सांगूं. ती मनोहरत्वाची मुख्य देवता, किंवा सौंदर्याच्या साराचें केवळ स्थानच ह्मटलें तरी चालेल. तिची ती मनोहर मूर्ति उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवानें चंद्र, अमृत, कमल, विद्युल्लता इत्यादि उत्तम पदार्थ घेऊन साक्षात् मदनानेंच तिला घडविली असावी असें वाटतें! नाहीं तर जरठ ब्रह्मदेवाच्या हातून हें काम कधींही झालें नसतें.

नंतर ती आपल्या प्रिय मैत्रिणींसहवर्तमान हळूहळू चालत बागेंत संचार करूं लागली. मी ज्या बकुलवृक्षाखालीं बसलों होतों त्याचीं फुलें वरचेवर टपटप खालीं

पडताहेत असें पाहून, तिच्या मैत्रिणींला मोठें कौतुक वाटलें. त्यांनीं—गडे, थोडीं या बकुळीचीं फुलें वेंचून घेऊं या, असें सांगितल्यावरून सख्यांच्या आग्रहास्तव तीही त्याच बकुळीच्या जवळ आली. त्या वेळीं लक्ष्यपूर्वक तिला पाहण्याची उत्तम संधी मिळाल्यावरून मी आपला मनोरथ पूर्ण करून घेतला. त्या वेळची तिची स्थिति पाहिल्यावरून—कोणातरी भाग्यशाली मनुष्यावर बरेच दिवसांपासून तिचें मन जडलेलें असावें व त्यामुळें ती मदनाच्या व्यथेंत असावी, असें माझ्या लक्षांत आलें. कारण, चुरडलेल्या कमलिनीच्या देंठासारखें तिचें अंग अगदीं म्लान झालें होतें. सख्यांनीं आग्रह केला तर कोणतीही गोष्ट करण्याविषयीं तिची प्रवृत्ति होत असे; नाहीं तर ती अगदीं स्तब्ध राही. तिचें मुखकमल चंद्रासारखें दिसत असून नुकत्याच कापलेल्या हस्तिदंताच्या गाभ्यासारखे तिचे गाल पांढरे[1] फटिक दिसत होते.'

'गड्या, मला तर प्रथम तिचें दर्शन झाल्यापासून तिची मूर्ति माझ्या डोळ्याला अमृताच्या धारेसारखी निरतिशय आनंद देणारी झाली. चुंबकमणी जसा लोखंडाच्या वस्तूला आपल्याकडे आकर्षण करून घेतो, तसें माझ्या अंतःकरणाला तिनें अगदीं आकर्षण करून घेतलें. आतां फार काय तुला सांगूं. एका पुढें एक संतापाचीं कारणें उत्पन्न होऊन मोठ्या दुःखांत पडण्याकरितांच कीं काय, माझें मन तिच्या ठिकाणीं आसक्त झालें. याचा हेतु का-

१ सकाम होऊन विरहव्यथेंत असलेल्या स्त्रीच्या गालावर पांढुरकी येते, अशी प्राचीन कवींचीं समजूत असून त्याप्रमाणें अनुभवही आहे.

य हें मुळींच माझ्या लक्षांत येत नाहीं. आतां याचा परिणाम काय होणार कोणास ठाऊक! भवितव्यता बहुतकरून प्राणिमात्राचें कधीं शुभ व कधीं अशुभ करीत असते. तेव्हां तिच्या इच्छेप्रमाणें काय होणार असेल तें होईल!'

हें ऐकून मकरंद ह्मणाला, 'गड्या, तूं कांहीं काळजी करूं नकोस. स्नेह जो होतो, हा कांहीं बाह्य कारणावरून होतो, असें नाहीं. जो स्नेह केवळ बाहेरच्या गोष्टींवर अवलंबून असतो, तो खरा नसून फार वेळ टिकत-ही नाहीं. ज्या कारणाकरितां तो झाला असेल, तें झालें कीं तो स्नेह नाहींसा होतो. ज्याला कांहीं बाह्य कारण नसतें, तोच खरा स्नेह! दोन वस्तूंची जी परस्पर प्रीति जडते, तिला कांहीं तरी अंतर्गत हेतु कारण असतो. प्रीति बाहेरच्या गोष्टींवर मुळींच अवलंबून असत नाहीं. याविषयीं कमल, आणि चंद्रकांत यांचें उदाहरण घे ह्मणजे झालें. सूर्याचा उदय होतांच कमल प्रफुल्लित होतें, व चंद्राच्या उदयानें चंद्रकांत पाझरूं लागतो! वस्तुतः ह्या उभयतांच्या प्रीतीला बाहेरचा कांहीं संबंध आहे का? बरें, पुढें काय झालें तें सांग पाहूं.'

माधव ह्मणाला, 'नंतर भिवयांचे चाळे करून—तोच हा—असें ह्मणून तिच्या सख्यांनीं माझ्याकडे पाहून मला ओळखल्याची आपआपल्यांत खूण करून गालांतल्या गा-लांत हंसत हंसत त्या सर्व माझ्याकडे टक लावून पाहूं लागल्या.'

हें ऐकून मकरंद मनांत ह्मणाला, एकूण त्यांना ओळख देखील पटली. बरें, हा पुढें काय सांगतो तें ऐकूं या.

**माधव** ह्मणाला, 'बकुळीचीं फुलें वेंचण्याकरितां ह्मणून त्या तेथें आल्या होत्या; पण तें एकीकडेच ठेवून पायांतल्या पैंजणांचा झणझणाट व कंबरपट्ट्याला लावलेल्या लहान घंटांचा शब्द करीत करीत सर्व सख्या तिच्या भोंवतीं जमून—भर्तृदारिके! दैवानें आमचा मनोरथ पुरविला. हा पहा, येथेंच तो कोणाचा तरी कोण बसला आहे.—असें सांगून माझ्याकडे बोट दाखवून सख्यांनीं तिला कळविलें.

हें ऐकून **मकरंद** मनांत ह्मणाला, यावरून फार दिवसांचा अनुराग असून तो या वेळीं प्रगट झाला असावा, असें दिसतें.

**कलहंस** जवळच झाडाखालीं बसून या दोघांच्या गोष्टी ऐकत होता. कोणा स्त्रियेच्या संबंधाची रमणीय कथा चालली आहे, असें पाहून त्याणें यांच्याकडे विशेष लक्ष्य दिलें.

इकडे **मकरंदानें**—पुढें काय झालें तें सांगण्याविषयीं सूचना केल्यावरून **माधव** ह्मणाला, ' सख्यांनीं माझ्याकडे बोटें दाखवून तिला कळविलें; इतक्यांत तिणें जी कांहीं

---

१ आपल्या धन्याच्या मुलीला भर्तृदारिका—धन्याची कन्या-असें संबोधन देण्याची प्राचीन काळीं चाल होती, असें अनेक ग्रंथांवरून दिसून येतें.

२ मालती अविवाहित असून माधवाला तिनें मात्र आपल्या मनानें वरलें होतें. ही गोष्ट तिच्या सख्यांला माहीत होती; पण दुसऱ्या कोणालाही ठाऊक नव्हती. सख्यांनीं तुझा हृदयवल्लभ हा येथें बसला आहे, असें सांगावयाचें पण ही गोष्ट पोरीपोरींतलीच असल्यामुळें त्यांनीं नात्याचा निर्देश न करितां कोणाचा कोण असें ह्मटलें.

विचित्र लीला केली ती खरोखर माझ्यानें तर कांहीं वर्णवत नाहीं. त्या कमलपत्राक्षीचें—सात्विक असून अधीरपणा दाखविणारें व सर्वत्र अप्रतिहत असें मदनव्यथासूचक चेष्टित वर्णन करणें वाणीच्या शक्तीच्या बाहेरचें आहे. यामुळें तें कसें होतें, तें माझ्यानें कांहीं सांगवत नाहीं. ताठ उघडलेल्या, व भिवया वर केलेल्या, कमळाच्या कळ्यासारख्या लांब व दृष्टि सारखी लावल्यामुळें किंचित् आकुंचित अशा अनेक प्रकारच्या तिच्या सप्रेम अवलोकनांला मी पात्रभूत झालों. आणि तिच्या त्या मंद सुंदर अवलोकनांनीं माझें हृदय अगदीं अधीर किंवा कोणी चोरून नेलेलें; किंवा नाहींसें झालेलें, किंवा पिऊन टाकलेलें, अथवा मुळापासून उपटूनच टाकलेलें, अशी त्याची काय अवस्था झाली, तें कांहीं सांगवत नाहीं.'

'ह्याप्रमाणें सर्व प्रकारें मनांत भरणाऱ्या त्या सुंदरीचा आपल्यावर कांहीं स्नेह आहे, अशी संभावना करून मी तर तत्काल तिचा दास बनलों व त्याबरोबर माझ्या चेष्टा कांहीं निराळ्याच प्रकारच्या होऊं लागल्या. पण तो आपला उतावळेपणा कोणाच्या लक्षांत येऊं नये ह्मणून मोठ्या जोरानें मनाला आंवरून मुकाट्यानीं हातांत घेतलेला तो हार कसा तरी पुरा केला. इतक्यांत पुष्कळ बंदे चोपदार, भालदार, वगैरे तिचा परिवार तेथें आला. आणि त्यांणीं तिला सख्यांसहवर्तमान श्रृंगारलेल्या हत्तिणीवर रत्नखचित अंबारींत बसविलें. व क्षणमात्रानें शहराकडे जाणाऱ्या मार्गाला त्या इंदुमुखीनें अलंकृत केलें. जेव्हां ती जाऊं लागली, तेव्हां ज्याचा देंठ वांकडा केला आहे, अशा कमळासारखें आपलें मुख मान वळवून वेरचवर माझ्याकडे पाहून-

ज्याला अमृत आणि विष दोन्हीही लागलीं आहेत, असा कटाक्षबाण तिनें माझ्या छातींत अगदीं खोंचून मारला !'

'तेव्हांपासून माझी स्थिति काय झाली आहे, ह्मणून सांगूं! माझ्या अंतरांत जो कांहीं विकार होत आहे तो केवढा मोठा आहे हें कांहीं मला कळत नाहीं. त्याचें वर्णन करावें ह्मटलें तर तो वाणीला विषय होत नाहीं. इतकेंहीं असून यावज्जन्मांत पूर्वीं कधींहीं मला त्याचा अनुभव घडलेला नाहीं. आणि तो विकार उत्पन्न झाल्यापासून माझी विचारशक्ति अगदीं नष्ट होऊन मला मोहरूपी गाढ अरण्यांत पडल्यासारखें वाटतें. व एक प्रकारचें विलक्षण जाड्य आलें असून वरचेवर संताप होतो. माझ्या डोळ्यांसमोर असलेले पदार्थ—ते अमुचक आहेत, असें मला कळत नाहीं! ज्या विषयाचा मी पुष्कळ अभ्यास केला आहे, तो देखील पूर्वीप्रमाणें स्मरत नसल्यावरून माझें मन विरस होतें. अगदीं गार पाण्याच्या सरोवरांत जाऊन बसलों किंवा चांदण्यांत बसलों तरी संताप कमी होत नाहीं. आणि माझें मन अधीर होऊन कोठें तरी फिरत असतें, व कसल्या तरी एका गोष्टीच्या सतत नादांत निमग्न असतें!'

---

१ पूर्वकाळीं लढाईच्या कामांत बाणांचा विशेष उपयोग करीत असत. बाणांच्या फाळांला बहुतकरून कांहीं तरी विषारी पदार्थ लावण्याची चाल असे. कारण, बाण अंगांत शिरला ह्मणजे त्यांच्याबरोबर विषाचा संचार होऊन तो मरावा, असा हेतु. येथें कटाक्षावर बाणाचें रूपक करून त्याला अमृत आणि विष दोन्हीही लागलीं होतीं, असें ह्मटलें आहे. कारण तिच्या कटाक्षरूपी बाणानें माधवाला त्यावेळीं अतिशय सुख झालें. व तिची प्राप्ति न झाल्यामुळें यावेळीं तो दुःखांत आहे. तेव्हां त्या कटाक्षरूप बाणाला अमृत आणि विष हे दोन्हीही पदार्थ लागले होते असें त्यानें मानलें.

घनीसाहेबाचें मन चोरून नेलें आहे असें वाटतें. अशी चतुर स्त्री कोण असावी बरें ? कदाचित् ती **मालती** तर नसेल ना ?

इकडे **मकरंद** माधवानें सांगितलेली सर्व हकीकत ऐकून आपल्याशींच ह्मणाला, जिचें ह्यानें वर्णन केलें तिच्यावर ह्याची फारच आसक्ति आहे असें वाटतें. तेव्हां यावेळीं याचा आपण निषेध करावा कीं काय ? पण खरें ह्मटलें तर तसें करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. 'तुला मदनाच्या वियोगानें मोह उत्पन्न होऊं देऊं नकोस. तुझी बुद्धि कामविकारांनीं मलीन होऊं देऊं नकोस,' असें कांहीं सांगावें तर तें यावेळीं अगदीं निरर्थक होणार आहे. कारण कामानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून ह्याच्यावर बाणाचें लक्ष्य धरलें आहे, व ज्वानीचा ऐन बहर आहे. तेव्हां तसल्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. असा विचार करून त्याला ह्मणाला, 'हें तूं सर्व सांगितलेंस पण ती कोणाची कोण हें कांहीं तुला कळलें का ?'

यावर माधव ह्मणाला, 'गड्या, ऐकून घे. तेंही तुला सांगतों. ती हत्तिणीवर बसून जाण्याच्या वेळींच तिच्या पुष्कळ सख्यांतून एक दासी मुद्दाम त्या बकुळीचीं फुलें वेंचण्याच्या निमित्तानें मागें राहिली. नंतर सगळी मंडळी पुढें गेली असें पाहून माझ्या जवळ येऊन तिनें मला नमस्कार केला. आणि मला ह्मणाली, हे महाभागा, गुण (दोर) सारखा असून सुमनांची (फुलांची) गुंथणी एकसारखी झाल्यामुळें हा तुमचा हार फार रमणीय दिसतो

आहे. आमची **भर्तृदारिका** हा हार धारण करण्याविषयीं फार उत्सुक आहे. तिचा हा नवीनच कुसुमेषुव्यापार (फुलांवर प्रीति अथवा कुसुमेषु ह्मणजे मदन, त्याचा व्यापार) आहे. तेव्हां हा हार गुंफण्याच्या कामांत आपलें जें चातुर्य विशेष दिसून येतें, त्याचें साफल्य होवो! ब्रह्मदेवाचें कौशल्य सफल होऊंद्या! आमच्या **भर्तृदारिकेच्या** कंठाला मिठी मारण्याचा अलभ्य लाभ याला घडूंद्या, असेंही ती ह्मणाली.'

हें तिच्या तोंडचें भाषण ऐकून **मकरंदाला** मोठें आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, 'अरे, किती तरी हें तिचें चातुर्य! बरें; पण तिणें पुढें काय सांगितलें तें सांग.'

**माधव** ह्मणाला, 'मी तिचा अभिप्राय तेव्हांच समजलों. आणि हार देण्याचें कबूल करून—ती हत्तिणीवर बसून गेली ती कोण कोणाची वगैरे विचारिलें. त्यावरून तिनें—ती अमात्य **भूरिवसूची** कन्या. तिचें नांव **मालती**. मी तिची अत्यंत विश्वासू सखी आहें. माझें नांव **लवंगिका**, असें सांगितलें.'

**मालतीचें** नांव ऐकण्याबरोबर इकडे **कलहंस** आनंदित होऊन आपल्याशींच ह्मणाला, अरे! हावेळपर्यंत मी मोठ्या संशयांत होतों. कारण, माझ्या धन्याला वेड लावणारी कोण हें मला समजलें नव्हतें; पण आतां त्याचा खुलासा झाला. ती **मालतीच** आहे. कामदेवानें आमच्यावर मोठा अनुग्रह केला. माझ्या धन्याचें **मालतीवर** मन बसलें आहे, हें ऐकून माझी धास्ती मिटली. आतां आह्मीं सर्वांला जिंकलें, असें ह्मटलें तरी हरकत नाहीं.

इकडे **मकरंद** ह्मणाला, 'अमात्य **भूरिवसूची** मुलगी असें

तिणें सांगितलें, यावरून ती फारच मोठ्या योग्यतेची आहे. मी तिला कधीं पाहिलें नाहीं, किंवा पाहिलें असलें तरी—अमुकच ती, असें माझ्या ध्यानांत नाहीं; पण भगवति **कामंदकी**–**मालती**—ह्मणून वरचेवर तिचें नांव घेत असते तीच ही असावी. पण गड्या, तीच असली तर मी तिच्या संबंधानें दुसरीच एक गोष्ट ऐकिली आहे. राजा **चंद्रकेतूनें नंदना**-करितां तिची मागणी केली आहे, असें लोक बोलतात!'

**माधवाला मकरंदानें** सांगितलेली लोकवार्त्ता ऐकून खरोखर मोठा खेद झाला असता; पण त्याचें तिकडे लक्ष्यच नव्हतें. तो आपल्याच नादांत असल्यामुळें **मकरंदानें** सांगितलेली गोष्ट खरी कीं खोटी याविषयीं त्यानें मुळीं विचार देखील केला नाहीं. तो आपलीच हकीकत सांगूं लागला. तो ह्मणाला, 'सख्या **मकरंदा**, यापुढें काय झालें तें ऐक. याप्रमाणें त्या **लवंगिकेनें** भीड घातली. तेव्हां मी तो हार आपल्या गळ्यांतून काढून तिला दिला. तेव्हां ती माझ्याकडे सारखी दृष्टि लावून **मालती** फार दूर जाईल ह्मणून तिच्या वाटेकडे डोळ्याच्या कोरेनें पहात पहात—हा मोठाच प्रमाद आहे, असें बोलून मोठ्या नम्रतेनें मला नमस्कार करून लगबगीनें निघून गेली. इतक्यांत फौजेच्या गर्दीमुळें फार खेटाखेट झाली, आणि त्यांत ती कोठें चुकली कोणास ठाऊक. नंतर मीही हळूहळू परत घराकडे गेलों.'

**मकरंद** ह्मणाला, 'गड्या, तूं जी हकीकत सांगितलीस तीवरून ती **मालती** तुझ्यावर अनुरक्त झाली आहे, यांत कांहीं संशय नाहीं. आणि तिच्या गालावर पांढुरकी आली होती, इत्यादि चिन्हें तूं सांगितलींस त्यावरून पूर्वी-

पासून, तिच्या मनांत कामविकार वृद्धिंगत झाला असून तो तुझ्याच निमित्तानें झाला असावा असें वाटतें! पण तूं कोठें तिच्या दृष्टीस पडला होतास, हें कांहीं समजत नाहीं. तिच्या सारख्या उदार मनाच्या कुलीन कन्या एके ठिकाणीं आसक्त होऊन दुसऱ्यावर डोळा ठेवितील, असें कधींहीं होणार नाहीं. आणखी तुला पाहून तिच्या सख्यांनीं आपआपल्यांत खुणा केल्या, हें पूर्वींच्या स्नेहाचें मुख्य चिन्ह आहे. पुढें—कोणाचा तरी कोण, असें सांगितलें, व त्यानंतर **लवंगिकेनें** मोठें खुबीदार भाषण केलें, यावरून तिचा तुझ्यावर अनुराग असून तो फार दिवसांचा आहे, यांत कांहीं संशय नाहीं.'

**कलहंसक** तसबीर दाखविण्याची संधीं मिळेल ह्मणून टपत बसला होता. त्यानें—ही वेळ चांगली आहे असें पाहून तसबीर घेऊन एकदम पुढें येऊन—हें चित्र घ्या—असें सांगून तसबीर त्यांच्या हातांत दिली. दोघेही त्या तसबिरीकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागले. **मकरंदानें**—ही **माधवाची** तसबीर कोणी काढिली? ह्मणून विचारलें. तेव्हां **कलहंसक** ह्मणाला, 'दुसरें कोण काढणार! जिणें त्यांचें हृदय चोरून नेलें तिणेंच काढली.'

**मकरंद** ह्मणाला, 'अरे काय ह्मणतोस? त्या **मालती**-नेंच का ही तसबीर काढिली?'

यावर **कलहंसकानें**—खुद्द तिच्याच हातची ही तसबीर ह्मणून सांगितलें. तें ऐकून **माधव** खुष होऊन ह्मणाला, 'गड्या **मकरंदा**! तुझा तर्क बहुतकरून खरा आहे असें वाटतें.'

**मकरंदाला** आणखी विशेष चौकशी करावयाची होती.

दिली, असें तिणें मला सांगितलें.'

हें ऐकून **मकरंद** ह्मणाला, 'ही **माधवाची** तसबीर **मालतीनें** काढिली; याबद्दल **मंदारिकेनें** तुला कांहीं सांगितलें आहे काय?'

**कलहंसक** ह्मणाला, 'तिच्या जिवाला चैन पडेना ह्मणून मनाच्या करमणुकीकरितां तिणें ही तसबीर काढिली, असें **मंदारिका** सांगत होती.'

हें ऐकून **मकरंदाला** फारच आनंद झाला. तो **माधवाच्या** हातावर हात देऊन ह्मणाला, 'गड्या, आतां तूं अगदीं काळजी करूं नकोस. जी तुझ्या डोळ्याला आनंद देणारी चंद्रिका झाली आहे, तिला तूंही मनोरथ करण्याला आधार झाला आहेस. यावरून तुला तिचा समागम होईल, याबद्दल कांहीं संशय नाहीं. कारण, अनुकूळ दैव आणि मदन या दोघांनीं याकामीं कंबर बांधली आहे. तेव्हां याविषयीं आतां काळजी करावयास नको. तर जिचें स्वरूप पाहण्याविषयीं तूं उत्कंठित झाला आहेस, व तुझ्या मनांत विकार उत्पन्न करण्याविषयीं जी कारण झाली आहे, त्या **मालतीचें** तूंही याच फळीवर चित्र काढ!'

**माधवाला** हें इष्टच होतें. त्यांतून **मकरंदानें** मुद्दाम सांगितल्यावरून—तुझी मर्जी असेल तर काढितों, असें सांगून **कलहंसकाला** त्यानें चित्र काढण्याचें साहित्य आणावयास सांगितलें. तोही चतुरच होता. **मालतीनें** काढलेलें हें चित्र दाखविलें ह्मणजे बहुतकरून हा प्रसंग येणार,

काढूं लागला.

यावेळीं वरचेवर त्याचे डोळे प्रेमानें भरून येत होते. तो **मकरंदा**ला ह्मणाला, 'सख्या **मकरंदा**, माझ्या डोळ्यांतून वरचेवर प्रेमाश्रूंच्या धारा निघत असून त्यांनीं डोळे अगदीं भरून जात आहेत. मनांत तिच्या भेटीविषयीं संकल्प होऊन एक प्रकारचें जाड्य आलें आहे. व त्याच्या योगानें अंग अगदीं जड झालें आहे. हाताला वरचेवर घाम येऊन बोटें कांपत आहेत. चित्र काढण्याच्या कामांत हात एकसारखा चालत नाहीं. तथापि एकदां कसें तरी काढायचें असा मीं निश्चय केला आहे,' असें सांगून शेवटीं **माधवा**नें बराच वेळ खटपट करून **मालती**ची तसबीर काढण्याचें काम पुरें करून ती **मकरंदाला** दाखविली.

कोणत्याही उत्तम चित्रकारानें मनांत आणलें तर तो पाहिजे तसें चित्र काढील. ह्मणजे एखाद्या कुरूप मनुष्याला सुरूप बनवील व सुरूप असला तरी त्याला कुरूप बनवील हें खरें आहे. तरी प्रकृत प्रसंगीं तशी कल्पना करण्याला मुळींच जागा नव्हती. **मालती** मुळींच अतिशय सुस्वरूप होती. यामुळें चित्रकाराला आपलें कौशल्य खर्च करून तिला सुस्वरूप बनविण्याचा प्रयत्न करण्याचें कांहीं कारण नव्हतें. तशांतून चित्रकार स्वतः **माधव** होता. त्याला तिचें दर्शन होत नाहीं; ह्मणून त्याच्या ध्यानांत जी तिची मूर्ति प्रतिबिंबित झाली





होती, तीच त्याणें फळीवर काढली असून ती केवळ आपल्या मनाच्या विश्रांतीकरितांच होती. ह्मणून तींत अधिक कारागिरी त्यानें दाखविली असेल, असें मुळींच ह्मणतां येत नाहीं.

मकरंदानें तसबीर हातांत घेऊन पाहिली तेव्हां तो तिचें सौंदर्य पाहून चकित झाला. कांहींवेळ तसबिरीकडे लक्ष्यपूर्वक पाहून ह्मणाला, 'गड्या, तुझें मन हिच्यावर आसक्त झालें हें अगदीं योग्य आहे. असें अनुपम लावण्य असल्यावर तुझ्यासारख्या रंगेल्या पुरुषाचें मन तेथें आसक्त झालेंच पाहिजे. पण खरेंच विचारतों, ती इतकी का सुंदर आहे?'

माधव ह्मणाला, 'गड्या, तुला काय सांगूं! तिचें सौंदर्य किती आहे, त्याचें माझ्यानें वर्णन करवत नाहीं. तिची अगदीं हुबेहुब तसवीर माझ्या मनावर मात्र रेखलेली आहे. ती ह्या फळीवर उठवितां येत नाहीं. ह्या तसबिरींत तुला जें कांहीं व्यंग दिसेल तें माझ्या आडाणीपणामुळें तसें झालें आहे असें समज. मूळांत काडीमात्र उणीव नाहीं.'

माधवानें त्या तसबिरीखालीं तितक्यांतल्या तितक्यांत एक श्लोक करून घातला होता. तो वाचून मकरंदाला फारच आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, 'अरे, तूं अगदीं शीघ्रकवि आहेस. इतक्या अल्प अवकाशांत तूं हा श्लोक देखील उत्तम रचलास.' याप्रमाणें आपआपसांत मालतीच्या स्वरूपाचें वर्णन करीत व तिच्यासंबंधाच्या कांहीं गोष्टी बोलत उभयतां मोठ्या आनंदांत होते. इतक्यांत त्यांच्या मनाला विशेष उल्हास उत्पन्न करणारी दुसरी एक त्यांची साह्यकर्ती तेथें आली.

**मालतीनें** काढलेली तसबीर **माधवा**कडे कोणत्या द्वारानें आली हें वर सांगितलेंच आहे. **मंदारिकेनें कलहंस**-काजवळ दिली होती ती—**माधवा**पर्यंत पोहोंचून आपल्यावर **मालतीचा** अनुराग आहे, हें त्याला कळावें, ह्मणूनच तिणें दिली होती. पण ही गोष्ट तिला उघडपणें बोलतां मात्र येत नव्हती. जशी **मालतीनें माधवाची** तसबीर काढली तशी तो–ही तसबीर पाहील तर, तिचीही काढल्यावांचून राहणार नाहीं,हेही **मंदारिके**च्या लक्षांत आलें होतें. व त्यानें याप्रमाणें केलें ह्मणजे आपण ती तसबीर पुनः **मालती**कडे पोहोंचती करावी; ह्मणजे अर्थात् आपल्याकडून तिची मोठी कामगिरी बजाविण्यांत आली असें होईल. अशा पुष्कळ गोष्टी **मंदारिके**च्या मनांत घोळत होत्या.

राजवाड्यांत व मोठमोठ्या सरदार वगैरे लोकांच्याजवळ राहणाऱ्या कुंळबिणी, बटकी, बंदे वगैरे चाकर लोक मोठे हुषार असतात. त्यांला प्रसंगीं कसें वर्तन केलें पाहिजे तें सांगावें लागत नाहीं. आपला यार **कलहंसक** तसबीर घेऊन गेला आहे तो बहुतकरून आपल्या धन्याकडेच गेला असेल, ह्मणून **मंदारिका** मोठ्या लगबगीनें **माधव** आणि **मकरंद** जिकडे होते तिकडे जाण्यास निघाली, ती थेट बागेंत येऊन पोहोंचली. तेथें अलीकडच्या बाजूला **कलहंसक** उभा होता तो तिच्या दृष्टीस पडला; पण **माधव** आणि **मकरंद** हे झाडाच्या आड असल्या मुळें तिच्या दृष्टीस पडले नाहींत.

बंदे कुंळबिणी वगैरे चाकर यांचें परस्पर मेतकूट जमलेलें असलें ह्मणजे त्यांच्यांतही विनोद चालतो व तो अर्थात् यांच्या जातीच्या वगैरे संप्रदायाप्रमाणेंच असतो. **मंदारिका**

कलहंसकाला पाहून ह्मणाली, 'हां हां! तुला मी कसें गांठलें पहा! तुझीं पावलें ओळखीत ओळखीत सरळ येथें आलें.'

ती आणखीं कांहीं बोलली असती, पण इतक्यांत कलहंसकानें आपला धनी जवळ असल्याची खूण केल्यावरून ती त्याला पाहून चपापली, आणि पदर सांवरून लाजत लाजत तिणें त्या दोघांलाही मुजरा केला. मोठ्या लोकांच्या इथें कुळंबिणी वगैरेंचा बराच सुळसुळाट असतो, व त्यांच्या द्वारानें पुष्कळ महत्वाचीं कामें होत असतात. माधव यावेळीं कार्यार्थीच होता. त्यामुळें अर्थात् मंदारिकेला थोडें गौरविणें त्याला जरूर होतें, ह्मणून त्याणें तिला बसवून घेतलें. तिणें इकडे तिकडे पाहिलें तों—कलहंसकाजवळ आपण दिलेली तसबीर माधवाजवळ असल्याचें तिच्या दृष्टीस पडलें.

आपल्या अनुमानाप्रमाणें माधवानें तिच्यावर मालतीची तसबीर काढली होती ती पाहून मंदारिका मनांत फार खुष झाली. तिच्या मनांत ती तसबिरीची पाटी परत मालतीकडे पोहोंचवायची होती, पण मुद्दाम मागून घेणें शोभत नाहीं ह्मणून तिणें दुसरीच युक्ति केली. कलहंसकाकडे पाहून ह्मणाली, 'ही माझी चित्राची पाटी तूंच येथें आणलीस असें वाटतें. तुला कोणी बरें आणावयास सांगितली होती? आतां ती मुकाट्यानें दे माझ्याजवळ. नाहीं तर पहा कसें करीन तें.'

कलहंसकही अशा कामांत तरबेजच होता. तो चित्राची पाटी हातांत घेऊन रागारागानें—घेघे! कोणाला पाहिजे तुझी पाटी!—असें बोलून त्यानें ती मंदारिकेच्या हातांत दिली.

त्या पाटीवर मालतीचें चित्र काढलेलें होतें. तें

कोणी काढलें होतें, व कशाकरितां काढिलें होतें हें ह्मणजे मंदारिकेला ठाऊक नव्हतें असें नाहीं. तरी मुद्दाम ती कलहंसकाला ह्मणाली, 'अरे, ही मालतीची तसबीर येथें कोणी काढली? आणि ती कां काढली?'

कलहंसक ह्मणाला, 'कां ह्मणजे काय? मालतीनें ज्याची ( माधवाची ) ज्या निमित्तानें तसबीर काढली, त्यानें ( माधवानें ) त्याच निमित्तानें मालतीची तसबीर काढली. त्यांत वाईट काय झालें?'

हें ऐकून मंदारिकेला फार आनंद झाला. ती ह्मणाली, 'सृष्टि करणाऱ्या ब्रह्मदेवाचें सर्व चातुर्य पूर्णपणें येथें सफल झालें आहे.'

मकरंदाला मंदारिकेकडून दुसऱ्या एका गोष्टीचा खुलासा करून घ्यावयाचा होता. कलहंसकानें—स्वतः मालतीनेंच माधवाचें चित्र काढलें आहे, असें सांगितलें. तर तिणें माधवाला कोठें पाहिलें असेल याविषयीं त्याला संशय होता. कारण मदनोद्यानांत प्रथमच परस्परांची दृष्टादृष्ट झाल्याचें माधवानें सांगितलें होतें. तरी त्यावेळीं इतकें लक्ष्यपूर्वक माधवाला पाहण्याचा तिला अवकाश मिळण्याचा संभव नव्हता. अगदीं हुबेहुब तसबीर उठविण्याला दृष्टीचा आणि त्या वस्तूचा बराच परिचय व्हावा लागतो. हें संशयाचें कारण होतें.

माधवाला तरी कायतें एक वेळच व त्या यात्रेंत तिचें दर्शन झालें होतें. पण पुरुषांला भीड अम्मळ कमी असते. ते एखाद्या मनोहर स्त्रीकडे टक लावून पुष्कळ वेळ पाहूं शकतील. स्त्रियांच्या हातून तसें व्हावयाचें नाहीं. ज्याच्यावर त्यांचें मन बसलें नसेल, किंवा त्याच्या-

विषयीं मनांत कांहीं कल्पना नसेल त्याच्याकडे त्या कदाचित् लक्ष्यपूर्वक पाहूं शकतील; पण आपल्या हृदयवल्लभाकडे त्यांच्यानें टक लावून कधींही पाहवणार नाहीं. त्यांना डोळेभर पाहण्याची विशेष उत्कंठा असते; पण ती त्या त्याची दृष्टि चुकवून पूर्ण करून घेतात. असा कुलस्त्रियांचा स्वाभाविक क्रम असल्यामुळें **मालती**च्या दृष्टीला **माधवा**च्या रूपाचा इतका परिचय कसा झाला, याविषयीं **मकरंदा**ला शंका आली ती योग्यच होती.

तो **मंदारिके**ला ह्मणाला, 'अग, ह्या तसबिरीविषयीं हा तुझा मित्र ( **कलहंसक** ) काय सांगतो तें खरोखर तसेंच आहे काय?'

**मंदारिका** ह्मणाली, 'होय महाभागा, त्यांत कांहीं खोटें नाहीं.'

**मकरंद** ह्मणाला, 'पण **मालतीनें माधवाला** इतकें लक्ष्यपूर्वक कोठें पाहिलें असेल बरें?'

**मंदारिका** ह्मणाली, 'मला तें कांहीं माहीत नाहीं. पण माझी मैत्रीण **लवंगिका** ही—खिडकींतून पुष्कळ वेळां पाहिलें आहे—ह्मणून सांगत होती.'

हें ऐकून **मकरंद माधवा**ला ह्मणाला, 'गड्या, दिवाण साहेबांच्या हवेलीजवळच्या रस्त्यानें आपण बहुतकरून जातों येतों; तेव्हां तिणें पाहिलें असावें. बरोबर, हें जुळतें खरें. यावरून **मंदारिका** म्हणते तें खरें असावें. यांत संशय नाहीं.'

कामी पुरुषाला आपलें जिच्यावर मन बसलें असेल तिचें आपल्याकडे किती लक्ष्य आहे, हें समजून घेण्याची किती उत्कंठा असते, याविषयीं येथें कांहीं विशेष वर्णन

करावयास नको. खिडकींत बसून **मालती** आपल्याकडे पाहत होती, हें ऐकून **माधवा**ला फारच आनंद झाला. व त्याच्या अनुरागांत विशेष भर पडण्याला हें एक कारण झालें.

**मंदारिके**ला ती चित्राची फळी **मालती**कडे कधीं पोहोंचवीन असें झालें होतें. तिनें—मला आपला हुकूम व्हावा. हें कामराजाचें चरित्र ( **मालती** आणि **माधव** ह्या आषुकमाषुकांनीं काढलेल्या एकमेकांच्या तसबिरी) माझी प्रियसखी **लवंगिका** हिला लौकर दाखवावें, असें माझ्या मनांत आहे, अशी त्या उभयतांला विनंती केली.

यावर **मकरंद** ह्मणाला, ‘ होहो ! यावेळेस तसें करणें तुला उचितच आहे.’ **माधव** आणि **मकरंद** या उभयतांचा निरोप घेऊन व चित्रांची पाटी पदराखालीं झांकून घेऊन **मंदारिका** लौकर **लवंगिके**कडे गेली.

दोनप्रहरचा समय झाला असें पाहून **मकरंद माधवा**ला ह्मणाला, ‘ गड्या, आपले किरण प्रखर करून हा सूर्य आकाशाच्या मध्यावर आरूढ झाला आहे. तेव्हां लौकर घरीं जाऊं या.’

**माधवा**चें चित्त मुळींच ठिकाणावर नव्हतें. तो **मकरंदा**नें सांगितल्यावरून घरीं जाण्यास निघाला. हृदयवल्लभेकडे ज्यांचें मन गुंतलेलें असतें त्यांला प्रत्येक गोष्टींचा संबंध तिच्याकडे लावावा, असें वाटत असून ते सर्व गोष्टी तन्मय पाहत असतात. वस्तुतः या दोनप्रहरच्या समयाचा **मालती**कडे कांहीं संबंध लावण्याचें विशेष कारण नव्हतें; पण **माधवा**ला तिच्यावांचून दुसरें कांहीं दिसतच नव्हतें. तो ह्मणाला, ‘ सख्या **मकरंदा**, या वेळच्या स्थितीवरून मला असें वाटतें कीं त्या माझ्या प्रियेला या वेळच्या उष्ण

असतील! त्या धामाच्या आंधळींनीं पुसून गल्यामुळें तिच्या सख्यांचें कौशल्य नाहींसें झालें असेल, नाहीं बरें?'

वाऱ्याला, उद्देशून ह्मणाला, 'हे पवना! तिनें आपल्या अंगावर धारण केलेल्या नुकत्याच उमललेल्या कुंदपुष्पांच्या आंतील मकरंदाचा सुवास ग्रहण करणारा तूं, जिचे नेत्र अंमळ चंचळ आहेत व मानसिक व्यथेनें व उरस्थळाच्या भारानें जिचें अंग अंमळ वांकल्यासारखें दिसत आहे, अशा त्या माझ्या प्रियेला स्पर्श करून तसाच येऊन माझ्या अंगाला स्पर्श कर; ह्मणजे हा असह्य दाह थोडा तरी शांत होईल!'

त्याची ती अवस्था पाहून **मकरंद** ह्मणाला, 'ह्या उच्छृंखल वर्तन करणाऱ्या मदनाचें मला मोठें आश्चर्य वाटतें. हा आपल्याला त्रैलोक्याला जिंकणारा शूर ह्मणवितो; असें असून ह्या नाजुक प्रकृतीच्या **माधवावर** निःशंकपणें कसा प्रहार करितो! जसा हत्तीच्या लहान छाव्याला—ज्याच्यावर कांहीं एक उपाय चालत नाहीं असा वातज्वर, सपाट्यासरसा मारतो, तसा हा आतां काय करील कोणास ठाऊक. ह्या प्रसंगीं भगवति **कामंदकी**वांचून दुसरें कोणी आमचें रक्षण करणार नाहीं.'

**मकरंद** काय ह्मणाला, तें माधवाच्या गांवीं देखील नव्हतें. तो पुनः आपल्याशींच ह्मणाला, हें काय आश्चर्य आहे तें कोणास ठाऊक! मी तिला डावीकडे पाहतों, उजवीकडे पाहतों. पुढेंही तीच दिसते, व मागें फिरून पाहिलें तरी तीच. आंतही तीच, बाहेरही तीच. जिकडे

ज्याची असें तिचें मुख जिकडे जिकडे पहावें, तिकडे तिकडे दिसतें.

तो **मकरंदाला** म्हणाला, 'गड्या, सांप्रत मला—सर्व शरीराला कालवून टाकणारा, असा कांहीं अवर्णनीय दाह होत असून तो माझ्या शरीरांत चोहोंकडे पसरतो आहे. माझीं इंद्रियें मोहवश होऊन आपआपल्या विषयाला ग्रहण करण्यास असमर्थ झालीं आहेत. कामाची विशेष वृद्धि झाल्यामुळें हृदय आंतल्या आंत जळत आहे. आणि तें केवळ तदाकार होऊन गेलें आहे. त्या प्रियेच्या आकारावांचून माझ्या हृदयांत एक तिळभरदेखील जागा रिकामी राहिलेली नाहीं.'

हें ऐकून **मकरंद** त्याचें समाधान करून कांहीं दुसऱ्या विषयाचें वर्णन करीत करीत त्याला कसा तरीं घरीं घेऊन गेला; आणि तेथें त्याचा दाह शांत होण्याकरितां शीतल उपचार करूं लागला.

---

## प्रकरण दुसरें.

पहिल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें **अवलोकितेनें माधवाला** मदनोद्यानांत यात्रा पाहण्याकरितां मुद्दाम पाठविलें होतें. तेव्हां तेथें काय काय झालें तें वर्तमान ऐकण्याची **कामंदकीला** उत्कंठा होतीच. तिणें **मकरंदाला** तेथें काय हकीकत होईल ती आपणास मुद्दाम कळविण्यास सांगितलें होतें. तशांतून त्याचा प्रियमित्र

म्हणून त्या यात्रेत गेल्यापासून **माधवाची** कशी स्थिति झाली आहे तें **मकरंदाच्या** मनांत **कामंदकी**ला कळवायचेंच होतें. त्याप्रमाणें त्याणें घडलेला सर्व वृत्तांत तिला सांगितला. आणि **माधवा**ला ह्या संकटांतून रक्षण करण्याविषयीं **कामंदकी**ची प्रार्थना करून तो परत **माधवा**कडे आला.

**कामंदकीनें मकरंदाला** त्याबद्दल विशेष कांहीं सांगितलें नाहीं. तिनें ही सर्व हकीकत ऐकून घेऊन आपली शिष्या **अवलोकिता** हिला—**मालती**ची स्थिति कशी काय झाली आहे ती समजून घेण्याकरितां मुद्दाम तिच्याकडे पाठविलें.

**कामंदकी**च्या आज्ञेप्रमाणें **अवलोकिता भूरिवसू**च्या वाड्यांत येऊन संगीतशाळेच्या जवळ उभी राहिली. आणि **मालती** यावेळीं कोठें आहे त्याची चौकशी काढून मग एकांतीं असली तर तिच्याकडे जावें, असें **अवलोकिते**च्या मनांत होतें. इतक्यांत **वासंतिका** नांवाची **मालती**ची दासी तिकडे येत होती, तिला पाहून **अवलोकिते**नें तिला उभी करून **मालती**ची हकीकत विचारली. दोघींचें बराच वेळ बोलणें चाललें होतें.

इतक्यांत **मेघमाला** नांवाची दुसरी एक दासी तेथें आली. त्या दोघींचें कांहीं बोलणें चाललें आहे असें पाहून—आपण उगीच मध्यें कशाला जावें? म्हणून **मेघमाला** अंमळ दूरच उभी राहिली, इकडे **अवलोकिता** काय विचारायचें तें विचारून लवकरच पुढें गेली.

होतां ग?'

**वासंतिका** ह्मणाली, 'सखे **मेघमाले**, अग दुसरें काय ह्मणार? आपण सकाळीं छोट्या बाईसाहेबांबरोबर मदनोद्यानांत गेलों होतों, तेथें नि बकुलीच्या झाडाखालीं जें कांहीं झालें तें किं नांहीं त्या **माधवा**चा प्रिय मित्र **मकरंद** याणें भगवति **कामंदकी**ला सारें सांगितलें. तेव्हां आमच्या छोट्या बाईसाहेबांची प्रकृति कशी काय आहे त्याचा शोध घेण्याकरितां **अवलोकिते**ला त्यांनीं पाठविलें आहे. तेव्हां तिणें यावेळीं छोट्या बाईसाहेब कोठें आहेत ह्मणून विचारिलें. त्यावर—एकट्या **लवंगिके**ला बरोबर घेऊन वरच्या गच्चीवर कांहीं बोलत बसल्या आहेत, असें मी तिला सांगितलें. झालें इतकेंच आणखी कांहीं नाहीं हो.'

हें ऐकून **मेघमाला** ह्मणाली, 'अग, **लवंगिका** केशरांचीं फुलें वेंचून घेण्याकरितां तेव्हां जी मागें राहिली होती ती अद्याप तिकडून आलीच नव्हती. आणि तूं ह्मणतेस छोट्या बाईसाहेब तिच्याशीं एकांतांत बोलत बसल्या आहेत ह्मणून. तेव्हां इतक्यांत कदाचित् ती आली असेल तर कोणास ठाऊक.'

**वासंतिका** ह्मणाली, 'हो हो. आतांच आली. आणि ती जवळ येण्याबरोबर बाईसाहेबांनीं बाकी साऱ्या सख्यांला एकीकडे करून **लवंगिके**चा हात धरून त्या वरच्या गच्चीवर गेल्या, हें प्रत्यक्ष मी पाहिलें.'

**मेघमाला** ह्मणाली, 'हो गडे, तूं ह्मणतेस तसें झालें

असेल खरें. मला असें वाटतें कीं, बाईसाहेब—मदनोद्यानांत पाहिलेल्या त्या महाभागाच्या (**माधवाच्या**) कांहीं गोष्टी बोलून मनाची विश्रांती करून घेत असतील.'

**वासंतिका** ह्मणाली, 'छे ग. त्यांला कुठून विश्रांती प्राप्त होणार? आधींच त्याचे गुणानुवाद ऐकून त्यांचें मन अस्वस्थ झालें होतें. त्यांतून आज तर त्याची विशेष प्रकारची भेट झाली, यामुळें त्यांची आसक्ती फारच उत्कट होईल. तशांतून **नंदना**करितां महाराजांनीं त्याची मागणी केली आहे. व आपल्या दिवाणजीनीं—माझ्या मुलीवर माहाराजांचा सर्व प्रकारें अधिकार आहे, असें सांगितल्याचें त्यांच्या कानावर गेलें आहे. तेव्हां त्यांचें समाधान कसें होणार!'

उसासा टाकून म्हणाली, '**मालती**ला हें **माधवा**चें प्रेम जन्मभर हृदयाला टोंचणारें शल्य होईल असें वाटतें!'

**मेघमाला** म्हणाली, 'अग, तूं म्हणतेस तें खरें; पण भगवति **कामंदकी** कांहीं तरी आपल्या बुद्धीचा प्रभाव दाखविल्यावांचून राहावयाची नाहीं.'

**कामंदकी**चीं काय काय कारस्थानें चाललीं आहेत, हें **वासंतिके**ला मुळींच ठाऊक नव्हतें, असें नाहीं. पण अद्याप कशास कांहीं ठिकाण नाहीं. तों उगीच त्या गोष्टी आपण बोलाव्या हें योग्य नाहीं. म्हणून तिणें ती गोष्ट मागें टाकली. उगीच भलतेच मनोरथ कशाला करीत बसतेस? चल आपण आपल्या कामास जाऊं या असें परस्परांला सांगून दोघी निघून गेल्या.

इकडे **वासंतिकेनें** पूर्वी सांगितल्याप्रमाणें **मालती** आणि **लवंगिका** यांचा गच्चीवर एकांत चालला होता. **लवंगिका**

**मालती**ची स्वारी मदनोद्यानांतून पुढें निघाली, त्यावेळीं फुलें तोडण्याच्या निमित्तानें मागें राहिली, **माधवा**शीं तिचें कांहीं बोलणें झालें व तिणें त्याच्याकडून त्याणें केलेली फुलांची माळ मागून घेतली, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आपल्या पश्चात् **माधवा**शीं तुझें काय बोलणें झालें तें सांग,—असें **मालती**नें मोठ्या उत्कंठेनें विचारल्यावरून **लवंगिके**नें झालेलें सारें सांगितलें.

**मालती** ह्मणाली, 'हूं मग पुढें काय झालें तें सांग!'

**लवंगिका** ह्मणाली, 'इतकें बोलणें झाल्यावर मी मागितल्यावरून त्या महानुभवानें ही माळ दिली;' असें सांगून **लवंगिके**नें ती माळ **मालती**च्या हातांत दिली. तिच्याकडे लक्ष्यपूर्वक पाहून **मालती** हर्षानें ह्मणाली, 'गडे, ही माळेची गुंफण मोठी चमत्कारिक आहे. सारीं फुलें एका बाजूनेंच दोऱ्यांत ओंवलीं आहेत. दुसरी बाजू बाहेर खुली दिसत असल्यामुळें ही रचना मोठी चमत्कारिक दिसते.'

**माधवा**नें ती माळ पुरती गुंफून तयार केली नव्हती. एक बाजू तशीच अपूर्ण राहिली होती. ह्मणून **लवंगिका** ह्मणाली,' ह्या माळेंत कांहीं कमीपणा असून ती तितकी रमणीय झाली नाहीं, याचा दोष तुझ्यावरच आहे!'

**मालती** ह्मणाली, 'तो ग कसा? मी काय केलें बाई?'

**लवंगिका** ह्मणाली, 'दुसरें काय करणार? त्या कोमल दुर्वांसारख्या श्यामवर्ण **माधवा**चें मन व्यग्र केलेंस, ह्मणून ही अशी अपुरती राहिली!'

हे शब्द **मालतीला** ऐकावयाचेच होते. व ते तिच्या कानाला किती गोड लागले असतील, याचें वर्णन करतां येत नाहीं. स्त्रियांला—ज्यांच्यावर त्या अनुरक्त असतील

त्याला आपल्याबद्दल विशेष प्रीति आहे, किंवा आपल्या चाळ्यांनीं त्याच्या मनाचा गोंधळ झाला, हें ऐकण्याची फारच इच्छा असते.

**लवंगिकेनें** सांगितलेलें ऐकून **मालती** खुष होऊन ह्मणाली, 'प्रियसखे **लवंगिके**, दुसऱ्याच्या मनाचें समाधान करण्याची युक्ति तुला फार चांगली साधली आहे.'

**लवंगिका**ही मोठी समयोचित बोलणारी होती. ती म्हणाली, 'समाधान करण्याची हतोटी ती कसली? खरेंच गडे. मंद वाऱ्यानें हालणाऱ्या प्रफुल्लित कमळासारख्या चंचल असून बकुळीची माळा पाहण्याच्या निमित्तानें उघडलेल्या आपल्या नेत्रांनीं त्वां प्रत्यक्ष त्याची अवस्था पाहिलीच आहेस. मग मला समाधान करण्याची हतोटी दाखविण्याचें काय कारण आहे.'

**लवंगिकेनें** मनांतली गोष्ट सांगितल्यावरून **मालती** प्रेमानें तिला मिठी मारून म्हणाली, 'गडे, खरेंच सांग कीं, त्या महानुभवाचे ( **माधवाचे** ) त्यावेळेचे ते विलास स्वाभाविक असून क्षणभर समागम घडलेल्या माणसाला ( अर्थात् आपल्याला ) फसविण्याकरितां त्याणें ते व्यक्त केले होते, किंवा तूं ह्मणतेस त्याप्रमाणें त्याची खरोखरच तशी स्थिति झाल्यावरून व्यक्त झाले होते, हें सांग.'

हें ऐकून जरा दोष दिल्यासारखी मुद्रा करून **लवंगिका** ह्मणाली, 'आणि तूं तरी त्यावेळीं जे भाव दाखविलेस ते काय स्वाभाविक संगीतांतलें नर्तन करीत होतीस कीं काय'?

हें ऐकून **मालती** लाजली. **लवंगिकेनें**—जशी तुझी स्थिति झाली होती तशीच त्याचीही झाली होती असें

सुचोवेल. तेव्हां **मालती** त्याविषयीं कांहीं न बोलतां ह्मणाली, 'बरें बरें, मग पुढें काय झालें तें सांग.'

**लवंगिका** ह्मणाली, 'नंतर यात्रेला गेलेले लोक परतले आणि त्यांची गर्दी झाल्यामुळें तो महाभाग माझ्या दृष्टीस पडेनासा झाला. तेव्हां मी तेथून परतलें, आणि येतां येतां माझी सखी **मंदारिका** हिच्या घरीं गेलें. आज सकाळींच चित्राची पाटी मी तिच्याकडे दिली होती.'

हें एकून **मालती** ह्मणाली, 'कोणची चित्राची पाटी ? मी काल चित्र काढलें होतें तीच का ?'

**लवंगिका** ह्मणाली, 'होय. तीच.'

**मालती** ह्मणाली, 'मग ती **मंदारिके**च्या हातीं देण्याचें काय कारण ?'

**लवंगिका** ह्मणाली, 'तुला ठाऊक नाहीं. त्या **माधवा**चा हुजऱ्या नेहमीं त्याच्या बरोबर असतो, तो **कलहंसक**, त्या **मंदारिके**वर आसक्त झाला आहे. तेव्हां तूं काढलेली तसबीर तो अवश्य त्याला दाखवील ह्मणून मी ती पाटी मुद्दाम तिच्याजवळ दिली होती. ती येतांना घेऊन यावी असें माझ्या मनांत होतें ह्मणून तेथें गेलें, तों **मंदारिके**नें मला दुसरेंच एक प्रिय वर्तमान सांगितलें.'

हें ऐकून—**मंदारिकेनें** हिला काय सांगितलें असेल, याविषयीं **मालती** तर्क करूं लागली. **माधवा**चा हुजऱ्या **कलहंसक** हा **मंदारिके**वर आसक्त झाला आहे, ही गोष्ट तिच्या कानांवर आली होती. वस्तुतः ह्या असल्या नोकराचाकरांच्या बारीकसारिक गोष्टी मनांत ठेवण्याचें तिला कांहीं कारण नव्हतें; पण आपला हेतु सिद्ध होण्याचें तिला बरेंच

6

तिला नोकराचाकरांचें विशेष साह्य पाहिजे होतें.

प्रत्येक मनुष्याला विशेष अगत्य ठेवण्याला कांहीं तरी कारण लागतें. **कलहंसक** हा **माधवाचा** विश्वासू चाकर असून **मंदारिका** ही आपली दासी व **लवंगिकेची** मैत्रीण, आणि **लवंगिका** ही आपल्या साह्याविषयीं तत्पर अशी प्रिय मैत्रीण आहे. व **कलहंसक** त्या **मंदारिकेवर** विशेष आसक्त झाला आहे, तेव्हां अर्थात् तो आपल्याविषयीं अगत्य बाळगणार, अशी गोष्ट **मालतीच्या** मनांत येणें साहजिक आहे. **मंदारिकेनें** ती चित्राची पाटी **कलहंसकाला** दाखविली असेल, व त्याणें ती आपल्या धन्याला दाखविली असेल; असें समजून **मालती लवंगिकेला** ह्मणाली, 'मग असें कोणतें प्रिय वर्तमान तिनें तुला सांगितलें?'

हें ऐकून **लवंगिका—माधवानें** काढलेलें तिचें चित्र पुढें करून—आधींच संतप्त झालेल्या हृदयाला विशेष संताप देणारें व दुर्लभ मनोरथावर विशेष आसक्ती ठेवल्यामुळें होणाऱ्या दुःसह आयासांनीं जिचें चित्त जळत आहे, त्या तुला क्षणमात्र थंड करणारें हें तिणें सांगितलें, असें ह्मणाली. **लवंगिकेनें माधवानें** काढलेली तिची तसबीर तिला दाखविली. **मालतीनें** ती झटकन तिच्या हातांतून घेऊन बराच वेळ रेंखून पाहिली आणि हर्षानें म्हणाली, 'गडे, खरोखर अद्यापि माझ्या मनाला विश्वास पटत नाहीं. हें ( तसबीर ) देखील कदाचित् मला फसविण्याकरितांच असेल, असें वाटतें.'

तसबिरीखालीं **माधवानें**—

**जगति विजयी त्याल्या वस्तू नवेन्दुकलादिक**
**प्रकृतिमधुरा होती अन्या मना रमवीति ज्या।**
**मम प्रियसखी आली हे जी विलोचन चन्द्रिका**
**नयनविषया जन्मामाजीं गमेचि महोत्सव ॥**

(हरिणी.)

हा श्लोक लिहिला होता, तो वाचून तिला फार आनंद झाला. आणि डोळ्यांत अश्रु आणून **माधवाला** उद्देशून ह्मणाली, 'महाभागा, हें तुझें वाक्य अगदीं खरें आहे. जशी तुझी आकृति मधुर आहे तशीच कविताही मधुर आहे. पण तुझें दर्शन तत्काल मधुर असून परिणामीं मोठा संताप देणारें असल्यामुळें मोठें कठोर आहे. खरोखर ज्या तरुण मुलींनीं तुला मुळींच पाहिलें नसेल, किंवा पाहूनही ज्यांचें मन उत्कंठित झालें नसेल त्या धन्य आहेत खऱ्या!'

यावर **लवंगिका** ह्मणाली, 'बाई, इतकें झालें असूनही अजून तुझ्या मनाचें समाधान होत नाहीं काय?'

**मालती** ह्मणाली, 'ह्मणजे काय तें मला समजलें नाहीं.'

**लवंगिका** ह्मणाली, 'अग, ज्याच्याकरितां तूं देंठापासून तुटलेल्या अशोकाच्या कोमल पल्लवासारखी नाजूक व नूतन मोगरीच्या फुलालादेखील धारण करण्याला असमर्थ अशी खेद पावत आहेस; तोही तुझ्याकरितां तसाच खिन्न झाला आहे. त्याला भगवान् मदन यानें आपले बाण किती दुःसह आहेत याचा पूर्ण अनुभव दिला आहे. इतकें समजून देखील तुझें समाधान होत नाहीं, याचें मला आश्चर्य वाटतें.'

**मालती** ह्मणाली, 'त्या महानुभावाचें कुशल असो!

माझें समाधान होणें तर दुर्लभच आहे. त्यांतून सांप्रत मानसिक प्रीति विषासारखी तीव्र होऊन ती आंगभर पसरत चालली आहे. उत्पन्न झालेला मनोरथरूपी अग्नि सर्व शरीराला गलित करून निर्धूम आगीसारखा विशेषच पेटत आहे. अनुराग ज्वरासारखा जिकडे तिकडे सर्व अंगाचा दाह करीत आहे. ह्यामुळें या दुःखांतून—माझी आई किंवा बाबा आणि प्रत्यक्ष तूंदेखील, मला वांचविण्यास समर्थ नाहींस.'

हें ऐकून **लवंगिका** उसासा टाकून म्हणाली, 'गडे, खरेंच. चांगल्या माणसाचा समागम—तें डोळ्यासमोर असलें म्हणजे, सुख देणारा व अम्मळ अंतरलें म्हणजे दुःख देणारा असाच होतो. ज्याला क्षणभर दृष्टि आसक्त करून केवळ खिडकींतून पाहिल्यामुळें निर्दय कामाच्या बाणांच्या प्रहारांनीं तुझे प्राण धोक्यांत पडले आहेत, पूर्ण चंद्रोदयासारखें शीतल असूनही ज्याचें दर्शन तुला अग्नीसारखें झालें आहे, त्यालाच आज विशेष प्रकारें पाहिल्यामुळें तुला सांप्रत अधिक संताप होत आहे. याविषयीं विशेष काय बोलावें? प्रियसखे! दुर्लभ असून फारच वर्णनीय असें तुझ्या मनोरथाचें फळ दुसरें कांहीं नाहीं. तुझा ज्याच्यावर विशेष अनुराग आहे त्या महानुभाव हृदयवल्लभाचा समागम व्हावा हेंच मुख्य फल, असें मला वाटतें.'

**लवंगिकेनें** आपल्या भाषणांत मोठ्या चातुर्यानें—असें दुःख भोगण्यापेक्षां **माधवाकडे** जावें हें बरें, असें सुचविलें; पण **मालती** सत्कुलांत उत्पन्न झालेली, व मोठी सदाचरण करणारी मुलगी होती. **माधव** तिला जिवापेक्षां अधिक प्रिय होता व त्याची भेट व्हावी अशी

तिला फार इच्छा होती; तरी भलत्याच मार्गानें ती तसें करण्यास तयार नव्हती. **लवंगिकेनें** सुचविलें, त्यावरून लग्न वगैरे होण्याची विशेष अपेक्षा न करितां चोरून मारून कशीतरी **माधवाची** भेट घ्यावी, असें ध्वनित झालें; पण **मालतीचा** मनोरथ असा होता कीं, आईबापांनीं आपणास **माधवाला** द्यावें, व त्या रीतीनें आपण त्या हृदयवल्लभाचा समागम करावा. **लवंगिकेनें** सुचविलेली युक्ति तिला मुळींच मान्य नव्हती, तरी तिचा तिरस्कार न करितां आपली त्याविषयीं मान्यता नाहीं असें तिनें गोड शब्दांनीं दर्शविलें.

**मालती** म्हणाली, 'गडे जिवलगे, **मालतीचें** वाचणें तुला फार प्रिय आहे. कांहीं तरी साहस मध्यें आणून घालायचें अशी तुझी आपली चालच आहे; पण मी काय अगदीं तशी वेडी नाहीं. पुरे पुरे. नाहीं जा, मी असल्या बोलण्याला मुळींच बधायची नाहीं. तूं मला असें म्हणतेस हें काय? इतकं का मला वेड लागलें आहे? तुझ्याकडे तरी याचा काय बोल? याबद्दल माझाच अपराध आहे. मी वरचेवर तिकडे पहात आहें आणि वेड लागलें नाहीं म्हणून सांगत आहें. मोठ्या संकटानें व धैर्यानें आपल्या हृदयाला स्तंभित करून हाताला न येणाऱ्या फळाची इच्छा करितें, यामुळें तुला असें बोलायला जागा झाली. तथापि मी तुला अगदीं खरें सांगतें. प्रत्येक रात्रीं अगदीं पूर्ण चंद्रमा उदयाला पावून मला संताप देवो, मदन मला खुशाल जाळो. मरणापेक्षां तो माझें अधिक तें काय करणार आहे? मेलें तर एका दुःखांतून तरी सुटेन! माझे बाबा आणि पवित्र वंशांत उत्पन्न झालेली माझी

कदाचित् त्याच्या समागमावांचून मरण आलें तरी पुरवलें; पण मी तसें करणार नाहीं.'

हें ऐकून **लवंगिका** मनांत म्हणाली, आतां येथें कोणता उपाय करावा, हें कांहीं समजत नाहीं. **कामंदकी**ची शिष्यीण **अवलोकिता मालती**चा समाचार घेण्याकरितां तिच्याकडे आली होती हें पूर्वी सांगितलेंच आहे. तिणें **वासंतिके**कडून जें कांहीं वर्तमान कळलें तें ऐकून घेतलें. व आणखी तिला विशेष कांहीं चौकशी करावयाची ती करून—**मालती** अगदीं एकांतांत बसली आहे, तेव्हां आपण तेथपर्यंत कशाला जावें? म्हणून ती परत **कामंदकी**कडेच निघून गेली.

**कामंदकी**ला—**माधव** जसा तिच्याविषयीं उत्कंठित झाला आहे तशीच **मालती**ही त्याच्याविषयीं उत्कंठित झाली आहे कीं काय, हें समजून घ्यावयाचें होतें. **अवलोकिते**च्या सांगण्यावरून तिचीही तशीच स्थिति झाली आहे असें समजून **कामंदकी**ला फार आनंद झाला. ती आतां आपली मसलत पूर्णपणें सिद्ध होईल, असें समजून **मालती**ला आणखी कांहीं सांगण्याकरितां मुद्दाम तिच्याकडे जावयास निघाली. **लवंगिके**शीं यावेळीं तिचा एकांत चालला आहे, त्यांत मुख्यत्वें **माधवा**च्याच गोष्टी असतील दुसरें कांहीं नसेल. तेव्हां आपण तेथें गेलें तरी कांहीं हरकत नाहीं, असा विचार करून ती थेट गच्चीवर आली. तथापि एकदम पुढें न जातां जिन्याच्या दाराशीं उभी राहून तेथें खबर कळविण्याकरितां

वांचून कोणाची खबर देऊं नको, असें सांगितलें होतें. तरी कामंदकीचा आणि त्यांचा विशेष घरोबा असून तिची सर्वत्र विशेष मानमान्यता असल्यामुळें दासी कांहीं आढेवेढे न घेतां दाराची एक फळी हळूच उघडून अर्धी आंत व अर्धी बाहेर अशी उभी राहून—ह्या कामंदकीआईसाहेब आल्या आहेत, असें बोलली. तें ऐकन—यावेळीं ही कशाकरितां आली असावी? ह्मणून मालती अंमळ विचार करीत आहे, तों दासी ह्मणाली, 'आणि त्या बाईसाहेबांला (मालतीला) च भेटण्याकरितां आल्या आहेत.'

कामंदकी मालतीच्या आईकडे व भूरिवसूकडे वरचेवर येत असे, तरी यावेळीं ती आपल्याकडेच आली असेल असें तिला वाटलें नव्हतें, ह्मणून अंमळ विचारांत पडली होती; पण दासीनें पुनः सांगितल्यावरून तिनें तत्काळ—मग विलंब कां लावतेस? त्यांना आंत घेऊन ये, असें सांगितलें. दासी मागें फिरून कामंदकीला घेऊन येणार इतक्यांत मालतीनें चित्राची फळी दडवून ठेविली. लवंगिकेला पुढें काय करावें, याचा विचार पडला होता; तों इतक्यांत कामंदकी आली, हें तिला बरें वाटलें.

इकडे अवलोकितेसह कामंदकी आपल्याशींच कांहीं बोलत बोलत येत होती. शाबास, भूरिवसो शाबास! 'माझ्या मुलीची पाहिजे तशी व्यवस्था करण्याला महाराज समर्थ आहेत,' हें तुझें बोलणें मोठें खुबीदार आहे. आणखी आज मदनोद्यानांत घडलेला वृत्तांत ऐकून माझ्या हेतूला





मुख्यत्व वधुवरांचा परस्परांवर अनुराग असणें हें मोठें श्रेयस्कर आहे. **अंगिरा** ऋषीनें सांगितलेंच आहे, कीं " जिच्यावर मन आणि डोळे विशेष आसक्त होतील, तिच्याशीं विवाह करून घेण्यांत विशेष वृद्धि होते." सांप्रत हा तसाच योग घडून आला हें फार चांगलें झालें.

इतक्यांत **अवलोकितेनें**—ती पहा समोर **मालती** बसली आहे, ह्मणून **मालती**ला दाखविलें, तेव्हां तिच्याकडे रेंखून पाहून **कामंदकी** तिचें वर्णन करूं लागली. ती ह्मणाली, 'हिचें शरीर अत्यंत क्षीण झालें आहे, तरी ओल्या केळीच्या गाभ्यासारखी ही सुंदर दिसत आहे. क्षीण होऊन ज्याची एकच कला अवशिष्ट राहिली आहे, अशा चंद्रासारखी ही नेत्रांला आनंद करिते. कामाग्नीच्या दाहापासून प्राप्त होण्याला योग्य अशा अवस्थेंत असणारी ही कल्याणी कन्यका, एकीकडून माझ्या मनाला रमविते व दुसरीकडून हिच्या मनाप्रमाणें न झालें तर हिची अवस्था काय होईल ? ह्मणून हृदयाला कंपही उत्पन्न करते!'

'आणखी हिच्या गालांवर पांढुरकी दिसत असून हिचें तोंड अंमळ रूक्ष दिसत आहे, तरी ही अधिकच मनोहर दिसते. कारण, उत्तम स्थितींत जन्मास आलेल्या मनुष्यांत संचार करणारा भगवान् मदन बहुतकरून विजयी होतो. अथवा खरोखर, मनांत प्रियसमागमाचा संकल्प करून यावेळीं ही त्याचा खचित अनुभव घेत आहे असें वाटतें. कारण, हिचीं सर्व लक्षणें तशींच दिसतात. हिच्या ब-

अगदीं सुस्त झालें आहे, स्तनकलश कंपायमान झाले आहेत, गालांवर रोमांच उभे राहिले आहेत, व अतिशय आनंदाचा उपभोग घडल्यामुळें हिला मोह उत्पन्न झाला असून क्षणमात्रानें पुनः ही शुद्धीवर येत आहे.'

याप्रमाणें **मालतीचें** वर्णन करीत करीत **कामंदकी** अगदीं तिच्या जवळ गेली, तरी तिनें वर्णन केल्याप्रमाणेंच तिची अवस्था झाली होती, ह्मणून ती मुळीं हलली देखील नाहीं. **लवंगिकेनें** तिला हालविलें तेव्हां दचकल्यासारखी होऊन चटकन् उभी राहिली, आणि तिनें **कामंदकी**ला नमस्कार केला. **कामंदकीनें**—इष्टफलप्राप्तीला पात्रभूत हो! असा आशीर्वाद दिला. इतक्यांत **लवंगिकेनें** आसन पुढें केलें; आणि साऱ्याजणी खालीं बसल्या.

**मालतीनें** आपली मानासिक स्थिति कांहीं न दाखवितां कुशल प्रश्न केला. तेव्हां **कामंदकी** उसासा टाकून—होय, कुशल असल्यासारखेंच आहे, असें ह्मणाली. **लवंगिके**ला तिच्या बोलण्याचा हेतु काय तो समजला. ती मनांत ह्मणाली, ही हिच्या कपटनाटकाची प्रस्तावना आहेसें वाटतें. उघड **कामंदकी**ला ह्मणाली, '**कामंदकी**आई, अश्रूंनीं आपले डोळे भरून आले आहेत त्यांचें स्तंभन करीत आहां, व गळा दाटून आला आहे आणि उसासा सोडीत आहां, अशा स्थितींत हें **मालती**ला जें आपण उत्तर दिलें, तें कांहीं निराळ्याच प्रकारचें दिसतें. या वेळीं आपल्याला इतका उद्वेग होण्याला दुसरें काय कारण असावें बरें?'

**लवंगिका** ह्मणाली, 'मग त्याचा इतका उद्वेग होण्याचें कारण काय?'

**कामंदकी** ह्मणाली 'अग, विचारतेस काय? तुला ठाऊक नाहीं का? ही **मालती** ह्मणजे मदनाचें हटकून जय मिळविणारें अस्त्र असून सहज विलास दाखविणारें असें हिचें शरीर अयोग्य वराची योजना झाल्यामुळें जन्मभर आमच्यासारख्यांला हळहळण्याला कारण झालें असून, हिच्या अंगीं जे अलौकिक गुण आहेत, तेही त्या योगानें विफल होतील ह्मणून मला उद्वेग होतो!'

हें ऐकून **मालती** खिन्न झाल्यासारखी झाली. **लवंगिका** ह्मणाली, 'हो हो, आपण ह्मटलें तसें आहे खरें. महाराजांच्या वचनाला मान देऊन दिवाणजीनीं (**भूरिवसूनें**) **नंदनाला मालती** द्यायची, असें ठरविलें आहे आणि हें वर्तमान गांवभर पसरलें. व लोक त्याबद्दल दिवाणजीला दोष देत आहेत.'

**मालती** हावेळपर्यंत आईबाप आपलें **माधवाशीं** लग्न कधीं करून देतील, ह्याच फिकिरींत होती. कारण **माधव** आपल्याला आवडला आहे तसाच तो त्यांलाही कदाचित् आवडेल, असें तिच्या मनांत येत होतें. **भूरिवसूनें** आपल्याला **नंदनाला** देण्याचा विचार केला आहे, हें तिला मुळींच ठाऊक नव्हतें. **लवंगिकेला** माहीत होतें; पण तिणें तें मुद्दाम तिला कळविलें नाहीं.

असो ! त्यांची मर्जी !

**कामंदकी** ह्मणाली, 'अग **लवंगिके,** मला देखील याचें मोठें आश्चर्य वाटतें. गुणांकडे लक्ष्य न देतां **भूरिवसूनें** हें कसें मनांत आणिलें ! पण त्याच्याकडे तरी काय दोष? राजकारस्थानी पुरुषांला मुलांचा आणि बाळांचा स्नेह कोठून असणार! त्यांला राजाची मर्जी संपादन केली ह्मणजे झालें. **नंदना**ला द्यायचा निश्चय केला असला तर हाच त्याचा हेतु असला पाहिजे. राजाच्या खुषमस्कऱ्याचा मुलगा **नंदन** हा राजाचा फार आवडता आहे. तेव्हां त्याला मुलगी देऊन आपला मित्र करून घ्यावा, हा मुख्य मतलब असेल.'

**कामंदकी** यावेळीं **मालती**च्या हृदयाला विशेष चटका लागेल असेंच बोलत होती. आईबाप आपल्या हेतूच्या विरुद्ध आहेत असें तिच्या मनांत चांगलें बिंबवून द्यावें, व त्यावरून तिनें त्यांच्याकडे मुळींच कांहीं गोष्ट न काढतां आपल्या मसलतीला अनुकूळ व्हावें असा **कामंदकी**चा मतलब होता. वस्तुतः ती **भूरिवसू**च्या इच्छेविरुद्ध ही मसलत करीत होती, असें नाहीं. आपलें कांहींएक अंग न दाखवितां परभारें **कामंदकी**नें तो योग घडून आणावा, व आपण अगदीं अलग रहावें ह्मणजे राजाकडे बोलण्यास आपल्याला मोकळीक राहील, अशी मसलत करून **भूरिवसूनें** **कामंदकी**ला मुद्दाम तसें करण्यास सांगितलें होतें.





आपल्याला त्याच्याविरुद्ध कांहीं प्रयत्न करण्याचें कारण नाहीं, असें समजून ती वागत होती. ह्मणून कामंदकीनें बुद्धया तिला ही गोष्ट ऐकवून आईबापांचा तुझ्या इच्छेविरुद्ध विचार चालला आहे, असें मुद्दाम तिला कळवून आपल्या मसलतीला तिनें अनुकूल व्हावें, अशाविषयीं हा प्रयत्न चालविला होता.

**मालती कामंदकीचें** भाषण ऐकून मनांत ह्मणाली, एकूण बाबांला महाराजांची मर्जी राखणें हें विशेष वाटतें, **मालती**विषयीं त्यांना कांहीं काळजी वाटत नाहीं!

**लवंगिका** ही **कामंदकीच्या** मसलतींतच होती. ती **कामंदकी**ला ह्मणाली, 'आई, तुम्हीं म्हटलेंत तें अगदीं खरें आहे. नाहींतर त्या उतार वयाच्या आणि अगदीं ओंगळवाण्या **नंदनाला** मुलगी देण्याचें त्यांणीं कां मनांत आणिलें असतें! महाराजांची मर्जी राखायची म्हणूनच त्यांणीं असा विलक्षण विचार केला असावा.'

वस्तुतः **नंदन** हा कांहीं फारसा म्हातारा नव्हता, व म्हणण्यासारखा कुरूपही नव्हता. **माधवा**पेक्षां त्याचें वय बरेंच मोठें होतें; तरी त्याची म्हाताऱ्यांत गणना करण्यासारखी नव्हती. पण **लवंगिकेला मालतीचें** मन **माधवाकडे** वळवायचें होतें, म्हणून तरुण मुलीला बिलकुल आवडायचे नाहींत असे दोन दोष तिणें मुद्दाम दाखविले. तें ऐकून **मालती** फारच दुःखित होऊन मनांत म्हणाली, हाय हाय! मी कपाळफुटकी मेलें, असेंच म्हटलें पाहिजे.

णाली, '**कामंदकी**आई, आतां यावेळीं आपणच कायती तोड काढा. माझी प्रियसखी **मालती** जिवंतपणीं मरणाच्या संकटांत पडणार आहे. हिचें तुम्हीच रक्षण करा. तुमची देखील ही कन्याच आहे.'

**कामंदकी** म्हणाली, 'अग भोळे **लवंगिके**, येथें माझ्यानें काय होऊं शकणार आहे? मुलींवर बापाचा सर्वस्वी अधिकार असून त्यांला सुख किंवा दुःख प्राप्त होणें तें दैवाच्या अधीन आहे. तथापि त्यांत कांहीं सवड निघण्यासारखी नाहीं असें नाहीं. वधू आणि वर दोघेंही कांहीं प्रयत्न करतील तर त्यांच्या हेतूप्रमाणें होऊं शकेल. अशीं पुष्कळ उदाहरणें पूर्वकाळीं घडलेलीं आहेत. **विश्वामित्रा**ची कन्या **शंकुतला** हिणें आपल्याच बुद्धीनें **दुष्यंताला** वरलें, [1]**उर्वशीनें** **पुरुरव्याराजाला** वरलें, असें जुने इतिहास जाणणारे लोक सांगतात. तसेंच **उज्जयिनीच्या** **चंण्डमहासेन**राजाची कन्या **वासवदत्ता** हिणें—बापानें तिला **संजया**ला देण्याचा निश्चय केला असून ही, स्वतः तिणें प्रयत्न

---

१ येथें शकुंतलेचें उदाहरण घेतलें आहे तें ठीकच आहे. पण उर्वशीचें मात्र घेण्यासारखें नाहीं असें वाटतें. कारण देवलोकींची झाली तरी ती वेश्याच होती. व वेश्यांला आईबापांच्या विचारानें कोणाला वरलें पाहिजे असें नाहीं. प्रकृतस्थलीं मातापितरांच्या सल्ल्यावांचून केवळ आपल्याच इच्छेनें ज्यांणीं वराची निवड केली अशांचीं उदाहरणें घ्यावयाचीं असल्यामुळें उर्वशीचें उदाहरण येथें लागू होत नाहीं. असें आहे, तरी स्वतःच्या इच्छेनें तिनें पुरुरव्याला वरलें इतक्याच अर्थामुळें कादाचित् हें उदाहरण येथें लागू करतां येईल, असें वाटतें.

7

आहे. तेव्हां हिच्यासारख्यांला ( **मालती**सारख्यांला ) अशा गोष्टी सांगणें हेंही, कांहीं चांगलें नव्हे. मला असें वाटतें कीं,–राजाचा आवडता, त्याचा सुहृत, आणि नर्मसचिव **नंदन** ह्याला–आपला कांहीं हेतु सिद्ध होण्याकरितां, मुलगी ( **मालती** ) देऊन दिवाणजी ( **भूरिवसु** ) सुखी होवोत ! आणि ही **मालती** देखील त्या कुरूप थेरड्याची ( **नंदनाची** ) बायको होऊन—राहूच्या योगानें निर्मल चंद्राची कला मलीन होते, तशी होऊं दे, त्यांत आपलें काय गेलें! उगीच आपण कशाला काळजी करीत बसावें.'

**कामंदकी**चें वरील भाषण मोठें सुबीदार होतें. तें ऐकून **मालतीनें** आपल्या मसलतीला अनुकूळ व्हावें, हाच मुख्य हेतु होता, व तो बऱ्याच रीतीनें सिद्धही झाला. **कामंदकीचें** भाषण ऐकून **मालती** ढळढळां रडूं लागली. **लवंगिका** वरचेवर डोळे पुसून तिचें समाधान करीत होती. ती मनांत ह्मणाली, हायरे देवा ! बाबा, तूंदेखील

---

१ वासवदत्तेनें उदयनाला कसें वरलें ही कथा आह्मी केलेल्या 'बृहत्कथासागर' नांवाच्या मराठी पुस्तकाच्या पहिल्या भागांत सविस्तर वर्णन केली आहे. तथापि संजयराजाला वासवदत्ता देऊं केली होती, या गोष्टीचा संदर्भ तेथें मिळावयाचा नाहीं. तेथें चंडमहासेन राजानें मुद्दाम उदयनाला आपली मुलगी देण्याच्या हेतूनें त्याला कपटानें पकडून आणून आपल्या येथें प्रतिबंधांत ठेविलें व वासवदत्तेला त्याच्याकडून संगीत शिकवायास लावलें. आणि तेथें उभयतांची विशेष मैत्री जमून उदयनानें मुद्दाम तिला पळवून नेलें, अशा प्रकारची कथा आहे, ती येथेंच लावून घ्यावी.

असे विचार मनांत आणलेसना ? एकूण संसारसंबंधीं विषयोपभोगाच्या तृष्णेनें सारें जग नाडलें आहे खरें !

**अवलोकिता** उगीच ऐकत बसली होती. **कामंदकीनें** ह्यावेळपर्यंत **मालतीला** आपल्या जाळ्यांत ओढण्याचाप्रयत्न केला, तो ती लक्ष्यपूर्वक ऐकत होती. **माधवाची** अवस्था कशी झाली आहे तेंही **मालतीच्या** कानावर जाईल तर बरें, असें समजून ती **कामंदकीला** म्हणाली, '**भगवति**, फारवेळ झाला, महाभाग **माधव** अत्यंत अस्वस्थ आहे, तेव्हां त्याचाही समाचार घेतला पाहिजे.'

हें ऐकून **कामंदकी** ह्मणाली, 'बरी आठवण केलीस. ही पहा मी निघालेंच. वत्से **मालती**, मला लौकर जात्रयाचें आहे. आतां निरोप दे.'

हें ऐकून **लवंगिका** हळूच **मालतीला** म्हणाली, 'गडे **मालती**, **कामंदकी**आईकडून त्या महाभागाची (**माधवाची**) कशी काय हकीकत आहे, ती ऐकून घेऊं या.'

**मालती** म्हणाली, 'सखे, मला ती ऐकण्याचें मोठें कौतुक आहे.'

**मालतीचा** अभिप्राय जाणून **लवंगिका कामंदकीला** म्हणाली, '**कामंदकी**आई, आपण वरचेवर **माधव माधव** म्हणतां तो कोण ? त्याच्यावर आपला फारच स्नेह आहे असें वाटतें.'

**कामंदकी** म्हणाली, 'ती कथा फार मोठी आहे. आणि यावेळीं कांहीं तिचा प्रसंग नाहीं.'

**लवंगिका** म्हणाली, 'तरी पण, आपण सांगण्याचा अनुग्रह करावा. **मालतीलाही** त्यापासून कौतुक वाटेल !'

हें ऐकून **कामंदकीला** फार संतोष झाला. ती म्ह-

णाली, 'बरें, तुमचा आग्रहच असला तर सांगतें. **विदर्भ** देशच्या राजाचा राज्यकार्यधुरंधर पुरुषांत परमश्रेष्ठ **देवरात** नांवाचा मुख्य प्रधान आहे. त्याची तुला (**मालतीला**) विशेष माहिती नसेल, पण सर्व लोकांत ज्याचा पवित्र महिमा प्रसिद्ध आहे, अशा त्या आपल्या गुरुबंधूला तुझा बाप—तो कोण व कसा आहे हें उत्तम प्रकारें जाणतो. सर्व भुवनमंडलांत आपल्या निर्मळ यशाच्या पताका उभारणारे पुण्याच्या उत्तम फलांचीं केवळ स्थानें असून ज्यांचा महिमा अगाध व जे मंगळाचें केवळ घरच, या प्रकारचे तसले मोठे पुरुष पृथ्वीवर क्वचितच उत्पन्न होत असतात!'

हें ऐकून **मालती लवंगिके**ला म्हणाली, 'हो गडे! आतां भगवतीनें ज्यांचें नांव घेतलें, त्यांची बाबा वरचेवर आठवण करितात खरी.'

**लवंगिका** म्हणाली, 'आणि त्यांणीं जोडीनें पाठशाळेंत विद्याभ्यास केला असें त्यावेळचे माहितगार लोक म्हणतात.'

**कामंदकी** म्हणाली, 'त्या **देवराता**पासून—उदयाचलावरून स्फुरण पावणारा उत्तम गुणांनीं आणि प्रकाशानें सुंदर दिसणारा, कलावान् या जगांत डोळस लोकांला मोठा आनंद देण्याला कारणभूत असा हा बालचंद्र (**माधव**) उदय पावला.'

**लवंगिका** हळूच **मालती**ला म्हणाली, 'हां, तो **माधव**च असेल.'

**कामंदकी** म्हणाली, 'हा सर्व विद्यांचा आधार असून वयानें लहान असतांही घरांतून निघून सांप्रत येथें आला आहे. पूर्ण चंद्रासारख्या मनोहर दिसणाऱ्या त्याला पा-

बाळमित्र **मकरंद** यास-
हवर्तमान तर्कविद्येचा अभ्यास करींत आहे.'

हें ऐकून **मालतीला** मोठा आनंद झाला. ती हळूच **लवंगिकेला** ह्मणाली, 'गडे, ऐकलेंसना **कामंदकी**आईनें काय सांगितलें तें!'

**मालतीनें** असें ह्मटलें याचा हेतु असा कीं, आपलें मन योग्य ठिकाणींच जडलें आहे, असें तिला कळवावें. **मालती**-चा अभिप्राय जाणून **लवंगिका** ह्मणाली, 'रत्नाकराला (समुद्राला) सोडून पारिजातवृक्षाचा दुसरीकडे कोठें उद्भव होणार आहे.'

यांचें इकडे असें बोलणें चाललें आहे, तों इतक्यांत सायंकालचा समय झाला. ह्मणून आसपासच्या मंदिरांतून प्रदोषकाळच्या पूजेचे शंख वाजूं लागले. त्यांचा शब्द ऐकून **कामंदकी** ह्मणाली, 'अरे! वेळ फार झाला. हे पहा सांप्रत उत्कंठित झालेल्या पक्ष्यांच्या जोडप्यांचा कामकलह तोडणारा, झोंपेचा लकीर हळूच सोडणारा, मोठमोठ्या बंगल्याला—मध्यें पुष्कळ अंतर असतांही तें अंधकारानें भरून काढून, दाट आहेत असें दाखविणारा, सायंकाल झाल्याचा सूचक हा शंखाचा शब्द मोठ्यानें सर्व आकाश घुमवून सोडतो आहे, तर आतां आपण उठावें.' असें बोलून **कामंदकी** उठून उभी राहिली.

**कामंदकी** जाण्यास निघाली असें पाहून **मालती लवंगिकेला** हळूच ह्मणाली, 'बाबांनीं मला महाराजांच्या भक्ष्यस्थानीं कसें घातलें कोणास ठाऊक? महाराजांची मर्जी





राखणें हें विशेष वाटतें. माझ्याविषयीं त्यांस कांहींच काळजी नाहीं!'

ती डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाली, 'हायहाय! बाबा, तूं देखील अशी गोष्ट मनांत आणलीसना! असो!' 'माधवाची आठवण करून आनंदानें ह्मणाली, 'तो महाभाग मोठ्या कुळांत उत्पन्न झालेला आहे. **लवंगिके**, तूं ह्मटलेंस तेंखरें. रत्नाकराला सोडून पारिजात दुसरीकडे मुळींच उत्पन्न होणार नाहीं! पण पुनरपि त्याचें मला दर्शन होईल काय देवा!'

**लवंगिकेनें** यावर कांहीं भाषण केलें असतें; पण इतक्यांत **कामंदकी** जाण्यास निघाली, तेव्हां तिणें **अवलोकितेचा** हात धरून—ह्या इकडच्या जिन्यानें आपण खालीं उतरूंया, असें सांगून चौघीही त्या वाटेनें खालीं आल्या. **कामंदकी** हळूच ह्मणाली, एकंदरींत मी यावेळीं बराच कार्यभाग उरकला. आपण अलग राहून **मालतीचा** हेतु समजून तदनुसार तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. **नंदनाविषयीं** तिचा द्वेष उत्पन्न केला. बापाच्या वर्तनाविषयीं संशय उत्पन्न केला. पूर्वींचीं उदाहरणें सांगून आपला हेतु कसा पूर्ण करून घ्यावा हें तिला सुचविलें. तिचा हृदयवल्लभ **माधव** ह्याचें माहात्म्य वर्णन केलें. त्याच्या कुळाची थोरवी सांगितली. त्याच्या गुणांचें वर्णन केलें. प्रसंगा प्रसंगानें तिला अनुकूल करण्याच्या संबंधानें जें कांहीं करवयाचें तें सारें केलें. आतां उभयतांचा समागम घडवून आणणें हें दैवाच्या हातीं आहे. तेथें आपला कांहीं इलाज नाहीं. याप्रमाणें **कामंदकीनें** आपल्या मसलतीच्या जाळ्यांत **मालतीस** गुरफडून ठेवून ती तेथून निघून गेली.

---

# प्रकरण तिसरें.

मागच्या प्रकरणाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें **कामंदकीनें मालतीचें** मन वळवून घेतलें; पण तिला हें एकच कार्य साधावयाचें होतें असें नाहीं. **माधवावर** जशी तिची विशेष ममता होती, तशीच **माधवाचा** बाळमित्र **मकरंद** याच्यावरही तिची ममता होती. तोही कुलीन, तरुण व सद्गुणी असून **कामंदकीचा** आवडता असल्यामुळें **माधवा**-बरोबर त्याचेंही लग्न करावें असा तिचा हेतु होता. **नंदनाची** बहीण **मदयंतिका** ही **मकरंदा**ला आवडली होती. तेव्हां तिच्याशीं त्याच्या विवाहाचा घाट जमवून आणण्याचा तिचा प्रयत्न चालला होता.

**बुद्धरक्षिता** नांवाची तिची एक मोठी हुषार शिष्यीण होती. तिला **मदयंतिकेचें** मन वळविण्याच्या कामावर मुद्दाम नेमिलें होतें, व त्याप्रमाणें तिचा तिकडे सारखा प्रयत्न चालला होता. **कामंदकी मालती**ला समजावून आली, त्या दिवशीं मठांत येईपर्यंत अगदीं संध्याकाळ झाल्यामुळें आपला नित्यनेम आटपून तिणें ती रात्र मठांतच घालविली.

प्रति दिवशीं तेव्हांपासून एकसारखा हाच क्रम चालला होता. **कामंदकी** वरचेवर **मालतीकडे** जाऊन तिला तिच्या कांहीं गोष्टी सांगून तिचें मन वळवीत होती. लवकरच हा तिचा प्रयत्न सफळ होऊन **मालती** अगदीं तिच्या अर्ध्या वचनांत आली. **माधवाची** आणि तिची भेट होऊन बरेच दिवस झाले तेव्हां पुनः त्यांची भेट करून देऊन एक-मेकांचा अनुराग प्रत्यक्ष करून घ्यावा, असा **कामंदकीनें** विचार केला. आणि त्याप्रमाणें दुसरे दिवशीं कृष्णचतुर्दशी होती, तेव्हां—देवदर्शनाच्या निमित्तानें आज सायंकाळीं

**अवलोकिता**—**माधवा**ला काय निरोप सांगावयाचा तो सांगून, परत मठांत आली; पण **कामंदकी** पुष्कळ वेळ झाला तरी आली नव्हती. इतक्यांत **बुद्धरक्षिता**—**मदयंतिके**ला वरचेवर अनेक प्रकारच्या गोष्टी सांगून सांगून तिनें **मकरंदा**कडे तिचें मन वळविलें आणि तिनें एक वेळ त्याला पाहण्याची इच्छा दर्शविल्यावरून तो योग कोणत्या रीतीनें आणावयाचा याचा **कामंदकी**शीं विचार करण्याकरितां ती—तिला भेटायला आली. **कामंदकी** मठांत कोठें नाहीं असें पाहून तिणें—ती कोठें गेली तुला ठाऊक आहे का? ह्मणून **अवलोकिते**ला विचारलें.

तेव्हां **अवलोकिता** ह्मणाली, 'बाई **बुद्धरक्षिते**, तूं काय वेडी आहेस? अग भगवती कोठें गेली, याचा आतंशा शोध करावयास नको. घासभर अन्नाचा गोळा पोटांत घालण्याची वेळ चुकली त्याचें देखील कांहीं स्मरण नाहीं.

---

(१) बौद्धधर्मांत मुख्यत्वें प्राणिमात्रांची हिंसा करूं नये असें सांगितलें आहे. सांप्रतचे बौद्धधर्मी लोक पहिल्या प्रतीचे हिंसक ह्मणजे केवळ राक्षसच ह्मटलें तरी चालेल, असे आहेत. ते मनुष्यमांसदेखील खातात! असें आहे तथापि बौद्धधर्मांतलें मुख्यतत्व अहिंसा हेंच आहे. बौद्धांपैकीं कांहीं लोक हिंसक बनले तेव्हां त्यांत दुफळी होऊन अहिंसक लोक निराळे होऊन आपल्याला जैन ह्मणवूं लागले. कामंदकीनें जैन धर्माचा स्वीकार केला होता. हिंसा होऊं नये ह्मणून जैनलोक दिवसाउजेडीं जेवतात. रात्रीं जेवलें तर कदाचित् जीवजंतूची हत्या होईल ह्मणून त्यांणीं अशी योजना केली आहे. कामंदकी संध्याकाळ झाला तरी आली नाहीं ह्मणून जेवणाची तिनें वेळा चुकविली असें अवलोकितेनें ह्मटलें.

**मालती**ला भेटायला ह्मणून गेल्या आहेत त्या अद्याप तिकडेच आहेत.'

**बुद्धरक्षिता** ह्मणाली, अग, 'तूं त्यांच्याबरोबर असायची असें असून आज इथें एकटीच आहेस तेव्हां तूं दुसरीकडे कोठें गेली होतीस वाटतें?'

**अवलोकिता** ह्मणाली,'हो, मला भगवतीनें **माधवा**कडे निरोप सांगून पाठविलें होतें. त्याप्रमाणें शंकराच्या मंदिराजवळच्या कुसुमाकर नांवाच्या बागेंत जाऊन तेथल्या **कुआ** नांवाच्या झाडांनीं व्याप्त अशा तांबड्या अशोक वृक्षाच्या झाडाखालीं जाऊन उभा रहा; असें त्याला सांगून आलें व त्याप्रमाणें तोही तिकडे गेला.'

**बुद्धरक्षिते**ला ही काय मसलत आहे हें समजलें नव्हतें, ह्मणून तिणें—**माधवा**ला तिकडे कां पाठविलें ह्मणून विचारिलें. तेव्हां **अवलोकिता** ह्मणाली, 'अग, आज कृष्णचतुर्दशी आहे, ह्मणून **कामंदकी**आईबरोबर **मालती** शंकराच्या दर्शनाला तेथें जाणार आहे. आज आपल्या हातानें फुलें काढून शंकराची पूजा केली असतां सौभाग्याची वृद्धि होते, असें शास्त्रांत सांगितलें आहे. भगवती **कामंदकी**च्या सांगण्यावरून फक्त **लवंगिके**ला बरोबर देऊन **मालती**ला तिची आई तिकडे पाठविणार आहे. आणि तेथें फुलें वेंचण्याच्या निमित्तानें ती बागेंत फिरूं लागली म्हणजे **माधवा**ची आणि तिची सहज दृष्टिभेट होईल, असा कांहां बेत केला आहे. बरें, पण तूं कोठें गेली होतीस तें आधीं सांग.'

यावर **बुद्धरक्षिता** ह्मणाली, 'अग, मी देखील शंकराच्या मंदिराकडेच जावयाला निघालें आहें. माझी

करून जावें ह्मणून मुद्दाम इकडून आलें.’

**बुद्धरक्षिते**ला **कामंदकीनें** कोणच्या कामगिरीवर नेमलें आहे तें **अवलोकिते**ला माहीत होतें; पण त्याचें पुढें काय झालें तें ठाऊक नव्हतें. ह्मणून—अग, पण तुला भगवतीनें ज्या कामावर नेमलें होतें त्याचें काय झालें? ह्मणून विचारिलें.

**बुद्धरक्षिता** ह्मणाली, ‘अग, काय झालें, ह्मणजे काय? मी त्याविषयीं एकसारखा प्रयत्न चालविलाच आहे. भगवतीनें मला आज्ञा केली तेव्हांपासून प्रत्येक वेळीं आह्मी दोघी एकांतांत कांहीं गोष्टी बोलायला बसलों ह्मणजे कोणत्यातरी निमित्तानें—तो असा आहे, तो तसा आहे; त्याचे गुण असे आहेत; त्याचें रूप असें आहे; असें वरचेवर वर्णन करून **मदयंतिके**चा **मकरंदा**वर विशेष अनुराग बसेल असें मीं केलें. अद्यापि तिणें त्याला पाहिलें नाहीं, तरी माझ्या सांगण्यावरून तिचें मन त्याच्यावर फार आसक्त झालें असून एकवेळ त्याला कधीं पाहीन, असें तिला झालें आहे. आतां पुढें काय होतें तें पहावें.’

हें एकून **अवलोकिते**ला फार आनंद झाला. तिनें **बुद्धरक्षिते**ची तारीफ करून तिला शाबासकी दिली. नंतर **बुद्धरक्षिता**—माझी सखी **मदयंतिका** वाट पहात असेल, आतां मी जातें, असें सांगून शंकराच्या मंदिराकडे निघून गेली.

**कामंदकी मालती**कडे गेली होती हें वर सांगितलेंच आहे. तिणें—आज **कृष्णचतुर्दशी** असून उपवर मुलींनीं

आज शंकराची पूजा मनोभावानें करावी ह्मणजे सौभाग्याची वृद्धि होते, असें सांगून त्याचें माहात्म्य **मालती**च्या आईजवळ विशेष वर्णन केलें. मुलीचें ज्या रीतीनें कल्याण होईल तो मार्ग आईबापांला इष्टच असतो. त्यांतून **कामंदकी** मोठी विदुषी व सर्व शास्त्रपारंगत असल्यावरून तिच्या वचनावर **मालती**च्या आईचा फार विश्वास होता. तिणें ती गोष्ट **भूरिवसूला** कळवून त्याच्याकडे **मालतीला** शंकराच्या मंदिरांत पाठविण्याची परवानगी विचारली. **भूरिवसूला कामंदकी**ची सर्व मसलत माहीतच होती. त्याणें विशेष कांहीं चौकशी न करितां त्याला अनुमोदन दिलें.

देवाच्या पूजेला जायचें आहे, व **कामंदकी** बरोबर आहे तेव्हां विशेष परिवार असण्याचें कांहीं कारण नाहीं ह्मणून फक्त **लवंगिके**ला बरोबर घेऊन **कामंदकी**बरोबर जाण्याविषयीं आईनें **मालतीला** परवानगी दिली. **मालतीला** हा वेळपर्यंत जी कांहीं हकीकत कळली होती, तीवरून **कामंदकी**च्या साह्यानें आपला हेतु पूर्ण होईल, अशी तिच्या मनाची पक्की खात्री झाली होती यावरून **कामंदकी**चा सहवास व तिचें भाषण ऐकणें हें तिला फारच हितकर वाटूं लागलें होतें. आईची परवानगी मिळतांच ती एका पायावर जाण्यास तयार झाली. व तिला घेऊन **कामंदकी** शंकराच्या मंदिराकडे जाण्यास निघाली.

वाटेंत आपण आरंभलेल्या कृत्याविषयीं अनेक विचार तिच्या मनांत घोळत होते. ती आपल्याशीं ह्मणाली, आतां माझें काम निम्में सिद्ध झालें आहे असें ह्मणतां येईल. ही पोर ( **मालती** ) किती विनयशील व अत्यंत नम्र होती. यापूर्वीं तिला आपल्या मनांत घोळत असलेले विचार सख्यांज-

मोकळें करून आपलें मनोगत कळवूं लागली. व सखीनें हिला कांहीं सांगितलें तर त्याच्यावर तिचा विश्वासही बसतो. माझा तर हिला फारच लळा लागला आहे. मी जवळ नसलें ह्मणजे ही अगदीं दुःखित असते व मी जवळ असलें ह्मणजे विशेष आनंदांत असते. एकांतांत माझ्याशीं गोष्टी करण्याची हिला विशेष उत्कंठा असते. मीं कांहीं विचारिलें तर त्याचें प्रीतिपूर्वक उत्तर देते. मनांतल्या सर्व गोष्टी मला सांगते. मी जायाला निघालें ह्मणजे गळ्याला मिठी मारून मला उभी करकरून आणाशपथा घालून पुनः लवकर येण्याविषयीं विनंती करिते. आतां आशा ठेवण्याला हें एक चांगलें कारण झालें आहे. **शकुंतला, वासवदत्ता,** इत्यादिकांचे इतिहास मीं सांगितले ह्मणजे आईबापांच्या संमतीवांचून त्यांणीं वराची निवड केली हें ऐकून हिच्या मनांत त्या गोष्टी येतात. व खरेंच त्यांणीं असें केलें होतें काय? असें ही मला विचारते व उदास झाल्यासारखी होऊन माझ्या मांडीवर मान टाकून चिंताक्रांत होते. ह्या सर्व चिन्हांवरून ही माझ्या सांगण्या बाहेर जाणार नाहीं, अशी पक्की खात्री झाली. आतां **माधवाच्या** समक्षच ह्या एकदां गोष्टी काढून पहाव्या ह्मणजे झालें.

असा विचार करीत करीत **मालती** व **लवंगिका** यांसहवर्तमान ती शंकराच्या मंदिराजवळ पोहोंचली. **मालतीला**-बापानें राजाला जे उत्तर सांगितलें त्याचें फार वाईट वाटून वरचेवर तें तिच्या मनांत घोळत होतें. इतक्यांत **लवंगिका**

वाहणारा वायु, तुला शीतल करण्याकरितां स्पर्श करीत आहे. याच्या सेवनानें तरी तुझें शरीर शीतल होवो! हें पहा शंकराचें मंदीर, आणि हे त्याच्या आसमंतात् परिचारक देवळांतली सेवाचाकरी करण्याच्या कामांत कसे अगदीं निमग्न झाले आहेत. **कामंदकी**आईनें सांगितल्याप्रमाणें भगवान् शंकराची मनोभावानें पूजा कर. व आपल्या मनांतले हेतु पूर्ण होण्याकरितां त्या परमेश्वराजवळ वर मागून घे. भगवती पार्वती तुझे मनोरथ पूर्ण करो!'

**माधव** कुसुमाकर उद्यानांत जाऊन **मालती** येण्याच्या वाटेवरच बसला होता; पण **कामंदकी**च्या दृष्टीस न पडतां त्या तिघी मात्र आपल्याला दिसतील, अशा बेतानें तो एका झाडाच्या आड उभा राहिला होता. **मालती कामंदकी**बरोबर शंकराच्या मंदिराकडे जात होती. तिला पाहून हर्षानें ह्मणाला, ओहो! भगवती **कामंदकी** पुढें गेली ती यावेळीं मला दिसली. यावरून—संतापानें पोळलेल्या तरुण मोराप्रमाणें माझ्या अंतःकरणाला शांत करणारी वृष्टि लवकरच येणार, असें सुचविण्याकरितांच कींकाय प्रथम चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें—प्रियेची प्राप्ति होईल, अशी ही ( **कामंदकी** ) आशा उत्पन्न करीत आहे.

इतक्यांत **मालती** आणि **लवंगिका** ह्याही त्याला दिसल्या त्यावरून ह्मणाला, ओहो! **लवंगिके**सहवर्तमान **मालती**देखील हिच्याबरोबरच आहे. पण हा काय चमत्कार? ह्या कमळपत्राक्षीचा निष्कलंक मुखचंद्र सन्निध आल्यामुळें माझें मन एक-

केला आहे. खरोखर यावेळीं ही (**मालती**) फारच रमणीय दिसते. ही माझ्या मानासिक कामाग्नीला पेटवते; हृदयाला उन्मत्त करते; डोळ्यांला कृतार्थ करते; चुरमडलेल्या सोनचाफ्याच्या फुलांच्या माळेसारखी अंमळ म्लान दिसणारी हिची सुंदर मूर्ति माझ्या प्रत्येक अवयवाला तृप्त करीत आहे!

**कामंदकीला माधव** तेथें आला आहे, हें पूर्वसंकेतावरून माहीतच होतें. देवळाच्या जवळ जातांच तिणें **लवंगिका** आणि **मालती** या दोघींला फुलें वेंचून आणावयास सांगितलें, आणि आपण अंमळ तेथेंच विश्रांति घेत बसली. **लवंगिका** ह्मणाली, 'गडे, ह्याजवळच्या कुंजांत आपण फुलें वेंचूंया.'

**मालतीनें** त्या गोष्टीला अनुमोदन देऊन दोघीही त्या कुंजाकडे फुलें काढीत काढीत गेल्या. **माधव** तेथें जवळच दडून बसला होता. आतां **मालती** काय काय बोलते, तें ऐकण्याची त्याला विशेष उत्कंठा लागली होती. तो आपल्याशींच ह्मणाला, प्रियेच्या तोंडचे पहिलेच ब्दश ऐकण्याविषयीं उत्सुक झाल्यामुळें माझ्या सर्व अंगावर रोमांच उभे राहिले आहेत; त्यामुळें—प्रथमच उदय पावलेल्या मेघांच्या शितोड्यांनीं ज्याला कळे आले आहेत, अशा कळंबाच्या वृक्षाचें यावेळीं मी अगदीं हुबेहुब अनुकरण केलें आहे.

**कामंदकीनें** आज तिच्या भेटीचा योग कशा रीतीनें घडवून आणला हें मनांत आणून ह्मणाला, भगवती **कामं**-

राभर फुलें तोडून आपल्या खोचणांत घालीत घालीत **माधव** ज्याठिकाणीं बसला होता तिकडेच चालल्या होत्या. वरचेवर— गडे, ह्या झाडाचीं नाहीं, त्या झाडाचीं तोडूया. अग, पण हीं नकोत. तीं पहा पुढें चांगलीं आहेत. —असा त्या दोघींचा आपआपल्यांत संवाद चालला होता.

**मालतीनें** बराच वेळ फुलें तोडलीं त्यामुळें तिला किंचित् श्रम झाला होता. इतक्यांत **कामंदकी** तेथें आली, आणि **मालतीला** मिठी मारून तिच्या कपाळावर आलेला घाम पुसून ह्मणाली, 'अग माझे लाडके! पुरेकर. तोडलींस तितकीं पुरेत. तुला फार श्रम झाले. तुझा शब्द अडखळल्यासारखा होतो. अंग अगदीं शिथिल झाल्यासारखें वाटतें. मुखचंद्रावर हे घामाचे बिंदु उठले आहेत. तुझे डोळे आपोआप झांकताहेत, यावरून हृदयवल्लभाला अवलोकन करीत असतां जसा खेद होतो तसा तुला यावेळीं खेद झाला आहे असें वाटतें!' **कामंदकीनें** हृदयवल्लभाचें नांव घेतल्यावरून **मालती** लाजून खालीं पाहूं लागली.

**कामंदकीचें** भाषण ऐकून **लवंगिका** ह्मणाली, 'आईनीं चांगली आज्ञा केली. हिची तशीच स्थिति झाली आहे, असें दिसतें.'

हा त्यांचा विनोद ऐकून **माधवाला** मोठें कौतुक वाटलें. इकडे **कामंदकी मालतीला** ह्मणाली, 'आतां अम्मळ येथें बैस. माझ्या मनांत तुला कांहीं गोष्ट सांगावयाची आहे.'

हें ऐकून तिघीही खालीं बसल्या. नंतर **कामंदकी**





**मालती** ह्मणाली, ‘ माझें लक्ष्य तिकडेच आहे.’

**कामंदकी** ह्मणाली, ‘तुझ्याजवळ मी एकदां कांहीं गोष्टीच्या प्रसंगावरून **माधव** नांवाच्या एका तरुण पुरुषाचें वर्णन केलें होतें, त्याची तुला आठवण आहे काय?’

**मालतीनें** यावर कांहीं उत्तर दिलें नाहीं; पण **लवंगिका** म्हणाली, ‘ होहो! आम्हांला त्याची आठवण आहे. हिच्यासारखेंच आपलें त्याच्यावरही विशेष प्रेम आहे.’

**कामंदकी** ह्मणाली, ‘ बरें तर, तो मन्मथोद्यानांत यात्रा झाली होती तेथें गेला होता. तेव्हांपासून फार खिन्न झाला असून शरीराचा संताप असह्य झाल्यामुळें तो अगदीं पराधीन झाला आहे. त्याला प्रत्यक्ष चंद्राला पाहूनदेखील आनंद होत नाहीं. त्याचे प्रेमळ मित्रदेखील त्याला आवडत नाहींत. तो स्वभावतः—मोठा धैर्यशाली असल्यामुळें बोलून दाखवीत नाहीं, तरी मानसिक संताप त्याच्या अवस्थेवरून व्यक्त होत आहे. जवसाच्या फुलासारखी त्याच्या शरीराची कांति श्याम आहे, जरी तो अगदीं पांढरा फटिक झाला असून त्याचें शरीर कृश झालें आहे; तरी स्वाभाविक सौंदर्यानें पाहणाराला तो अतिशय रमणीय दिसतो.’

**लवंगिका** म्हणाली, ‘ होहो! त्या दिवशीं **अवलोकिता** **माधवा**ची प्रकृति नीट नाहीं, लवकर त्याच्या समाचाराला जाऊंया, ह्मणून आपल्याला गडबड करीत होती खरी.’

**कामंदकी** ह्मणाली, ‘हो! त्याकरितांच ती गडबड करीत होती. पण मला असें समजलें आहे कीं, त्याला

व मलाही तसेंच वाटलें. कारण त्या महात्म्याच्या दृष्टी-समोर हिचा हा मुखचंद्रमा उदयाला पावला म्हणूनच शांत असलेल्या समुद्राच्या पाण्याप्रमाणें स्थीर असलेलें त्याचें मन खवळलें, तेव्हां हिच्याशिवाय दुसरें कोणीच कारण नाहीं.'

**कामंदकी**चें हें भाषण मोठें खुबीदार होतें. त्याचें मर्म समजून **माधव** आपल्याशींच म्हणाला, वाहवा! भाषणाचा आरंभ दिसण्यांत किती सरळ आहे? तिला महत्व देण्याचा किती प्रयत्न आहे. यांत खुब्या तरी किती आहेत. पण वस्तुतः हिचें (**कामंदकी**चे) तसें भाषण असेल तर त्यांत फारसें नवल नाहीं. स्वतः सर्व शास्त्रांत पारंगत असून बुद्धि अत्यंत तीव्र, समयोचित बोलण्याची तयारीही त-शीच. बोलण्याचा सराव, तसाच काळवेळ पाहून बो-लण्याचें तारतम्य आणि स्मरणशक्ति हे गुण ज्याच्या अंगीं असतील, त्याला प्रत्येक कामांत ते कामधेनूसारखे साह्य-कारीच होतात. एकंदरींत ह्या भगवतीच्या अंगीं ते सर्व गुण असल्यामुळें हिच्या सर्व गोष्टी यथास्थित सिद्ध होतात.'

इकडे **कामंदकी मालती**ला म्हणाली, 'त्याचें मन असें क्षुब्ध झाल्यामुळें तो आपल्या जिवावर देखील उदार झाला आहे. आणि पाहिजे तसलें साहस करणार नाहीं असें नाहीं. आतांशीं तो—नुकताच ज्याला मोहोर आला आहे व ज्याच्यावर बसून कोकिल मधुर शब्द करीत आहेत, अशा आंब्याच्या मोहोरावर सारखी दृष्टि लावून बसतो. बकुळीचा सुवास घेऊन वाहणाऱ्या वाऱ्याच्या समोर अंग





टाकून पडतो, कमलनीची पानें मात्र कायतीं अंगावर ठेवून पुष्कळ काहिली होऊन मरण यावें ह्मणून चंद्राच्या किरणांचें सेवन करतो.

हें ऐकून **माधव** म्हणाला, ' मी कधीं ज्याचा अनुभव देखील घेतला नाहीं, अशा गोष्टींचें यावेळीं ही वर्णन करीत आहे.'

इकडे **मालती** मनांत म्हणाली, ही (**कामंदकी**) सांगते त्याप्रमाणें तो करीत असेल तर फारच दुष्कर करतो म्हणावयाचें.

**कामंदकी** म्हणाली, ' याप्रमाणें त्याची स्थिति असल्यामुळें स्वभावतःच फार नाजुक असा तो मुलगा (**माधव**) यापूर्वीं अशा क्लेशांचा कधीं अनुभव घेतला नसल्यामुळें कदाचित् मरणाचा देखील अनुभव घेईल असें वाटतें!'

---

(१) पुष्कळ शास्त्र शिकलें तरी अनुभवावांचून सारें खोटें. बिचारी कामंदकी आपल्या भगव्या वेषाला न शोभणारें कृत्य केवळ प्रेमानें करण्यास प्रवृत्त झाली असून विषयसुखाचा यावज्जन्मांत अनुभव नाहीं,तरी स्त्रीपुरुषांचें मनोगत समजून विषयसमुद्रांत पोंहलेल्या बायकोसारखी मोठ्या खुबीनें ती बोलत असे. पण याठिकाणीं मात्र ती अगदीं फसली. कारण कमलनीच्या पानांवर निजणें व तीं अंगावर घेणें, हें कामाग्नीचा दाह शांत करण्याचे उपाय आहेत खरे ; पण फक्त स्त्रियामात्र यांचें सेवन करितात. पुरुषांनीं कमलिनीचीं पानें अंगावर घेतल्याचें दुसरीकडे कोठेंच आढळत नाहीं. बोलून चालून शास्त्रिय ज्ञानावर कायती तिची सर्व इमारत. अनुभवाचा लेश देखील नाहीं. तेव्हां तिच्याकडून अशा चुका होण हें साहाजिकच आहे. व ह्मणूनच माधवानें मी—ज्या गोष्टींचा कधीं अनुभव घेतला नाहीं त्याचें ही वर्णन करीत आहे, असें ह्मटलें.

हें ऐकून **माधवाला कामंदकीनें** आपल्यावर हा मोठाच उपकार केला असें वाटलें. **मालती लवंगिकेला** हळूच म्हणाली, गडे, 'आपल्याकरितां सर्व लोकांचा केवळ अलंकारभूत अशा त्याचें (**माधवाचें**) कांहींतरी विपरीत होईल, अशी शंका भगवतीनें घेऊन मला फारच भिवविलें आहे, तेव्हां आतां यावेळीं काय करावें?'

यावर **लवंगिका** तिला कांहीं उत्तर न देतां **कामंदकीला** म्हणाली, 'आई, आपण म्हटलें, तें तसें असेल खरें; पण आमची ही छोटी धनीन (**मालती**) आपल्या घराच्या जवळच्या रस्त्याला क्षणभर शोभविणारा जो **माधव** त्याचें खिडकींतून वरचेवर दर्शन घडल्यामुळें ——सूर्याच्या तेजानें स्पर्श केलेल्या सुंदर कमळिणीसारख्या म्लान झालेल्या आपल्या अवयवांनीं आपली कामवेदना व्यक्त करीत आहे. व अशा स्थितींत विशेष रमणीय दिसत असूनही आमच्यासारख्या सख्यांला——आतां पुढें हिची अवस्था काय होईल ह्या चिंतेंत पाडते. कसलेही खेळ काढले तरी हिचें मन तिकडे लागत नाहीं. कमळासारख्या सुंदर दिसणाऱ्या डाव्या हातावर गाल ठेवून उगीच बसून दिवस काढते. आणखी प्रफुल्लित झालेल्या कमळांतील मकरंदाचे बिंदु वाहणारा, व नुकतेच उमललेल्या कुंद आणि माकंद पुष्पांतील मकरंदाचे बिंदु वाहणाऱ्या आपल्या महालाच्या जवळच्या शीतल वायूनेंदेखील हिला विशेष काहिली होते! त्यादिवशीं मदनोद्यानांत यात्रेच्या प्रसंगीं आपल्या महोत्सवांत लोकांना दर्शन देण्याकरितां प्रत्यक्ष रूप धारण करून आलेला भगवान् मदनच कींकाय? अशा त्या महाभागाचें (**माधवाचें**) हिला अवलोकनसौख्य मिळालें

तेव्हांपासून विशेष प्रकारें होणारे दुःसह आयास व त्यापासून विस्तार पावणारा शरीराचा दाह दिवसेंदिवस वृद्धिंगत होत असल्यामुळें ही फार विलक्षण दुःखकारक स्थितीचा अनुभव करीत आहे. सूर्यविकासि कमलिनी चंद्रोदयानें म्लान होते, तशी हीही चंद्राला पाहून म्लान होते. तथापि घटकाभर मानसिक वल्लभसमागमाचा अनुभव झाला ह्मणजे हिच्या अंगाला दरदरून घाम येऊन जमीन भिजून गार होते, हें आम्ही वरच्यावर पाहतों. हिचा मुखचंद्र तशा स्थितींत पाहिला म्हणजे चतुर सख्यांला हिच्या कुमारीपणाविषयीं मोठा संशय उत्पन्न होतो. अत्यंत शीतळ ज्याचे किरण आहेत अशा चंद्राच्या प्रकाशांत बसून चंद्रकांतमण्याचा हार गळ्यांत धारण करून ज्यांत पुष्कळ कापूर कंकोळ इत्यादि थंड पदार्थ घातले आहेत, अशी चंदनाची उटी अंगाला लावून लहान केळींच्या पानांनीं दासी हिला वारा घालीत असतां ही ओल्या कमलपत्रांवर तळमळत पडून कशी तरी रात्र घालविते. तळमळतां तळमळतां एखादे वेळ कुठे डोळा लागला, तर त्यावेळीं स्वप्नसुखानुभवानें हिच्या सर्वांगाला घाम सुटतो. पायाला लावलेला आळता पाघळून जातो. उरस्थळ थरथर कांपूं लागतें. वरच्यावर श्वास सोडते आणि दोन्हीं भुजलतांनीं छाती घट्ट आवळून तितक्यांत जागी झाली म्हणजे—आपण एकटीच येथें पडलें आहे असें पाहून हिला मोह उत्पन्न होतो; व त्यासरसें डोळे झांकून अगदीं निश्चेष्ट पडते. जेव्हां सख्या पुष्कळ प्रयत्न करतात, तेव्हां कांहीं वेळानें श्वास सोडूं लागली ह्मणजे ही अद्याप जिवंत आहे असें समजून आह्मीं सगळ्याजणीं आनंदित होतों, आतां हिचें हें दुःख घालविण्यास काय

उपाय करावा तें सुचत नाहीं. ही—देवा मला मरण येईल तर बरें होईल, अशा दुःखांत मला आणखी किती दिवस रहावें लागणार आहे कोणास ठाऊक! अशा प्रकारचे उद्गार काढून आमच्यासारख्या सख्यांला दैवावर बोटें मोडायला लावते. तेव्हां **कामंदकी**आई आपणच नीट परीक्षा करून पहा. ह्या हिच्या सुकुमार शरीरावर मन्मथ आणखी किती दिवस बाणांचा प्रहार करणार आहे. व अशा किती रात्री हिला घालवाव्या लागतील हें नीट पाहा. सुगंधिक बकुल वृक्षाचा वास घेऊन हिच्यासारख्याला केवळ दुःख देण्याकरितांच वाहणारे हे ह्या वसंतऋतूंतलें सुगंधिक वायु माझ्या प्रियसखीवर अनर्थकारक परिणाम करणारे होतील कीं काय, याची मोठी भीति आहे.'

**कामंदकीनें** ज्याज्या खुब्या मनांत ठेवून भाषण केलें होतें, व **माधव मालती**करितां किती दुःखाचा अनुभव करीत आहे याचें मोठ्या गौलतेनें वर्णन केलें होतें, त्याचें **लवंगिके**ने यथास्थित उत्तर दिलें. व **माधव**च हिच्याकरितां कष्ट भोगीत आहे, असें नसून हीही त्याच्या करितां त्याच्यापेक्षां अधिक कष्ट भोगीत आहे, असें मोठ्याचातुर्यानें सिद्ध करून दाखविलें. तें ऐकून **कामंदकी**ला आपल्या कोटिक्रमापेक्षांही तिचा कोटिक्रम विशेष आहे, असें वाटलें. ती **लवंगिके**ला ह्मणाली, 'अग, तूं ह्मणतेस, त्याप्रमाणें जर हिचा **माधवा**वर अनुराग असेल तर हें गुणज्ञतेचेंच फळ आहे, असें स्पष्ट होतें. व ह्मणूनच हिच्या ह्या अवस्थेनें मला मोठा आनंद होतो. आणि ह्याचा काय परिणाम होईल; अशी शंका येऊन काळीज तुटतें.

हें ऐकून **माधव** ह्मणाला, 'हिला ( **कामंदकीला** )

दु:ख वाटतें हें अगदीं बरोबर आहे.' ह्मणाली, 'अग, **लवंगिके**, हा काय जुलूम! आधींच अत्यंत सकुमार असून सुंदर असें हिचें शरीर आणि त्यावर हा दारुण मदनप्रहार करीत आहे! तशांतून मलयानलानें आंब्यांचा मोहर हालविणारा व चंद्रप्रकाशानें रमणीय, असा हा वसंतऋतूचाच समय आहे. तेव्हां एकापेक्षां एक अनर्थाचीं साधनें प्राप्त झालीं आहेत!'

**लवंगिका** ह्मणाली, 'भगवतीला हेंही माहीतच असेल, कीं चित्राच्या पाटीवर हिणें **माधवा**ची तसबीर काढली होती.'

**मालती**चा पदर एकीकडे करून—तिनें **माधवा**नें गुंफलेली बकुलीची माळ **लवंगिके**नें तिला आणून दिली होती, ती आवडीनें तशीच आपल्या गळ्यांत घातली होती. ती दाखवून ह्मणाली, 'ही माळा कायती सांप्रत ह्या प्रियसखीला प्राण धारण करण्याला आधारभूत झाली आहे.'

**लवंगिके**नें आपण केलेली माळ बाहेर काढून **कामंदकी**ला दाखविली, हें पाहून **माधव** आशेनें माळेला उद्देशून ह्मणाला, 'अग माले, तूं ह्या लोकांत मोठी धन्य आहेस खरी. कारण गडे, तूंच ह्यिची अत्यंत आवडती होऊन कोमेजलेल्या कमळाच्या देठासारख्या पांढऱ्या दिसणाऱ्या हिच्या विस्तृत स्तनांच्या उंचवट्याला तूं यावेळीं शोभवीत आहेस.'

**मदयंतिका** शंकराच्या मंदिराकडे जाण्यास निघाली होती हें पूर्वीं सांगिलेंच आहे. तिणें बरोबर पूजेचें साहित्य घेतलें होतें; व तिच्या सख्या मागेंपुढें तिच्याबरोबर चालल्या होत्या. **बुद्धरक्षिता** तिच्या बरोबर नव्हती तरी ती **कामंदकी**च्या मठांत जाऊन लौकरच रस्त्यांत तिला येऊन मिळाली. वाटेंत कांहीं गोष्टी बोलत सावकाश सावकाश

ती शंकराच्या मंदिराजवळ बागेच्या बाहेर येऊन पोहों-चली. इतक्यांत जवळच्या एका मठांत एक मोठा दांडगा वाघ पिंजऱ्यांत घालून ठेवलेला होता, तो अकस्मात् कोणी खवळविल्यावरून, रागानें पिंजऱ्याचे गज मोडून बाहेर पडला. तो भयंकर प्राणी चहूंकडे उड्या मारीत ह्या तरुण मुलींच्या अगदीं जवळ आला, तेव्हां त्यांच्यांत एकच कल्होळ उडाला. तो दैवयोगानें **मदयंतिके**च्या अगदीं जवळ आला. तेव्हां तिच्या सख्या व आसपासचे सर्व लोक मोठ्यानें ओरडून ह्मणाले—'अरे धांवारे, धांवा ! अरे, ह्या शंकराच्या मंदिराजवळ कोण असतील ते लवकर या ! हा वाघ आमची प्रियसखी **मदयंतिका** हिच्या भोंवतीं घिरट्या घालीत आहे. अरे काय वाट पाहतां ? हिचें रक्षण करा ! राजाचा प्रधान **नंदन** ह्याची ही बहीण **मदयंतिका** ह्या वाघाच्या तडाक्यांत सांपडली आहे. हिच्या बरोबरचे सर्व लोक पळाले. कांहीं पुढें गेले त्यांला ह्या दुष्ट वाघानें ठार केलें. तर लवकर या.'

ही गडबड ऐकून **मालती** भिऊन ह्मणाली, '**लवंगिके**, बाई आतां कायग करावें ? हा मोठाच अनर्थ कोसळला !'

**बुद्धरक्षिता** ओरडत होती तिचा शब्द ऐकून **माधवा**ला स्फुरण आलें. आपण येथें छपून बसलों आहों, या गोष्टीचें त्या आवेशांत त्याला कांहीं स्मरण न राहतां, तो एकदम गडबडीनें उठून उभा राहून—**बुद्धरक्षिते**, घाबरूं नको ! तो दुष्ट वाघ कोठें आहे तें सांग, असें ह्मणत तिकडे निघाला. तेव्हां अकस्मात् त्याला पाहून **मालती**ला मोठा हर्ष व भय दोन्ही विकार उत्पन्न झाले.

ती मनांत ह्मणाली, अगबाई ! ही स्वारी देखील येथेंच होती. हावेळपर्यंत मला मुळींच कळलें नव्हतें.

इकडे **मालती**ला त्याच्या दर्शनानें आनंद झाला; पण आह्मी येथें निवांत आहों असें समजून कांहीं गोष्टी बोलत होतों, त्या याणें ऐकल्या असतील; म्हणून तिला भीति वाटली. **माधवा**ला तिला पाहून फार आनंद झाला. तो मनांत ह्मणाला, वाहवा ! आज मी मोठा धन्य आहें. कारण अकस्मात् मी दृष्टीस पडल्यामुळें चकित झालेल्या हिच्या दृष्टीला मी पात्रभूत झालों. मला यावेळीं किती सौख्य झालें आहे तें कांहीं सांगतां येत नाहीं. माझ्या सर्व अंगाला कमळांच्या हारांनीं वेढलें आहे कीं काय असें वाटतें ! दुधाच्या पुरानें मला स्नान घातल्यासारखें वाटतें. हिणें ताठ उघडलेल्या डोळ्यांनीं माझें शरीर वेढून घेतल्यामुळें अमृताची वृष्टि करणाऱ्या मेघानें माझ्यावर पुष्कळ वर्षाव केल्यासारखा मी शांत झालों आहें.

इतक्यांत **बुद्धरक्षिता** पुढें येऊन **माधवा**ला ह्मणाली, ‘ महाभागा, ह्या बागेच्या बाहेरच्या रस्त्याच्या तोंडाशींच तो वाघ आहे; तर आतां वेळ लाऊं नको.’

हें ऐकून **माधव** मोठ्या अवसानानें तिकडे धांवत गेला. **कामंदकी**नें—मोठ्या हुषारीनें त्याच्यावर चाल करण्यास सांगितलें; पण **मालती**ला फार भय वाटलें. बोलून चालून वाघच तो. त्याच्या अंगावर **माधव** धांवून गेला; ह्मणून ती हळूच **लवंगिके**ला म्हणाली, ‘ हाय हाय ! **लवंगिके**, गडे या वेळीं जीव संशयांत पडला.’

**लवंगिका** यावर कांहीं बोलली नाहीं. **कामंदकी**, **बुद्धरक्षिता**, **मालती**, आणि **लवंगिका** या चौघीही

**माधवाच्या** पाठोपाठ बागेच्या बाहेर गेल्या. **माधव** त्या वाघाजवळ जाऊन त्याचें तें विक्राळ **स्वरूप** पाहून म्हणाला, अरेरे! ह्याच्या ह्या लांब दांतांत आंतड्यांचा कांहीं भाग गच्च बसला आहे, आणि कांहीं तुटलीं आहेत. ह्याणें मारलेल्या प्राण्यांचे अवयव जिकडे तिकडे अस्ताव्यस्त पडले आहेत. गुडघाभर रक्ताचे पाट वाहून आसपास चिखल झाला आहे. असा ह्या वाघाचा मार्ग फार बीभत्स असून भयंकर झाला आहे!

**माधव** अंमळ पुढें जाऊन ह्मणाला, अरेरे! आह्मी फार दूर होतों. आणि इकडे ह्या जनावराच्या सपाट्यांत ही मुलगी ( **मदयंतिका** ) सांपडली; हें ऐकून **मालती** इत्यादि स्त्रिया दुःखित होऊन---हाय हाय! गडे **मदयंतिके**, कोठें गेलीस? ह्मणून शोक करूं लागल्या.

इतक्यांत अकस्मात् **मकरंद** तेथें आला, आणि त्याणें वाघ आणि **मदयंतिका** यांच्यामध्यें शिरून वाघाशीं झोंबी मारून त्याला मोठ्या शौर्यानें मारून टाकलें. पण त्याच्या अंगाला पुष्कळ मोठ्या जखमा लागल्या. वाघाला मारलें हें पाहून **कामंदकी** आणि **माधव** यांना फार आनंद झाला. व **मदयंतिका** शाबूत राहिली हें पाहून सर्वांला विशेष आनंद झाला. लौकरच सर्व मंडळी एकत्र जमा झाली. वाघ तिकडे मरून पडला, व त्याच्या बरोबर जबर जखमा लागल्यामुळें **मकरंदही** मूर्च्छित पडला. त्याला **मदयंतिकेनें** सांवरून धरिलें. इतक्यांत **माधवाला** त्याची ती अवस्था पाहून एकदम मूर्च्छा आली आणि तो **कामंदकीच्या** अंगावर---मला संभाळ, असें बोलून मूर्च्छित होऊन पडला.



---

**मकरंद मदयंतिकेच्या** मांडीवर बेशुद्ध होऊन पडला होता. व आपल्या प्रिय मित्राची ती अवस्था पाहून मूर्च्छित झालेल्या **माधवाला लवंगिकेनें** मांडीवर घेतलें होतें. **कामंदकी, मालती,** आणि **बुद्धरक्षिता** ह्या घाबऱ्या होऊन त्यांला सावध करण्याचा प्रयत्न करीत होत्या. **मदयंतिकेला बुद्धरक्षितेनें मकरंदाचे** पुष्कळ गुणानुवाद सांगितले होते व त्यावरून ती त्याच्यावर आसक्तही झाली होती; तथापि अद्याप प्रत्यक्ष उभयतांची दृष्टादृष्ट मुळींच झाली नव्हती. या वेळीं ती त्याला आपल्या मांडीवर घेऊन त्याच्या विषयीं फार दुःख करीत होती; पण त्यांत दुसरा कांहीं हेतु नव्हता. आपणाला वांचविण्याकरितां या गृहस्थानें एवढें साहस केलें असून याची प्राणांतिक अवस्था झाली आहे, हें त्या कोमलमनाच्या मुलीच्यानें पाहवेना. ह्मणून ती केवळ कृतज्ञताबुद्धीनें त्याला आपल्या मांडीवर घेऊन बसली. बराच वेळ झाला तरी अद्याप सावध होत नाहीं असें पाहून ती **कामंदकीला** ह्मणाली, '**भगवति कामंदकी**आई, ह्या कपाळफुटक्या **मदयंति**केकरितां आपला जीव धोक्यांत घालणारा, संकटांत पडलेल्याची दया करणारा हा महाभाग (**मकरंद**) लौकर सावध होईल, असा कांहीं तरी उपाय करा!'

त्या दोघी तिघी अल्लड पोरी ह्या भयंकर प्रसंगानें अगदीं घाबरून गेल्या होत्या. त्यांना काय करावें, हें मु-

वेळ वारा घालीत रहा ह्मणजे हे सावध होतील.' हें ऐकून **मालती, मदयंतिका, लवंगिका,** व **बुद्धरक्षिता,** ह्या त्या दोघांलाही वारा घालूं लागल्या. कांहीं वेळानें **मकरंद** शुद्धीवर येऊन उठून बसला. आणि **माधव** मूर्च्छित पडला होता, त्याचा हात धरून—'गड्या **माधवा,** तूं काय असा भित्रा आहेस का ? अरे अंमळ डोळे उघडून पहा माझ्याकडे तरी. मी चांगला सावध झालों आहें. मला कांहीं झालें नाहीं.' असें ह्मणून त्याणें **माधवाला** उठवून बसविलें. तरी तो लवकर सावध झाला नाहीं.

**मकरंद** ह्मणतात तो हाच हें **मदयंतिके**ला पूर्वीं माहीत नव्हतें. पण **कामंदकी**नें त्याचें नांव घेऊन हांक मारली त्यावरून तिला समजलें. तो सावध झाला असें पाहून तिला फारच आनंद झाला. आणि—अगबाई! ह्या **मकरंद**रूपी पूर्णचंद्राचा आतां उदय झाला हें बरें झालें! माझा जीव बिनघोर झाला, असें ह्मणाली.

**माधवाला मकरंदा**नें उठवून बसविलें, तरी तो गुंगींतच होता. इतक्यांत **मालतीनें** त्याच्या कपाळावर हात ठेवला, तेंव्हां सावध झाला हें पाहून आनंदानें **मालती** ह्मणाली, 'गडे **लवंगिके,** दैवानें तुझा हेतु पुरविला. तुझा प्रियमित्र ( **माधव** ) तर सावध झालाच आणि हा महाभाग **मकरंद**ही सावध झाला !'

इतक्यांत **माधव** उठून उभा राहून—अरे साहशा, इकडे ये—असें ह्मणून **मकरंदा**ला कडकडून भेटला. नंतर





**कामंदकी** दोघांच्याही डोक्यांचें अवघ्राण[1] करून—माझे दोन्ही मुलगे सावध झाले ही परमेश्वरानें मोठी कृपा केली —असें ह्मणाली. व बाकी सर्वांनीं आपलें प्रिय झालें, असे उद्गार काढून आनंद प्रदर्शित केला.

**बुद्धरक्षिता** हळूच ह्मणाली, 'गडे **मदयंतिके**, मी तुला सांगितला तो हाच.'

**मदयंतिका** ह्मणाली 'हें मी मघांच समजलें, हा **माधव** आणि हा तो ह्मणून.'

यावर **बुद्धरक्षिता** ह्मणाली, 'आतां मी सांगितलें तें खरें कीं खोटें याविषयीं तुझी खात्री झालीना? कायतें सांग पाहूं.'

**मदयंतिका** ह्मणाली, 'उगीच भलत्याच ठिकाणीं तुझ्या सारख्या चतुर स्त्रियांचा पक्षपात असावयाचा नाहीं.'

**माधवाकडे** पाहून ह्मणाली 'गडे, **मालतीचा** ह्या महानुभावावर ( **माधवावर** ) मोठा अनुराग आहे ह्मणून सांगतात, तेंही फार चांगलें आहे.' असें ह्मणून पुनः **मकरंदाकडे** प्रेमानें पाहूं लागली.

स्त्रिया केवळ रूपालाच भुलतात असें नाहीं, त्यांला

---

१ प्राचीन काळीं मुलासारखे मानलेले असे आप्तजन कांहीं पराक्रम करून आले, किंवा मोठ्या संकटांतून पार पडले, किंवा बाहेरून कुठून तरी येऊन भेटले, तर वडील मनुष्यांनीं त्यांचें डोकें हुंगावें अशी चाल होती, असें दिसून येतें. पुराणादि अनेक प्राचीन **ग्रंथांत "शिरस्याघ्राय"** हें किंवा अशा अर्थाचीं वाक्यें पुष्कळ आढळतात.

[illegible] पुरुषांवर विशेष [illegible] असतात. त्यांतू न एखाद्या पुरुषाचें गुणानुवाद ऐकून त्याच्याकडे त्यांचें लक्ष्य लागलें व तशा स्थितींत त्याचा कांहीं विशेष पराक्रम पाहिला, ह्मणजे तर त्यांचें अंतःकरण फारच आसक्त होतें. **मकरंद** आणि **मदयंतिका** यांचा यावेळीं प्रथमच भेटीचा योग आला असून तो फारच उत्तम प्रकारें घडून आला. **बुद्धरक्षितेनें** वरचेवर वर्णन केल्यामुळें **मदयंतिकेला मकरंद** आवडूं लागला होता, व एकवेळ त्याची भेट व्हावी अशी तिला इच्छा झाली होती. तसेंच **मकरंदा**लाही तिचें रूप व गुण ऐकून तिला पाहण्याची उत्कंठा लागली होती.

याप्रमाणें अप्रत्यक्ष रीतीनें परस्परांवर प्रेम करणाऱ्या ह्या दोघांची दुसऱ्या कोणत्याही प्रसंगानें भेट झाली असती, तर त्यांत कांहीं विशेष वाटलें असतें किंवा नाहीं, हें सांगवत नाहीं. तथापि प्रकृत योग मोठा उत्तम आला यांत कांहीं संशय नाहीं. **मदयंतिका** प्राणसंकटांत पडली असून त्यावेळीं अकस्मात्—ती ज्याच्यावर प्रेम करीत होती, त्याच मनुष्यानें नकळत तेथें येऊन आपला जीव धोक्यांत घालून तिचा बचाव केला व पुढें सहज आपण ज्याच्यावर प्रेम करीत आहों तोच हा असें तिला समजलें, हा प्रसंग किती मनोवेधक आहे याचें वर्णन करावें तितकें थोडेंच; पण तसें करण्याला शब्दच मिळत नाहींत.

वस्तुतः अशी कांहीं संकटाची वेळ नसून—**माधव** आणि **मकरंद** या उभयतांला तिणें एके ठिकाणीं पाहिलें असतें, तर **माधवाला** सोडून **मकरंदावर** तिचें मन गेलें असतें





किंवा नाहीं, याविषयीं संशयच आहे. कारण, **मकरंदा**-पेक्षां **माधवा**च्या अंगीं गुण विशेष होते. एक तर तो मोठा श्रीमान् असून मोठ्या अधिकाऱ्याचा मुलगा व **मकरंदा**चा धनी— तो तशा रीतीनें त्याला वागवीत नव्हता तरी—असें ह्मटलें तरी चालेल. शिवाय भाग्यशाली पुरुषाकडे स्त्रियांचें मन वळण्याचा विशेष संभव असतो. यावरून **मदयंतिके**चें मन **माधवा**वर बसलें नसतें, असें ह्मणवत नाहीं; तरी, भाग्यापेक्षांही शौर्याची विशेष चहा असण्याचा संभव असल्यामुळें त्या शौर्य गुणानें **मदयंतिके**च्या मनाला **मकरंदा**नें ओढून घेतलें, व तेंही प्रत्यक्ष तिला जीवदान देण्याच्या प्रसंगानें घेतलें. स्त्रिया स्वभावतः मोठ्या मायाळू असून त्यांचें मन कोमळ असतें. आपल्यावर उपकार करणाऱ्याविषयीं त्या किती कृतज्ञ असतात, व त्याच्यावर किती प्रेम करतात, याचें वर्णन करणें कठिण आहे. सारांश, **मदयंतिके**ची आणि **मकरंदा**ची भेट अशा कांहीं उत्तम रीतीनें घडून आली कीं, **मदयंतिके**ला विशेष कांहीं विचार न करितां एकदम आपल्या हृदयांतल्या रमणीय जाग्यांत **मकरंदा**ला विराजमान होण्याला कांहीं विचारच करावा लागला नाहीं!

**कामंदकी**ला त्या उभयतांची भेट मोठी आनंदकारक वाटली. ती त्या भेटीच्या संबंधानें **मकरंदा**ला ह्मणाली, 'वत्सा **मकरंदा**, अगदीं नेमका ह्याच प्रसंगीं **मदयंतिके**चे प्राण वांचविण्याकरितां दैवानें तुला येथें कसा आणिला याचें मला मोठें नवल वाटतें.'

**मकरंद** ह्मणाला, 'सांगतों ऐका. आज शहरांत सहज माझ्या कानांवर एक गोष्ट आली व ती ऐकून ह्या

असें असें होणार आहे, ह्मणून मला कांहीं सांगितलें त्या-
वरून मी इकडे यावयाला निघालों. तों ही वाघाची गडबड ऐकून धांवत धांवत पुढें येऊन पाहतों तों ही कुलीन कन्यका ( **मदयंतिका** ) त्या क्रूर जनावराच्या तडाक्यांत सांपडली आहे असें पाहून हिला सोडविण्याचा निश्चय केला, व पुढें काय झालें तें तुह्मीं पाहिलेंच आहे.'

**मकरंदानें** कांहीं वर्तमान ऐकलें व त्यापासून **माधवाच्या** मनाला उद्वेग येईल अशी आपल्याला शंका आल्याचें त्याणें सांगितलें. हें ऐकून **मालती** आणि **माधव** दोघेंही मोठ्या विचारांत पडलीं. याणें काय वर्तमान ऐकिलें असावें, या विषयींचें त्यांना मोठें गूढ पडलें; पण **कामंदकी**ला तें तेव्हांच समजलें. ती—हा वर्तमान ऐकिलें ह्मणतो, तें बहुत करून **मालती नंदना**ला देण्याचें **भूरिवसूनें** कबूल केलें, अशी गांवांत भुमका उठली आहे तेंच असावें, असें समजली.

**मकरंद** आणि **मदयंतिका** या दोघांचा तर निश्चय झालाच होता. कारण, **मकरंदानें मदयंतिकेचे** प्राण वांचविले, तेव्हां ती त्याला सोडून दुसऱ्याला वरणार नाहीं हें सिद्धच झालें. तथापि हा या दोघांचा संबंध गौण होता. मुख्य काय तो **मालतीमाधवाचाच** समागम होय. तेव्हां दोघांला एकमेकांच्या वचनांत गुंतवून घ्यावें व त्याला हीच उत्तम संधि आहे, असें पाहून **कामंदकी** **माधवाला** ह्मणाली, ' वत्सा **माधवा**,





तुझ्या मित्राच्या शौर्यानें तुझें मोठें सहाय केलें. तेव्हां मालतीला प्रीतिदाय[1] देण्याचा हाच समय आहे.'

हें ऐकून **माधव** ह्मणाला, 'भगवति, वाघानें जखमा केल्यामुळें मूर्च्छित झालेल्या माझ्या मित्राची अवस्था पाहून मीही मूर्च्छित झालों असतां, मोठ्या सौजन्यानें माझ्या कपाळावर हात फिरवून हिणें मला सावध केलें. तेव्हां ही —गुप्तविवाह करून मला अनुसरेल तर माझें हृदय घेण्यास व नाहींपेक्षां माझे प्राण पूर्णपात्र[2] बुद्धीनें घेण्याला योग्य आहेत. म्हणून तीं दोन्हीं मी हिच्या ( **मालतीच्या** ) हवालीं करितों.'

हें ऐकून **लवंगिका** ह्मणाली, 'आमच्या प्रिय सखीला ( **मालतीला** ) हा प्रसाद मनापासून अत्यंत इष्ट आहे.'

**मदयंतिका** मनांत ह्मणाली, दैवशाली पुरुष कोणत्या प्रसंगीं कसें विशेष गोड बोलावें, तें चांगलें जाणतात.

**माधवानें** जें कांहीं सांगितलें तें ऐकून **मालती** फारच आनंदित झाली ; पण **मकरंदानें** उद्वेगाचें कारण काय ऐकलें, ही शंका अद्याप तिच्या मनांतून गेली नव्हती. व यामुळें तिची मुद्रा जितकी प्रसन्न दिसावी तितकी दिसली नाहीं. हें समजून **माधव मकरंदाला** ह्मणाला, 'गड्या, मला अधिक उद्वेग होण्याला कारण अशी तूं वार्ता ऐकलीस ती कोणती तें सांग. हें ऐकून **मकरंदाला** अशी गोष्ट याला

---

१ प्रीतिदाय ह्मणजे सामान्यतः खुषीची देणगी, असें ह्मणतां येईल. कांहीं आनंदाचा प्रसंग प्राप्त झाला असतां त्यावेळीं अलंकार, वस्त्र किंवा दुसरें कांहीं तरी उत्तम वस्तु मुद्दाम मागून घेणें, किंवा देणें, याला प्रीतिदाय ह्मणतात.

२ हेंही वर सांगितलेल्या प्रीतिदायाचेंच नांव आहे.

कशी सांगावी याचें फार कठीण वाटलें पण तो जें सांगणार होता, तेंच अकस्मात् दुसऱ्या मनुष्याच्या मुखानें **माधवा**ला कळण्याचा प्रसंग आला.

यांचा असा प्रसंग चालला आहे तों **मदयंतिके**च्या घराकडून एक मनुष्य लौकर लौकर तेथें येऊन ह्मणाला, 'मुली **मदयंतिके**, तुझा थोरला बंधु अमात्य **नंदन** याणें तुला असें सांगितलें आहे कीं,—आज महाराज आपल्या घरीं आले होते, व त्यांणीं **भूरिवसू**वर आपला मोठा विश्वास व आमच्यावर अनुग्रह असल्याचें व्यक्त करून **मालती** स्वतः आपणच मला दिल्याचा निश्चय केला आहे. त्या संबंधानें आनंदप्रदर्शनार्थ आज मोठा उत्सव सुरु केला आहे; तर तूं लवकर घराकडे येऊन हा समारंभ साजरा कर. तर चल आतां लौकर घराकडे.'

**नंदना**नें आपल्या बहिणीला हा पाठविलेला निरोप ऐकून **मकरंद माधवा**ला ह्मणाला, 'गड्या, मी ऐकली ती वार्ता हीच.' **मालती** आणि **माधव** यांना ही वार्ता विषापेक्षांही फार कठीण वाटली. तीं उभयतां जागच्या जागीं अगदीं चित्र्यासारखीं झालीं.

**मालती**चा **माधवा**वर विशेष अनुराग आहे, हें **मदयंतिके**ला माहीत होतें व त्यावरून मैत्रिणीच्या धर्मानें वर सांगितलेलें वर्तमान ऐकून तिला कांहीं खेद झाला पाहिजे होता; पण प्रत्येक मनुष्य आपल्याकडे विशेष ओढा ठेवीत असतें. **माधव** सर्वगुण संपन्न आहे, व **मालती** त्याच्यावर विशेष अनुरक्त असून आपली प्रिय मैत्रीण आहे. तेव्हां या दोघांचा हेतु पूर्ण व्हावा, असें ह्या क्षणाच्या पूर्वक्षणापर्यंत **मदयंतिके**च्या मनांत होतें. व ह्मणूनच **माधवानें**

**मालती**ला आपलें मन व जीवित अर्पण केलें, याविषयीं तिनें आनंद प्रदर्शित केला, त्याला अद्याप एक अर्धि घटकादेखील झाली नाहीं. हें सारें खरें. तथापि भावाचा निरोप ऐकतांक्षणींच तिची वृत्ति एकदम बदलण्याला अवकाश लागला नाहीं. ती **मालती**ला आनंदानें मिठी मारून ह्मणाली, 'गडे **मालती**, तूं आणि मी एकाच गांवांत राहणाऱ्या असून लहानपणापासून तुझी आमची विशेष मैत्री आहे. आमचें दोघींचें बहिणीचें नातें असून सांप्रत तर तूं आमच्या घराची मालकीण झाली आहेस. तेव्हां हा योग किती रमणीय झाला बरें ?'

**मदयंतिके**नें असें म्हटलें तें ऐकून **कामंदकी** मनांत हंसली. तुम्ही दोघें खुशाल मनोराज्य करा. पण पुढें होण्याची गोष्ट काय ती निराळीच आहे, असें तिच्या मनांत आलें तरी तें व्यक्त न करितां वरकांतीं आपल्याला आनंद झाल्यासारखें दाखवून **मदयंति**केला ह्मणाली, 'वत्से **मदयंतिके**, भावाला **मालती**चा लाभ झाला याच्या योगानें दैवानें तुजवर मोठा अनुग्रह केला असें म्हटलें पाहिजे.'

**मदयंति**केला तिचा खरा हेतु कांहीं कळला नाहीं. ती भोळ्या भावानें ह्मणाली, '**कामंदकी**आई, हा सारा तुमच्या आशीर्वादाचा प्रभाव आहे.'

**लवंगिके**ला ह्मणाली, 'गडे **लवंगिके**, तुमचा लाभ झाला ( **मालती** भावास मिळाली ) तेणेंकरून आमचे मनोरथ सफळ झाले!'

**लवंगिके**ला हे तिचे उद्गार कितीसे आवडले असतील

हें कांहीं सांगावयास नको, तथापि तिणेंही वरकांती संतोष झाल्यासारखें दाखवून ती ह्मणाली, 'सखे **मदयंतिके**, हें देखील आम्हांला सांगितलें पाहिजे काय ? तुझा ज्यांत आनंद त्यांत आम्हांला आनंद झाल्याशिवाय कसा राहील.'

**नंदनानें** राजाच्या सांगण्यावर भरंवसा ठेवून त्याचें वचन मिळाल्यावरून वाग्निश्चयाच्या निमित्तानें आज उत्सव करण्याची तयारी करून बहिणीला बोलाऊं पाठविलें होतें. त्याप्रमाणें **मदयंतिका** तिकडे जाण्यास सिद्ध होऊन **बुद्धरक्षिते**ला म्हणाली,' गडे **बुद्धरक्षिते**, चल. आपण दादाचा विवाहसमारंभ साजरा करण्यास जाऊं या.'

**बुद्धरक्षिते**ला **कामंदकी**ची मसलत काय आहे हें माहीत होतें; पण तिणेंदेखील त्यांतलें अंग मुळींच कांहीं दाखविलें नाहीं. व चला जाऊं या म्हणून **मदयंतिके**बरोबर ती जाण्यास निघाली. **मदयंतिका** जातेवेळीं वरचेवर **मकरंदा**कडे पाहूं लागली. भावाच्या निरोपाप्रमाणें तिला गेलें पाहिजे होतें, तरी पण आपला हृदयवल्लभ **मकरंद** याला सोडून जाण्याचें तिला फार कठीण पडलें; म्हणून वरचेवर तिचा जीव घोटाळत होता. ती कांहीं पावलें पुढें जाई, व कांहीं तरी निमित्त करून पुनः मागें फिरे.

ही तिची स्थिति पाहून **लवंगिका** हळूच **कामंदकी**ला म्हणाली, 'भगवति **कामंदकी**आई, आंत भरलेला विस्मय आणि आनंद यांणीं हेलकावे खाणाऱ्या व अधीर झालेल्या मनानें **मदयंति**का आणि **मकरंद** यांचे परस्परांवर कटाक्षांचे प्रहार होत आहेत, त्यावरून तीं आपल्या मनांत परस्परांचा संबंध करून पार झालीं आहेत असें वाटतें.'

हें ऐकून **कामंदकी** हंसून म्हणाली, 'इतकेंच नाहीं. एकमेकांकडे पाहून मानसिक समागमाच्या सुखाचाही उभयतां अनुभव घेत आहेत. कसें म्हणशील तर सांगतें ऐक. थोड्याश्या वक्र झालेल्या दृष्टीनें मंद असून डोळ्यांच्या कोरा आकुंचित झालेल्या तिरकस वाटणाऱ्या दृष्टीनें पहात आहेत. प्रेम प्रगट झाल्यामुळें यांचे डोळे अर्धे फुललेल्या कमळासारखे झाले आहेत. भोंवया किंचित् आकुंचित झाल्या आहेत. मनांत आनंदाचा अनुभव होत असल्यामुळें दृष्टि स्निग्ध झाली आहे. लाजेनें स्तनांस स्तब्धता आली असून ते हालत देखील नाहींत. अशी ह्या दोघांची दृष्टि एकमेकांवर त्वरेनें आसक्त झाली आहे. व यावरून त्यांचा मानसिक संभोग चालला आहे याविषयीं कांहीं संशय नाहीं!'

इतक्यांत तिला बोलवायला आलेला मनुष्य फार गडबड करूं लागला. म्हणून ती निरुपायास्तव मन घट्ट करून **मकरंदा**कडे पहात पहात पुढें गेली, आणि **बुद्धरक्षिते**ला म्हणाली, 'गडे, मला जीवदान देणारा तो कमलनेत्र (**मकरंद**) पुनः दृष्टीस पडेल कायग?'

**बुद्धरक्षिता** म्हणाली, 'दैव अनुकूळ असेल तर तसें देखील होईल.'

याप्रमाणें **बुद्धरक्षिता** आणि **मदयंतिका** ह्या दोघी तेथून निघून गेल्या. इकडे **माधव कामंदकीला** हळूच म्हणाला, 'कमळाच्या सूत्रासारखा अत्यंत कठीण हा माझा आशातंतु फार वेळानें तुटला. पण तसें खुशाल होवो! मानसिक दुःख किंवा अपरिहार्य व्याधि खुशाल होवोत आणि तें आतांच झालें तरी कांहीं हरकत नाहीं. चपळतेची

शेवटची कोटी माझ्या ठिकाणीं अगदीं कायमची होऊन बसो! दैवाला स्वस्थपणें बसण्याचा समय खुशाल येवो! हा वेळपर्यंत माझ्याकरितां त्याला जी अस्वस्थता होती ती आतां समूळ नाहींशी होईल. दुःखाचा शेवट ह्मणून जो आहे तो करण्याची ( मरण्याची ) हीच संधी आहे. ज्याचें प्रेम अगदीं आपल्यासारखेंच आहे, अशा मनुष्याची मी इच्छा करीत असून दैवानें त्याच्या विरुद्ध प्रयत्न चालविला आहे. तेव्हां अशा स्थितींत मरावें हेंच मला विहित वाटतें! तथापि राजानें आपलें दान केलें, हें वर्तमान ऐकून प्रातःकालच्या चंद्रासारखें निस्तेज झालेलें हिचें ( **मालतीचें** ) मुख माझ्या अंतःकरणाला जाळीत आहे.'

बाह्यात्कारें ह्या सर्व गोष्टी चालल्या होत्या, तरी **कामंदकी**ला त्याबद्दल कांहीं दुःख वाटत नव्हतें. कारण तिची मसलत कोणकोणत्या रीतीनें सिद्धीस जाणार हें तिला माहीतच होतें. ह्मणून **मदयंतिके**ला आलेला निरोप तिला मोठासा खेदकारक वाटला नाहीं. तथापि **माधवा**ची अत्यंत दुःखित स्थिति पाहून व **मालतीची** निराशा झालेली पाहून तिला फार खेद झाला. ती **माधवाचें** समाधान करण्याकरितां खरी गोष्ट अम्मळ स्पष्ट-करून दाखविण्याच्या हेतूनें ह्मणाली, 'वत्सा **माधवा**, तुला मी असें विचारितें कीं, स्वतः **भूरिवसूच मालती** आपल्याला देईल असें तुला वाटतें काय?'

**माधव** लाजून ह्मणाला, 'नाहीं नाहीं.'

**कामंदकी** ह्मणाली, 'तर मग तूं आपली आशा सोडूं नकोस.'

10

कह्यांत पुरतेपणीं आणलें होतें. आणि उभयतांचा गुप्त-पणीं विवाह करावा, असा जो तिचा हेतु होता, त्याला **मालती** अनुकूल होईल, इतकी तिच्या मनाची स्थिति झाली होती; पण **माधवा**च्या मनांत **मालती**विषयीं विशेष अनुराग असतांही तो आपला हेतु पूर्ण करून घेण्याविषयीं दुसरा कांहीं प्रयत्न करण्याचें सोडून भित्र्यासारखा जीव द्याव-याला तयार झाला, हें तिला आवडलें नाहीं. वस्तुतः हें त्याच्या सरळपणाचें लक्षण होतें; पण अशा वेळीं त्याचा उपयोग नव्हता. **कामंदकी**च्या मनांत त्याला उपदेश करायाचा असून त्याला ही उत्तम संधी मिळाली ती तिणें वायां जाऊं दिली नाहीं.

गुप्त रीतीनें विवाह करून घेण्याचें **माधवा**च्या मनांत पूर्णपणें बिंबवावें या हेतूनें ती त्याला ह्मणाली, 'वत्सा **माधवा**, अरे ही वार्ता तर मला आधींच समजली आहे. राजानें **नंदना**करितां **मालती**ची मागणी केली. तेव्हां **भूरिवसूनें**—माझ्या मुलीवर महाराजांचा सर्व प्रकारें अ-धिकार आहे, असें सांगितलें. हें तर सर्वांला माहीतच आहेना?'

यावर **माधव** कांहीं बोलला नाहीं; पण **मकरंद** ह्मणा-ला, 'हो हो. हें ऐकलें होतें खरें.'

**कामंदकी** ह्मणाली, 'आणि आतां तर राजानें स्वतःच **मालती** दिली, असें त्या मनुष्यानें सांगितलें. तेव्हां सर्व व्यव-हाराचीं तंत्रें केवळ भाषणावर अवलंबून आहेत. चांगलें अ-

अर्थ काय? राजाचा सर्वांवरच अधिकार आहे. **मालती** ही काय खुद्द महाराजांची मुलगी नव्हे. आणि कन्यादानाच्या कामांत राजाचा अधिकार मानावा, असा कांहीं धार्मिक लोकांचा सिद्धांत नाहीं व तसा कोठें आचारही नाहीं. तेव्हां **भूरिवसूनें** राजाला जें सांगितलें त्याविषयीं विशेष विचार करण्याचें कांहीं कारण नाहीं. तेंही असो. पण या संबंधानें मी गाफल आहें, असें कसें तूं समजतोस. तूं स्वतः आपल्याविषयीं व हिच्या ( **मालती**च्या) विषयीं ज्या अयोग्य गोष्टीची ( मरणाची ) शंका करतोस ती तुझ्या शत्रूविषयीं देखील नसो! तुम्हां दोघांचा समागम होण्याविषयीं यत्न करण्याच्या कामांत माझे प्राण खर्च झाले तरी चिंता नाहीं; पण मी तसें केल्याशिवाय कधीं राहणार नाहीं!'

हें ऐकून **मकरंद** ह्मणाला, 'आई, आपण बरोबर आज्ञा केली. आणखी माझी अशी प्रार्थना आहे कीं, तुमची ह्या आपल्या मुलांवर ( **मालती** आणि **माधव** यांवर ) दया आहे ह्मणा किंवा स्नेह ह्मणा, जें कांहीं आहे तें—संसाराच्या कटकटींतून तुह्मीं आपलें मन अगदीं काढून घेतलें आहे तरी तुमच्या मनाला द्रव उत्पन्न करितें. आणि ह्मणूनच ह्या तापसीवेषाला योग्य असें वर्तन सोडून तुमचें या प्रयत्नाकडे मन लागलें आहे. आतां सिद्धि होणें हें दैवाच्या आधीन आहे.'

यांचें याप्रकारें बोलणें चाललें आहे इतक्यांत **मालती**-





च्या आईकडून दासी आली. आणि तिणें **कामंदकीला** —बाईसाहेब ( **मालतीची** आई ) **मालतीला** घेऊन आपल्याला लौकर बोलावीत आहेत, असें सांगितलें. तें ऐकून —**कामंदकी**, वत्से ऊठ आपण जाऊंया—ह्मणून **मालतीचा** हात धरून उठून उभी राहिली. यावेळीं **मालती** आणि **माधव** दोघेंही अगदीं बापुडवाणीं होऊन एकमेकांकडे पाहूं लागलीं.

**माधव** मनांत ह्मणाला, हायहाय ! ही गोष्ट मोठी दुःखकारक आहे ! ह्या **मालतीसह** लौकिक सुखाचा अनुभव काय तो इतकाच **माधवाला** घडावयाचा. यापुढें आतां काय होणार? पण खरोखर अगदीं एकजीव झालेली परस्परांविषयींची अनुकूलता मित्रासारखी प्रथम प्रकट करून भलत्याच वेळीं उलट खाणारा क्रूर विधि माझ्या मनाचें दुःख कसें विस्तृत करीत आहे !

इकडे **मालती** मनांत **माधवाला** उद्देशून ह्मणाली, महाभागा, डोळ्यांला आनंद देणारें हें तुझें दर्शन एवढेंच मला घडलें !

यावेळीं तिची अवस्था फारच शोचनीय झाली होती. **लवंगिका** तिची ती दीन मुद्रा पाहून ह्मणाली, 'हायहाय ! दिवाणजीनीं( **भूरिवसूनें** ) हिचें शरीर संशयांतच पाडलें !'

**मालती** आपल्याशींच ह्मणाली, वांचण्याच्या इच्छेचें फळ यावेळीं अगदीं पर्यवसानाला पावलें. बाबांच्याही निर्दयपणाच्या वर्तनानें त्यांणीं आपल्या कापालिक-

( १ ) 'कापालिक' हा एक मांत्रिक लोकांचा पंथ आहे. याचें विशेष वर्णन पुढें मुळांतच येईल. भूरिवसूची मंत्रशास्त्रावर विशेष श्रद्धा होती, व तोही कापालिकच बनला होता. पण तो

त्याचा पूर्ण उपयोग केला. दुष्ट देवाचा भयंकर प्रयत्न चांगला समजवून झाला आतां मी येथें कोणाला बोल लावावा ? किंवा अनाथ झालेली मी शरण तरी कोणाला जाऊं ? असो. जें काय होणार असेल तें होईल.

इतक्यांत **कामंदकी लवंगिके**सह तिला बरोबर घेऊन घराकडे निघाली. बराच वेळ स्तब्ध उभा राहून निश्चळ दृष्टीनें **माधव** तिच्याकडे पहात होता. शेवटीं तीं दृष्टीआड गेली तेव्हां उसासा टाकून आपल्याशींच ह्मणाला, ह्या **कामंदकी**आईचा माझ्यावर विशेष लोभ आहे, ह्मणून ही माझें समाधान करण्याकरितां तूं आशा सोडूं नकोस, असें ह्मणाली असेल ; पण वस्तुतः त्यांत कांहीं जीव दिसत नाहीं. हायहाय ! माझ्या जन्माची सफळता होईल कीं नाहीं, याविषयीं मी संशयांत पडलों आहें, तेव्हां आतां करावें तरी काय ? अम्मळ विचार करून **मकरंदा**कडे पाहून ह्मणाला, ‘गड्या **मकरंदा**, तुझी ती हृदयवल्लभा **मदयंतिका** हिच्याविषयीं तूंही उत्कंठित झाला असशील नाहींका ?’

**मकरंद** ह्मणाला, ‘विचारतोस काय ! माझ्या अंगावर एकाएकीं त्या वाघानें आपले पंजे मारले होते. त्याच्या त्या जखमा पाहून—अंगावरचा पदर ढळला होता, तिकडे देखील लक्ष न देतां लहान हरिणीसारखी जिची दृष्टि

त्याचा मार्ग फार गुप्त असून तो कापालिक या नांवानें प्रसिद्ध नव्हता. कापालिकांत मनुष्यबळी देण्याची विशेष चाल आहे. मालतीनें कापालिकत्व पुरें केलें, असें ह्मटलें त्याचा अर्थ असा कीं, नंदनाला आपल्याला देण्याचें कबूल करून बापानें एक प्रकारें आपला बळीच घेतला, असें ती समजली.

हें ऐकून **माधवाला** आपल्या पेक्षां **मकरंद** सुखी आहे असें वाटलें. तो ह्मणाला, 'गड्या, **बुद्धरक्षिका** तिची जिवलग मैत्रीण असून ती तुझ्याविषयीं प्रयत्न करीत आहे तेव्हां तुला तुझ्या प्रियेचा समागम होणें फारसें अशक्य नाहीं. त्यांतून त्या भयंकर वाघाला मारून तूं तिला प्राणसंकटांतून वांचविलेंस आणि त्यावेळीं तिणें प्रेमरसानें आर्द्र होऊन तुला जें आलिंगन दिलें, त्याचा अनुभव घडल्यामुळें आतां तुझें मन दुसरीकडे कसें जाणार? बरें पण, त्या कमलनयनेच्या (**मदयंतिकेच्या**) डोळ्यांचा व्यापार ही तसाच होता, कीं ज्याच्या योगानें तुझ्यावर तिचा विशेष स्नेह आहे, असें अगदीं व्यक्त होत होतें.'

**माधव** आणि **मकरंद** दोघेही कामी झालेले असून दोघांचींही मनें दुसऱ्या दोन ठिकाणीं आसक्त झालीं होतीं; पण उभयतांच्या स्थितींत मात्र अंतर होतें. **मकरंदाला** आपल्या प्रियेची प्राप्ति होण्याविषयींची बळकट आशा असून त्या कामांत कांहीं विघ्न उपस्थित झाल्याचें अद्याप त्याच्या नजरेस आलें नव्हतें. यामुळें तो उमेदींत होता; पण **माधवाला नंदन** हा एक शत्रु उत्पन्न झाला असून तो मोठा प्रबळ असल्यामुळें आपला हेतु सिद्ध होईल कीं नाहीं, याविषयीं संशय असल्यामुळें तो रात्रंदिवस चिंता व शोक करीत होता.

आपण असेच बोलत बसलों तर हा मुळींच उठायचा नाहीं. असें समजून **मकरंद** ह्मणाला, 'सख्या **माधवा**,

आतां घरीं जाण्याची वेळ चल झाली. ऊठ आपण ह्या पारा आणि सिंधुनदीच्या संगमावर घटकाभर स्नान करण्याच्या सुखाचा उपभोग घेऊन शहरांत जाऊंया.'

ही गोष्ट माधवालाही मान्य झाली. तो ह्मणाला, 'चल, जाऊं या.' याप्रमाणें दोघेही संगमाजवळ जाऊन पोहोंचले. तेव्हां माधव त्याचें वर्णन करून ह्मणाला, 'हा महानद्यांचा संगम किती रमणीय दिसतो आहे पहा. स्नान करून तीरावर आलेल्या स्त्रियांचें नेसलेलें वस्त्र पाण्यानें भिजून अंगाला चिकटल्यामुळें ज्यांच्या शरीरावरचे उंच सखल सर्व प्रदेश अगदीं व्यक्त दिसत आहेत, अशा स्त्रिया रमणीय सुवर्ण कलशाप्रमाणें भरगच्च असून उंच दिसणाऱ्या आपल्या ऊरोजांवर हात ठेऊन बाहेर येणाऱ्या स्त्रियांनीं हिचा घाट अगदीं व्याप्त झाला आहे. याप्रमाणें एकमेकांत कांहीं गोष्टी बोलत बोलत दोघेही तेथें बराचवेळ जलक्रीडा करून परत आपल्या घरीं गेले.

---

## प्रकरण पांचवें.

माधवाला आपला मनोरथ सिद्ध होण्याची कांहीं एक आशा राहिली नव्हती. कामंदकीनें पुष्कळ सांगितलें, तरी त्याला त्याविषयीं खात्री वाटली नाहीं. स्नान करून मकरंदानें त्याला घरीं नेलें, व तेथें कांहीं जेवणखाण केलें; पण माधवाचें लक्ष्य मुळींच ठिकाणावर नव्हतें. मकरंदाच्या आग्रहास्तव तो पानावर बसून मात्र उठला. दोघेही एका बिछान्यावर पडून पुष्कळ वेळ गोष्टी करीत होते. मकरंदही अस्वस्थच होता. तरी त्यांतल्यात्यांत त्याणें

**माधवाला** पुष्कळ गोष्टी सांगितल्या, पण त्याचें कांहीं समाधान न होतां तो एकसारखा तळमळत होता. बरी-च रात्र झाली, तेव्हां **मकरंदा**चा डोळा लागला.

कांहींतरी साहस करून आपला शेवट करून घ्यावा, असा **माधवा**चा पक्का निश्चय झाला होता. परंतु **मकरंदा**ची आडकाठी होती. त्याला झोंप लागली, असें पाहतांच **माधवानें** कोणाला न कळवितां जाण्याचा निश्चय करून हातांत तरवार घेऊन तो घरांतून बाहेर पडला, आणि थेट स्मशानाची वाट धरिली. तेथें जाऊन आपलें मांस काढून श्वापदांला द्यावें, किंवा कोणच्या तरी रीतीनें जिवाचा नाश करून **मालती**चा **नंदना**शीं विवाह झाला, हीं अक्षरें ऐकण्यास आपण जिवंत रहावयाचें नाहीं, असा त्याचा संकल्प झाला होता.

'माझें मांस कोणींतरी खुशाल घ्या,' असें ओरडत **माधव** स्मशानांत फिरत होता. इतक्यांत **अघोरघंट** नांवाच्या कापालिकाची पट्टशिष्यीण **कपालकुंडला** भयंकर वेष धारण करून मंत्रसामर्थ्यानें अकस्मात् आकाशांतून त्याच स्मशानांत येऊन पोहोंचली. ती आपल्याशींच ह्मणाली, कान, नाभी, हृदय, कंठ, टाळू, आणि भिवया-चा मध्य भाग, ह्या सहा ठिकाणीं इडा, पिंगला, सुषुम्णा, गांधारी, हस्ति, जिव्हा, पूशा, अरुणा, अलंबुषा, कुहू, आणि शंखिनी ह्या दहा नाडीचक्राच्या मध्यभागीं हृद-यांत ज्याचें रूप प्रगट होत असून एकनिष्ठ मनानें सा-धकांनीं ज्याचा त्या ठिकाणीं शोध केला आहे, असा तो भगवान्, ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, मा-हेंद्री, चामुंडा, आणि चंडिका ह्या आठ शक्तींसहवर्त-

षट्चक्रांचा शोध करून त्यांच्यामध्यें हृदय कमलांत प्रकट असणाऱ्या आत्म्याला तदाकार अंतःकरणानें साक्षात् शिवरूपी पहात आहें. पूर्वोक्त इडादी दहा नाडींत वायु भरून हें पंचभूतात्मक शरीर योगसामर्थ्यानें पंचमहाभूतांचें आकर्षण करून आकाशमार्गानें मेघमंडलाचा भेद करीत घेऊन चाललें आहें; तरी मला वर उडण्याचा मुळींच कांहीं श्रम होत नाहीं.

आणखी मी आकाशमार्गानें चालत असतां इकडे तिकडे हालण्यानें गळ्यांत घातलेल्या मनुष्याच्या कपालाच्या कंवचीच्या ह्या माळा एक मेकांवर आदळून त्यापासून खळखळ शब्द होत आहे, व त्या वरचेवर अंगावर आदळल्यामुळें घट्टे पडत आहेत. आणि त्याच्यायोगानें मी विशेष रमणीय दिसत असून मोठी भयंकर दिसतें आहें. आकाशमार्गानें जलद जाण्याचा तरी हा माझा वेग अगदीं परिपूर्ण आहे. तसेंच ह्या माझ्या जटांचा भार मी दोरीनें घट्ट बांधला आहे तरी माझ्या चालण्याच्या वेगातिशयानें यावेळीं जटा अस्ताव्यस्त होत आहेत. तसेंच हातांत खट्वांग आणि घांट यांचा सारखा झणझणाट होत आहे. तशीच ही पताका वाऱ्यानें वर उडत आहे. व त्यामुळें तिला लावलेल्या घागऱ्यांचा एकसारखा गजर चालला आहे.

याप्रमाणें आपलें आपणच वर्णन करीत करीत त्या बाईची स्वारी एकदांची स्मशानांत पोंहोंचली. तेथें चहूं-





भयंकर स्मशानाच्या जवळचा हा प्रदेश आहे. माझी इष्ट-देवता भगवती **कराला** देवी हिचें मंदीर येथें जवळच आहे. तेव्हां तेथें जाऊन सगळी तयारी केली पाहिजे. मंत्रसाधन पुरें झाल्यावरून आमचे गुरुजी **अघोरघंट** यांची मंत्रसिद्धि पूर्ण झाली आहे, व ते आज ह्या देवीची विशेष पूजा करणार आहेत. त्यांणीं मला सांगितलें आहे कीं, आज भगवति कराला देवी हिला आपण पूर्वीं नवस केल्याप्रमाणें उत्तम स्त्रीचा बलि अर्पण करावयाचा असून ह्याच नगरांत मी एक स्त्री योजून ठेविली आहे मी तिला घेउन येतों, तोंपर्यंत तूं तेथें देवीच्या देवळांत जाऊन पूजेचें सर्व साहित्य तयार करून ठेव, असें त्यांनीं मला सांगितलें आहे. त्या प्रमाणें मी तयारी करून ठेवितें.

असा विचार करीत ती पुढें चालली आहे इतक्यांत **माधव** त्यावाटेनें तिच्या समोरच आला. त्याला पाहून हातांत तरवार घेतलेली असून ज्याचे कुरळ केश व ज्याची आकृति गंभीर असून मधुर दिसते आहे असा हा पुरुष येथें ह्या भयंकर स्मशानांत कां आला? याविषयीं ती आपल्याशींच विचार करूं लागली.

पुनः ह्मणाली, हा पुरुष कितीतरी दर्शनीय दिसतो आहे! कमलपत्रासारखा श्यामवर्ण असूनही याच्या अंगा-वर पांढुरकी उठली आहे. पावलें टाकण्याची ह्याची ढब मोठी सुंदर आहे, चंद्रासारखें ह्याचें मुख रमणीय दिस-त आहे. याच्या अंगीं विनय पुष्कळ आहे. तथापि

लक्ष्यपूर्वक पाहून ह्मणाली, होहो! मी याला ओळखलें. **कामंदकी**च्या मित्राचा (देवराताचा) हा मुलगा मोंहामांस विकण्याला तयार झालेला **माधव** तो हाच. पण आपल्याला याच्याशीं काय करायचें आहें? कोणी कां असेना बापडा! आणि काय पाहिजेतें कां करीना? आपण आपलें काम करायाला लागावें. सांयकालचा संध्यासमय बहुतकरून गेल्यासारखाच आहे. सांप्रत आकाशाचे आसमंतात् भाग अर्थात् क्षितिज तमालाच्या फुलांच्या घोंसाप्रमाणें

---

१ मांस शब्द प्रसिद्धच आहे. माहामांस ह्मणजे मोठें मांस, अर्थात् अतिशय निषिद्ध मांस. वैदिक व इतर धर्मांच्या लोकांनीं मनुष्याचें मांस इतर सर्व प्राण्याच्या मांसापेक्षां अतिशय निंद्य व अभक्ष्य मानलें आहे. पण कापालिकसंप्रदायी लोक त्याला अतिशय पवित्र मानतात. व ह्मणूनच त्यांणीं त्याला माहामांस अर्थात् सर्वांत श्रेष्ठ मांस असें नांव दिलें आहे. माधवानें कोणत्या तरी रीतीनें आपला प्राण द्यावा असा निश्चय केला होता, हें वर सांगितलेंच आहे. त्यांतले त्यांत दुसऱ्याचा कांहीं तरी उपयोग व्हावा असाही त्याचा हेतु होता. त्यावेळीं स्मशानांत जमून उपास्यदेवतेला मांसाचा बळी देणारे तर पुष्कळ मांत्रिक लोक स्मशानांत फिरत असत. तेंव्हां तशापैकीं कोणाला तरी आपला देह अर्पण करून त्याचा कार्यभाग करावा व आपण आपला हेतु पूर्ण करून घ्यावा, असा विचार करून माधवानें आपलें मांस विकण्याचा अर्थात् मांत्रिकाला देण्याचा निश्चय केला होता. व तो त्याप्रमाणें वरचेवर—माझें मांस घ्या, ह्मणून ओरडत असल्यामुळें कपालकुंडलेला तो माहामांस विकणार आहे असें समजलें.





दिसणाऱ्या अंधकाराच्या वेलींनीं व्यापून गेलें आहे. ही पृथ्वी क्षितिजरूप उदकांत बुडले आहे कीं काय, असें वाटतें. वाऱ्याच्या योगानें चहूंकडे धुकें पसरलें आहे. संध्याकाळ सरून रात्रीचा नुकताच प्रारंभ आहे. तरी आपला काळेपणा आसमंतात् अरण्यभागावर बिस्तृत करून त्याला व्यापून टाकीत आहे ; तेव्हां आतां आपले गुरुजी लौकरच येतील. ते येथें येण्यापूर्वीं सामग्रीची तयारी करावी. असा विचार करून **कपालकुंडला** आपल्या तयारीस लागली.

इकडे **माधव** देवाला प्रार्थना करून ह्मणाला, 'प्रेमरसानें भिजून चिंब झालेले असून प्राण्याची इच्छा करणारे, विशेष परिचय झाल्यामुळें ज्यांत बळकट अनुराग उत्पन्न झाला आहे अशा त्या मृगनयनेच्या ( **मालती**च्या ) स्वभावतः अत्यंत मधुर अशा चेष्टा अर्थात् चुंबनादिक व्यापार मला वरचेवर प्राप्त होवोत ! ज्यांचा अनुभव घेत असतां बाह्येंद्रियांची हालचाल बंद करणारा, केवळ मानसिक इच्छेनें कल्पना केलेल्या असून त्या खरोखरी माझ्या अनुभवांत आलेल्या नाहींत. तथापि त्यांच्या ठिकाणीं आनंदानें परिपूर्ण होऊन माझा लय एकसारखा त्यांच्याकडे लागतो. आणखी मानसिकच कां होईना, पण मी तिच्या मांडीवर निजलेला असून तेथें कुशी परतल्याच्या सुखाचा अनुभव घेईन. जिणें मोत्यांचा हार काढून टाकून मी गुंफलेल्या बकुलीच्या फुलांची माळ प्रीतीनें गळ्यांत घातली आहे, व तिच्या योगानें जिचें स्तनमंडळ सुवासिक झालें आहे.' अशा त्या प्रियेच्या कानांजवळ अर्थात तिच्या खांद्याजवळ आपली मान ठेवून अवर्णनीय अशा तिच्या समागमाचें सुख मी अनुभवीन काय ?

सुंदर मुख पुनरपि एकवेळ पहायला मिळावें इतकीच प्रार्थना करितों. जेथें सर्व सुखें एकत्र मिळून विस्तार पावतात, जें डोळ्यांच्या टप्प्यांत आलें असतां प्रेमाची वृद्धि होऊन डोळ्यांला फार आनंद होतो, जें बालचंद्राच्या सर्व कलांचें सार घेऊन त्याणें निर्माण केल्यासारखें दिसतें व कामाचें जें केवळ मंगलगृह, असें तिचें मुख पुनः पहावें एवढीच माझी इच्छा आहे.

खरोखर जिच्या दर्शनानें सांप्रत माझा मनोविकार स्वल्प असतांही विस्तृत होत आहे, कांहीं पूर्वजन्मींचा संस्कार जागृत होऊन—तिच्यावांचून इतर सर्व वस्तूंचा तिरस्कार करणारा व वरचेवर तिच्याच स्मृतीचा अनुभव देणारा विकार माझ्या मनोवृत्तीला तन्मय करून सोडीत होता. यावेळीं माझी स्थिति अशी झाली आहे कीं, ती माझ्या अंतःकरणांत लीन झाली, अथवा प्रतिबिंबित झाली; किंवा तिचें त्याजवर चित्र काढलें, किंवा तिचें रूप माझ्या अंतःकरणांत कोरलें आहे, किंवा तिला अंतःकरणरूप जमिनींत पेरलें, अथवा वज्रलेपानें तिला तेथें घट्ट जडविलें, किंवा अंतःकरणांत तिला पुरलें, अथवा मदनाच्या पांचही बाणांच्या फाळांला लावून तिला माझ्या अंतःकरणांत खचलें, किंवा चिंतेची परंपरा हेंच एक प्रकारचें दोर, त्यांत त्या माझ्या प्रियेला ओंवल्यामुळें ती माझ्या मनांत अगदीं घट्ट बसली आहे, असें वाटतें!

**माधव** या प्रमाणें मनांत **मालतीचें** चिंतन करीत त-

11





दाकार अंत:करण होऊन मनोराज्य करीत चालला आहे, इतक्यांत जवळच एकाएकीं मोठा गलबला झाल्याचें त्याला ऐकू आलें. तेव्हां स्मशानवासी प्रेतभक्षक भुतें, खेतें, वगैरे यांचा कलकलाट असून राक्षस ओरडताहेत असें समजून तो ह्मणाला, पुष्कळ प्रेतें खाणारे राक्षस वगैरे येथें संचार करीत असल्यामुळें हें स्मशान फारच भयंकर दिसतें आहे. येथें सांप्रत आसमंतात् पेटलेल्या चितांचा प्रकाश पडला असून त्यांच्या सभोंवतीं अंधकाराचा गराडा पडला आहे. कोल्हे, भालुका, लांडगे, इत्यादि हिंसक प्राणी भयंकर गर्जना करीत आहेत. व वेताळ, डाकिनी, इत्यादि स्मशानवासी भूतें गर्जना करून सैरावैरा नाचताहेत. असो! मी एकदां आपला हेतु सर्वांना कळवितों ह्मणजे झालें. असा विचार करून मोठ्यानें त्या भुतांखेतांला हांक मारून ह्मणाला, 'स्मशानवासी जनहो, ज्यांला शस्त्र लागलेलें नसून पवित्र आणि पुरुषाच्या अंगाचें हें माहामांस मी तुह्मांला देत आहें. तर लौकर येऊन याचा स्वीकार करा.'

त्यानें याप्रमाणें सर्वांला हांक मारून सांगितलें, तरी पुन: त्यांचा कलकलाट चाललाच होता. तो ऐकून **माधव** ह्मणाला, अरे मी यांना पुकारून सांगितलें, तरी पुन: हे गर्जनाच करीत आहेत हें काय? आणि ह्या वेताळांच्या मोठ्या गर्जनांनीं हा स्मशानाचा प्रदेश हालल्यासारखा दिसत आहे, हें मोठेंच आश्चर्य! ह्या प्रेतांची आकृति तरी किती चमत्कारिक आहे! कानांच्या जवळ पोहोंचणारे यांचे डोळे आपला जबडा पसरून अग्नीसारखी लाल जीभ ज्यांच्या तोंडांतून बाहेर ळळाळळा करीत आहे, नांगरासारख्या भयंकर दांतांच्या टोंकांला प्रेतांची शरीरें अडकलीं आहेत.

विद्युल्लतेसारखे चकचकित ज्यांच्या डोक्यांचे केंस, मिशा, आणि भिवया दिसत आहेत. असे हे आरडत ओरडत सैरावैरा फिरणारे, व क्षणमात्र दिसून पुन: नाहींसे होणारे भयंकर स्मशानवासी मला मोठें आश्चर्य उत्पन्न करितात.

आसमंतात् पाहून हंसून ह्मणाला, ह्या पिशाचांची तऱ्हा तरी मोठी विलक्षणच आहे. ह्यांचीं हीं उघडलेलीं तोंडें पर्वताच्या गुहांसारखीं दिसतात व शरीरें हीं पर्वतांचीं शिखरेंच ह्मटलें तरी चालेल! अरेरे! आतां यापुढें मोठा दया येण्यासारखा प्रकार दिसत आहे. हीं हात, पाय, पोट, खांदे, इत्यादि अवयवांतल्या मांसांचे लचके तोडतोडून खात आहेत. आंतडीं दांतांला अडकलीं आहेत. हाडांचें सांधे दांतांत घुसले आहेत. तथापि हे प्रेतांचें मांस खायाचें सोडीत नाहींत!

तसेंच पुष्कळ चितांतून प्रेतें ओढून घेऊन त्यांचे मुख्य मुख्य अवयव खाऊन त्या प्रेतांच्या अंगावरचें कातडें काढून टाकीत आहेत, आणि त्यांतली चरबी घटाघटा पीत आहेत! कोठें चितेच्या अग्नींत जळलेलें मांस मिटक्या मारमारून खात आहेत!

पिशाच्यांच्या स्त्रियांकडे पाहून हंसून ह्मणाला, रात्रीचा समय असल्यामुळें ह्या पिशाच्यांच्या स्त्रियांला हा कोण आनंद झाला आहे. पहा, ह्या पिशाच्यांच्या स्त्रिया आंतड्यांच्या मंगलकारक बांगड्या हातांत घालून स्त्रियांच्या प्रेतांचें हात हेंच कोणीएक लाल कमळ यांणीं कानांत खोविलें आहे. तसेंच हृदयकमळाच्या माळा गळ्यांत घातल्या आहेत. रक्ताच्या चिखलाचें कपाळाला लाल कुंकूं लाविलें आहे. अशा रमणीय थाटानें आपल्या प्रि-

यांची ही वेळ मोठी आनंदाची आहे. तेव्हां यांला आणखी एकवेळ आपलें मांस घेण्याविषयीं प्रार्थना करावी. असा विचार करून पूर्वीप्रमाणें आपलें मांस घेण्याविषयीं त्यानें त्यांची प्रार्थना केली.

**माधवा**ची प्रार्थना ऐकून पिशाच तत्काल तेथून पळून गेले. हें पाहून **माधव** ह्मणाला, अरे! मी यांला चांगली प्रार्थना करीत असतां किंकाळ्या फोडून हे दूर कां बरें पळाले? मला वाटतें कदाचित् हे मला भ्यालें असतील. अरेरे! पण ह्या पिशाच्च्यांचा कोण हा गांडूपणा! मला पाहून हे पळतात कां? मी सगळें स्मशान फिरून पाहिलें; पण माझ्यावर कोणीही धावून येत नाहीं हें काय? आतां मी या स्मशानाच्या अगदीं कडेला आलों आहें. हो हो! बरोबर. तीरावरच्या घरट्यांत घुबडांचा घुमघुमाट चालला आहे. हे कोल्हे मोठ्यानें कुई घालीत आहेत. रक्तमिश्रित उदकाच्या प्रवाहांत विरून गेलेलीं प्रेतांचीं करटीं तशींच हातापायांचीं हाडें एकमेकांशीं घर्षण पावून त्यांचा आवाज होत आहे, अशी ही स्मशानाच्या पलीकडची नदी दिसते आहे. तेव्हां आतां यापुढें मसणवटीचा प्रदेश सरला असें वाटतें. मला भूतांनीं खाल्लें असतें तर बरें झालें असतें; पण तीं बेटीं मला पाहून पळतात! तेव्हां त्यांच्यानें काय होणार? कोणी एखादा मंत्रसाधन करणारा भेटता तरी बरें झालें असतें. मी आपलें शरीर त्याच्याकरितां बळी देऊन त्याला सिद्धीचा लाभ होऊं दिला असता! एखादें

निस्सार कसे झालां? अरे, हा **माधव** तुह्मांला आपल्या मांसाची मेजवानी करून संतुष्ट करण्याची इच्छा करीत आहे. असें असून तुम्ही त्याचा अनादर कां करतां? बरें बाबांनो तुमची मर्जी!

**मालती**ला आईकडून बोलावणें आल्यावरून **कामंदकी** तिला घरीं घेऊन गेली, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. वस्तुतः त्यावेळीं आईनें तिला बोलावूं पाठविलें त्यांत तिचा कांहीं विशेष हेतु होता. राजानें, **मालती**ला देण्याचा सर्व अधिकार **भूरिवसू**नें आपल्याकडे दिला आहे, असें समजून **मालती** तुला देतों, असें **नंदना**ला सांगितलें असून त्याप्रमाणें वाग्निश्चयाचा समारंभ तिकडे चालला आहे. तेव्हां कदाचित् पोरीला बाहेरचे बाहेर तिकडे नेऊन **नंदना**च्या हवालीं करतील कीं काय, अशी **मालती**च्या आईला शंका आल्यावरून तिणें ती आपल्या दृष्टीसमोर असावी, ह्मणून लौकर तिला बोलावूं पाठविलें. वस्तुतः दुसऱ्याची मुलगी त्यानें भिडेनें नाहीं ह्मटलें नाहीं, एवढ्याच वरून—आपल्या आवडत्या मनुष्याला देण्याचें कबूल करण्याविषयीं ज्याला मुळींच कांहीं शंका वाटली नाहीं तो अविचारी राजा मुलीला परभारें नेऊन लग्न लावण्याला कांहीं शंका बाळगील असें तरी कशावरून? तेव्हां **मालती**च्या आईनें तिला आपल्या डोळ्यांसमोर आणली, हें योग्यच केलें. असो.



लग्नाचा दिवस तो नव्हता. त्या दिवशीं फक्त वाग्-निश्चयच झाला. **भूरिवसूनें** वाग्दान केलें पाहिजे होतें. तो त्या प्रसंगीं हजर होता. तरी—आपल्याकडे काय आहे; सर्व काय तें सरकाराकडे आहे. त्यांणींच देण्याचा निश्चय केला आहे व वाग्दानही तेंच करतील—असें सांगून तो खुशाल मौज पाहात बसला. **नंदनाच्या**-घरीं मोठा तडाख्याचा समारंभ चालला होता. **मदयंतिका** नटून थटून भावाच्या लग्नसमारंभांत इकडे तिकडे कारभार करीत होती. **मालतीला** त्या मंडपांत आणण्याचें कांहीं विशेष कारण नव्हतें. व **भूरिवसूनें** जो काय विधि व्हावयाचा तो घराकडेच होईल, असें सांगून तो प्रसंग मुद्दाम टाळला. राजाच्या समाधानाकारितां **भूरिवसूनें** आपल्या घराकडेही उत्तम प्रकारचा सर्व थाटमाट केला होता. अंतस्थ बेत निराळाच होता; तरी बाह्यात्कारें कडेकोट तयारी चाललीच होती.

**मालती** त्या रात्रीं आपल्या घरींच होती. काहिली फार होऊं लागली ह्मणून **लवंगिके**सहवर्तमान ती गच्चीवर निजली होती. **अघोरघंट** नांवाचा कापालिक आपली शिष्यीण **कपालकुंडला** हिला पूजेची तयारी करावयास सांगून बली देण्याकरितां त्याणें मनांत योजून ठेविलेली मुलगी आणण्याकरितां गेला होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. योगसामर्थ्यानें **अघोरघंट** नेमका **पद्मावती** शहरावर आला. व इकडे तिकडे फिरतां फिरतां **भूरिवसूच्या** घरावर येऊन **मालती** ज्या गच्चीवर सुस्त निजली होती तेथें उतरला आणि मंत्रसामर्थ्यानें तिला अगदीं बांधल्यासारखी करून मुकाट्यानें तिला उचलून खांद्यावर घेतली, आणि आकाश-

मार्गानें संकेताप्रमाणें त्या स्मशानाच्या नदीच्या जवळच्या कांठीं **कराला**देवीच्या मंदिरांत उतरला.

**कपालकुंडला** पूजेची सर्व तयारी करून गुरूची वाट पहात बसलीच होती. **अघोरघंटा**सारखे घातकी लोक अनेक निमित्तानें चहूंकडे फिरतच असतात. मुलीचा बळी द्यावयाचा हा त्याचा संकल्प फार दिवसांचा होता; व त्याकरितां त्यानें योजना चालविलीच होती. जिचें आईबाप मोठे श्रीमंत असून जी रूपानें व गुणांनीं उत्तम असेल तीच मुलगी त्याला पाहिजे होती. त्याप्रमाणें बिचारी **मालती** त्याला योग्य वाटल्यावरून तिच्यावर त्यानें पूर्वींच नेम धरला होता, व त्याप्रमाणें तो तिला घेऊनही गेला.

**अघोरघंटानें मालतीला कपालकुंडलेच्या** हवालीं केलें. ज्या प्राण्याचा पुढें बली द्यावयाचा असेल, त्याला त्यापूर्वीं मोठ्या चांगल्या रीतीनें शृंगारण्याची चाल आहे. **मालतीला कपालकुंडलेनें**—तिच्या अंगाला तेलबिल लावून प्रथम न्हाऊं घातलें व नंतर फुलांच्या माळाबिळा तिच्या गळ्यांत घालून तिला चांगली सजवून तयार केली, आणि कांहीं गोडगोड पदार्थ खायाला दिले. **मालती** ते खाईना; तेव्हां जबरीनें तिच्याकडून मुद्दाम खाविवले आणि लवकरच त्या बापड्या मुलीला देवीच्या पुढें हात जोडून उभी केली!

त्या चांडाळानें तिला निजल्या ठिकाणाहून उचलली तेव्हां त्याच्या मंत्रांनीं जखडल्यामुळें तिच्यानें कांहीं हालचाल करवली नाहीं. देवीच्या मंदिरांत आणल्यावर तिच्यावरचा मंत्र काढला होता; पण आरडाओरड करशील तर ठार मारूं अशी जरब दिल्यावरून ती गरीब गाय मुकाट्यानें—ते जें जें काय करीत तें तें निमुटपणें करून घेत होती.

प्रथम हे कोणी तरी चोर आहेत, व आपल्या अंगावरचे दागिने बुचाडून घेण्याकरितां यांणीं आपल्याला येथें आणिलें असेल, असें तिला वाटलें होतें. पण दागिन्यांकडे त्यांचें मुळीच लक्ष नाहीं हें पाहून—हे आतां आपलें करणार तरी काय? याचें तिला मोठें गूढ पडलें होतें; पण त्यांणीं देवीच्या पुढें आणून उभी केली, तेव्हां तिला काय तें समजलें.

**अघोरघंटा**नें प्रथम तिची पूजा केली, आणि देवीची प्रार्थना करूं लागला. तेव्हां तर हा आपल्याला बळी देणार, अशी **मालती**ची पक्की खात्री झाली. तेव्हां—एवींतेवीं हा मेला ( **अघोरघंट** ) आपल्याला मारणार खरा, मग आतां याचें भय तरी कशाला पाहिजे; ह्मणून **मालती** मोठ्यानें ओरडूं लागली. 'बाबा! अरे तूं ज्याच्या योगानें **राजा**चें मन प्रसन्न करून घेणार होतास, तें तुझें साधन ( **मालती** ) हा निर्दय ( **अघोरघंट** ) आतां नाहींसें करून टाकण्याला तयार झाला आहे. मुलीच्या लोभानें नाहीं तर नाहीं, पण **राजा**ला प्रसन्न करण्याचें साधन नाहींसें होत आहे; ह्मणून तरी तूं यावेळीं माझें रक्षण कर!' याप्रमाणें **मालती** परोपरीनें आपल्या आप्त इष्टमित्रांला हांका मारून शोक करूं लागली.

तो चांडाळ **अघोरघंट** यावेळीं मौन धरून बसला होता, तथापि डोळे वटारून तो तिला दटावीत होता. व त्याची साह्यकर्त्री ती राक्षशीण **कपालकुंडला** दांत ओंठ खाऊन तिचें तोंड घट्ट दाबून धरीत होती. तरी मधून मधून **मालती** ओरडतच होती. **अघोरघंटा**ची प्रार्थना पुरी होण्याला बराच वेळ लागला असून मधून मधून ती अनाथ मुलगी किंकाळ्या फोडीत होती.

**माधव** स्मशानांत फिरतां फिरतां **कराला** देवीच्या मं-

त्याच्या लक्ष्यांत येईना. तो ह्मणाला, हा शब्द तर विकळ झालेल्या कुमारीच्या शब्दासारखा मधुर असून लांबवर येत आहे. याणें यावेळीं माझ्या चित्ताला आपल्याकडे खेंचल्यासारखें मला वाटतें. कानांला हा शब्द पूर्वी ऐकलेला आहे असें वाटतें. याच्या योगानें माझें हृदय फुटलें असून चळल्यासारखें होत आहे. माझें सर्वांग विव्हळ झालें आहे. अंगांत कांपरें सुटलें आहे, व चालतांना पाय अडखळतात. तेव्हां हा काय प्रकार आहे? आणि हें आहे तरी काय?

इतक्यांत पुनरपि आक्रोश झालेला ऐकून ध्वनीच्या अंदाजावरून **कराला**देवीच्या स्थानापासूनच हा करुण शब्द ऐकू येतो, अशी त्याची खात्री झाली. त्या देवीचें मंदिर ह्मणजे भयंकर कृत्यांचें एक स्थान, तेव्हां तिथें कांहीं तरी या वेळीं विलक्षण गोष्ट घडत आहे, असा निश्चय करून **माधव**—काय आहे तें पाहण्याकरितां सरळ देवीच्या स्थानाकडेच गेला.

तो अगदीं आंत जाऊन पाहतो तों **अघोरघंट** देवीचें ध्यान करीत बसला आहे. **कपालकुंडला** देवीची पूजा बांधीत आहे, आणि ती अनाथ **मालती**—बली देण्याचीं सर्व चिन्हें धारण करवून देवीच्या पुढें हात जोडून उभी केली आहे, असा थाट त्याच्या दृष्टीस पडला.

इकडे **मालती** पुनः ह्मणाली, 'अरे बावा! अरे निर्दया! तुझें आपल्या यजमानाला राजी करण्याचें साधन येथें नाहींसें होत आहे. माझे मायाळू आई, दैवानें तुझा सर्वस्वी घात





केला. **मालती** तुला प्राणापेक्षां अधिक आहेना? पण आतां काय! माझें कल्याण करण्याविषयीं रात्रंदिवस यत्न करणारे **कामंदकी**आई, तुला दुःखाचा संपर्क तरी होण्याचें काय कारण? पण माझ्यावर लोभ ठेवलास तो तुला आतां बहुत दिवस दुःखांत लोटणार आहे. प्रियसखे **लवंगिके**, आतां फक्त स्वप्नांत मात्र तुला माझें दर्शन झालें तर व्हायचें!'

हें ऐकून **माधवाला** ही मुलगी कोण, कुठली याविषयीं जो कांहीं संशय होता, तो अगदीं नाहींसा झाला. आणि अशा वेळीं आपण येथें पोहोंचलों याचा मोठा आनंद मानून मनांत ह्मणाला, अरे, ही तर तीच. आतां मला हिच्याबद्दल बिलकूल संदेह नाहीं. जिवंतपणीं **मालती**ला आपण जाऊन भेटावें, असा विचार करून **माधव** लवकर पुढें सरला.

इतक्यांत **अघोरघंटाचें** ध्यान पूर्ण होऊन **कपालकुंडला** आणि तो दोघेंही हात जोडून देवीची प्रार्थना करूं लागलीं. **आघोरघंट** ह्मणाला, देवि चामुंडे, तुझ्या चरणकमलावर आमचा मस्तक सदैव असो. भगवति चामुंडे, लोकोपद्रवकारी निशुंभाच्या वेगानें चळचळ कांपणाऱ्या पृथ्वीवर त्याच्या चालण्यानें ते खालीं पडल्यावर दबल्यामुळें पृथ्वीला आपल्या पाठीवर धारण करणाऱ्या कूर्माच्या पाठीचें हाड दबलें, व त्यामुळें त्यानें तत्काल अंग हालविलें. तेणेंकरून सर्व ब्रह्मांडाची स्थिति चलित झाली. अर्थात् मोठा भूकंप होऊन नम्र झालेल्या पृथ्वीवर सप्तसमुद्र खवळून गेले. आणि त्यांला तूं आपल्या पाताळासारख्या खोल मुखांत धारण केलेंस, अशा प्रकारची तूं आहेस! जिची

महादेवाच्या सभेंत विशेष तारीफ झाली आहे, तें तुझें क्रीडित आमचें रक्षण करो! आणखी—नेसलेलें गजचर्म अम्मळ जडल्यामुळें नखाच्या आघातानें मस्तकावर धारण केलेल्या चंद्रापासून खालीं गळलेल्या अमृताच्या धारेनें तत्काल गळ्यांतल्या मुंडमाला जीवंत होऊन त्या भयंकर अट्टहास सोडूं लागल्यामुळें भयभीत झालेल्या सर्व प्राणिमात्रांनीं त्यांची स्तुति सुरू केली आहे. व तांडवनृत्याच्या आयासा नेंश्रमून श्वासोश्वास सोडणारे बाहुभूषणाकार सर्पाच्या पाठीवर प्रहार झाल्यामुळें ज्यांनीं आपल्या फणा ताठ केल्या आहेत व वरचेवर श्वास सोडताहेत. आणि त्यांच्या श्वासापासून उत्पन्न झालेल्या विषाग्नीच्यायोगानें फारच भयंकर जिचें स्वरूप दिसत आहे.जिनें अनेक शस्त्रास्त्रें हातांत धारण केलीं आहेत. या प्रकारचें भगवति तुझें तांडव नृत्य आमचें अभीष्ट संपादन करो!' अशी प्रार्थना करून त्यांणीं **मालती**ला देवीच्या चरणकमलावर अर्पण करण्याकरितां अभिमंत्रण केलेली तरवार तिच्या मानेवर ठेविली.

ह्या सर्व कृत्याला प्रत्येक वेळीं पुष्कळ मंत्र जपायचे असून तंत्रही बरेंच मोठें होतें; ह्मणून **अघोरघंटा**ला फार वेळ लागला. नाहींतर त्या राक्षसानें **मालती**चा केंव्हांच बली दिला असता. **माधव मालती**ला पाहून मनांत ह्मणाला, अरेरे! ही **भूरिवसू**ची कन्या यावेळीं आळत्याच्या रंगानें माखलेली असून जिच्या गळ्यांत लाल फुलांच्या माळा आहेत, वस्त्रही तांबडेंच नेसली असून एकीकडे ही राक्षसीण ( **कपालकुंडला** ) आणि दुसरीकडे तो राक्षस ( **अघोरघंट** ) ह्या दोघां पाखंडी चांडाळांच्या मध्यभागीं—लांडग्यांच्या मध्यें सांपडलेल्या हरिणीसारखी ही मृत्यूच्या तोंडांत उभी राहिली आहे.

हाय हाय! बा दैवा, तुझा हा काय निर्दयपणाचा आरंभ!!

इकडे **कपालकुंडला मालती**ला ह्मणाली, 'मुली, तुझें कल्याण असो! आतां मृत्यु तुला लौकर घेऊन जात आहे. तुझा जो कोणी आवडता असेल त्याची आठवण कर. कारण जन्मांतरीं तुला अवश्य त्याचाच समागम होईल. तूं यावेळीं ज्याच्यावर मन ठेवशील, तो तुला अक्षय प्राप्त होणार, असें याचें फल आहे.'

हें ऐकून **मालती माधवा**चें स्मरण करून ह्मणाली, 'प्रिय **माधवा**, परलोकांत गेलें तथापि मला तूं विसरूं नकोस! आवडतीं मनुष्यें ज्याची वरचेवर आठवण करीत असतील तो मनुष्य इहलोकीं जिवंत नसला तरी मेला नाहीं.'

**मालतीनें माधवा**चें स्मरण केलें, तें ऐकून **कपालकुंडला** ह्मणाली, 'अरेरे! ही बिचारी **माधवा**वर अनुरक्त आहे, असें वाटतें.'

इतक्यांत **अघोरघंट** तरवार उगारून **कपालकुंडले**ला ह्मणाला, 'जें काय असेल तें असो. मी आतां हिला देवीला अर्पण करतों.' देवीला उद्देशून ह्मणाला, 'भगवति चामुंडे! मंत्रसाधन करतांना मी तुला नवस केला होता. त्याप्रमाणें ही पूजा घे, आणि हिचा स्वीकार करून मजवर अनुग्रह कर.'

**अघोरघंट मालती**चें डोकें उडविणार इतक्यांत **माधव** एकदम पुढें येऊन त्याणें **मालती**च्या दंडाला धरून तिला मागें ओढलें; आणि **अघोरघंटा**ला ह्मणाला, 'दुष्टा, दुरात्म्या! चल हो पलीकडे. अरे नीच कपालिका, पुढें येशील तर मेलास असेंच समज.'

**माधवा**ला एकाएकीं पाहून **मालतीनें**—माझें रक्षण

करा! ह्मणून किंकाळीं फोडून त्याला घट्ट मिठी मारली. तिला आपल्या डाव्या हातानें कवळून **माधव** ह्मणाला, ' माहाभागे, भिऊं नकोस. मरणाच्या वेळेस अगदीं शंका सोडून उच्छृंखळ होणारा व जिवावर उदार होऊन आपला स्नेह प्रगट करणारा हा तुझा सखा तुला रक्षण करण्या-करितां तुझ्या जवळच उभा आहे. आतां तूं भयानें कांपूं नकोस. हा चांडाल (**अघोरघंट**) विरुद्ध परिणाम होणाऱ्या आपल्या पापाचें उग्रफळ अर्थात् मरण आतांच अनुभवील. तूं स्वस्थ हो.'

**अघोरघंट** दांत खाऊन **माधवा**कडे रागानें पाहून ह्मणाला, 'अरे, हा कोण दुष्ट आह्मांला विघ्न करणारा झा-ला आहे !'

**कपालकुंडला** ह्मणाली, 'आतांच ह्या पोरीनें ज्याचें स्मरण केलें होतें, तोच हा तिच्या स्नेहाला पात्रभूत झालेला **कामंदकी**च्या मित्राचा मुलगा. आपलें मांस द्यायला तयार झालेला **माधव** तो हाच.'

**माधवा**ला **मालती** ह्या चांडाळांच्या तडाक्यांत कशी सांपडली, याचें मोठें आश्चर्य वाटलें होतें. तो ह्मणाला, 'महाभागे **मालती**, हें काय? तूं येथें कशी आलीस?'

**मालती** यावेळीं उत्तर देण्याला असमर्थ होती, तरी मन अम्मळ स्थिर करून ह्मणाली, 'महाभागा, मला, कांहीं माहीत नाहीं. मी गच्चीवर निजलें होतें ती येथें येऊन जागी झालें, एवढें मात्र काय तें ठाऊक आहे. पण तुह्मी येथें कसे आलां?'

**माधवा**ला या प्रश्नाचें उत्तर सांगायला मोठी लाज वाटली. व—तूं मिळत नाहींस ह्मणून मी जीव द्यावयाला

तयार झालों, हें त्याच्यानें सांगवेना; तरी युक्तीनें तो म्हणाला, 'तुझें पाणिग्रहण करून जन्माचें सार्थक करून घेईन, असा मोठा अभिनिवेस धरल्यामुळें फारच पीडित झालों. व तुझ्यावांचून आपले प्राण रहावयाचे नाहींत, असें वाटल्यावरून आपलें मांस विकण्याकरितां ह्या स्मशानांत फिरत होतों. इतक्यांत तुझें रडणें ऐकूं आल्यावरून येथें आलों.' हें ऐकून **मालती** फार दुःखित झाली. व आपल्याकरितां हा जिवावर उदार होऊन फिरत आहे, असें पाहून तिला फारच द्रव आला.

**माधव** मनांत म्हणाला, होहो. ही गोष्ट ध्यानींमनीं नसतां अकस्मात् घडली. सांप्रत राहूच्या दाढेंत सांपडलेल्या चंद्रकलेसारखी ही ( **मालती** ) दैवानें माझ्या दृष्टीस पडून ह्या चोराच्या(**अघोरघंटा**च्या) तरवारीच्या सपाट्यांतून ओढून घेण्याला माझें मन धजलें. अकस्मात् झालेल्या चमत्कारानें विकल, करुणेनें द्रवलेलें, आश्चर्यानें क्षुब्ध झालेलें, रागानें लाल झालेलें व ह्या प्रियेच्या समागमानें आनंदित झालेलें, असें माझें मन आतां कोणत्या स्थितींत राहील हें कांहीं समजत नाहीं. कारण एकापुढें एक अनेक विकार एकाच समयीं उत्पन्न झालेले आहेत.

याप्रमाणें आपल्याशींच विचार करीत कांहीं विलक्षण स्थितीचा अनुभव घेत असलेल्या **माधवाला** **अघोरघंट** म्हणाला, 'अरे भटाच्या पोरा! वाघाच्या हातांत सांपडलेल्या हरिणीची दया येऊन तिचा बचाव करण्याचा यत्न करणाऱ्या हरिणासारखा—तूं प्राण्याला भक्षण करणाऱ्या देवीच्या स्थानांत हिंसेची ज्याला विशेष गोडी आहे अशा माझ्या हातांत सांपडला आहेस. तेव्हां अरे पाप्या, मी

ह्या भूतजननीला (देवीला) डोकें उडविल्यामुळें भळभळां ज्यांतून रक्त वाहत आहे, अशा तुझ्याच शरीराचा प्रथम उपहार कल्पना करितों !'

**अघोरघंटाला माधवाची** विशेष माहिती नव्हती. तथापि—एखादा क्षत्रियपुत्र असता तर तो तरवारीच्या जोरावर आपलें जिच्यावर मन गेलें असेल तिचें पाणिग्रहण करता; पण हा भित्र्यासारखा, बायको मिळत नाहीं ह्मणून जीव द्यायला तयार झाला आहे, तेव्हां हा भटोबाचा मुलगा आहे असें समजून, त्यानें इतक्या आवेशानें त्याला दर्डावलें; पण **माधव** मोठा शूर होता. त्यांतून यावेळीं तर तो जीव द्यायला तयार झाला होता. तो मोठ्या धैर्यानें **अघोरघंटाला** ह्मणाला, 'दुष्टा, दुरात्म्या पाखंड्या, चांडाळा, अरे, आज तूं हें काय करायला तयार झाला आहेस? आज हा सारा संसार अगदीं निस्सार करीत आहेस! कारण संसारांत उत्तम स्त्री हेंच कायतें सार आहे. आणि त्याचा तूं नाश करायाला तयार झाला आहेस. आज ह्या जगांतल्या स्त्रीजातींतलें उत्तम रत्न चोरायाला तयार झाला आहेस. जगाला प्रकाश करणाऱ्या ह्या स्त्रीरूपिणी चंद्रिकेचा नाश करायाला तयार झाल्यामुळें सगळ्या लोकांला अंधारांत टाकण्याचा विचार केला आहेस असें वाटतें. हिच्या सख्या हिच्यावर जीव धरून आहेत. त्यांला आज तूं मरायच्या वाटेला लावणार आहेस. मदनाचा गर्व कायतो हिच्यासारख्या अस्त्रांच्या जोरावरच असून तें नाहींसें करून तूं त्या कामाला निगर्वी करायला तयार आहेस. अशा सुस्वरूप स्त्रीचा नाश करून लोकांचे डोळे निर्फल करावे, व एकंदरींत हें सारें जग ओसाड

जंगलासारखें उदासवाणें करावें असें कसें तुझ्या मनांत आलें? आणखीं असें पहा, अरे चांडाळा, प्रेमळ सख्यांनीं थट्टेनें सुंदर शिरसाची माळ, जिच्या अंगावर मारली, तर त्याच्या योगानेंही जिला क्लेश होतात, अशी हिच्या (मालतीच्या) कोमळ शरीरावर जीव घेण्याकरितां पाजळलेल्या तरवारीचा प्रहार करण्याला तयार झालेल्या तुझ्या मस्तकावर अकस्मात्—यमदंडासारखा घातक हा माझा भुजदंड पडल्याशिवाय राहील काय?'

हें ऐकून **अघोरघंटा**ला फारच राग आला. तो ह्मणाला, 'दुरात्म्या, बरें बरें! हूं कर, माझ्यावर प्रहार तर कर पाहूं. हा आतांच नाहींसा होतोस कीं नाहीं पहा!'

इकडे **माधव** कंबर बांधून **अघोरघंटा**शीं लढायला तयार झाला. तेव्हां **मालती** घाबरी होऊन ह्मणाली, 'स्वामिन् साहसिका, प्रसन्न हो. हा मेला **अघोरघंट** मोठा क्रूर आहे. माझें रक्षण कर. त्याच्याशीं लढून या अनर्थकारक संशयांत पडूं नकोस.'

तिकडे **कपालकुंडला** ही **अघोरघंटा**ला ह्मणाली, 'भगवन्, हा दुरात्मा (**माधव**) मोठा चपल दिसतो, तर याला मोठ्या सावधपणानें मारा.'

**मालती** आणि **कपालकुंडला** ह्या दोघी स्त्रिया त्या दोघां योद्ध्यांची विशेष काळजी करणाऱ्या होत्या. **माधव** आणि **अघोरघंट** दोघेही त्यांच्या ह्मणण्याकडे लक्ष न देतां अगदीं हातघाईवर आले.

**माधव मालती**चें समाधान करून ह्मणाला, 'अग मित्रे, अशी भिऊं नको. हा पापी (**अघोरघंट**) मेला असेंच समज. मोठमोठ्या हत्तीच्या गंडस्थळाला फोडणाऱ्या

सिंहाला यःकश्चित् हरिणाशीं युद्ध करीत असतां त्याला त्याचें कांहीं कठीण पडेल, किंवा त्याला असावधपणा येईल, ही गोष्ट कधीं कोणीं कोठें पाहिली तरी आहे का?' **माधवानें** जसें याप्रमाणें **मालतीचें** समाधान केलें, तसेंच **अघोरघंटानें**ही **कपालकुंडलेचें** सामाधान केलें.

इकडे **भूरिवसूच्या** घरांत गच्चीवर निजलेली **मालती** अकस्मात् नाहींशी झाली, तेव्हां क्षणमात्रानें तिच्या जवळ निजलेली **लवंगिका** जागी होऊन—**मालती** नाहीं ह्मणून एकदम ओरडली. हां हां ह्मणतां जनानखान्यांतल्या दासी व इतर चाकर माणसांनीं एकच कल्होळ केला. सर्व मनुष्यें जागीं होऊन जिकडे तिकडे **मालती**-चा शोध करूं लागलीं. **कामंदकी** या रात्रीस आपल्या मठांतच होती. तिला **भूरिवसूनें** ताबडतोब बोलावून आणून विचारिलें, तेव्हां **कामंदकी** त्याचें समाधान करून ह्मणाली, '**अघोरघंटा**वाचून हें असलें भयंकर व अद्भुत कर्म दुसऱ्या कोणाचेंही असणार नाहीं. त्याणें **कराला** देवतेला बली देण्याकरतां तिला नेलें असेल असें सांगून **मालती**च्या शोधाला निघालेल्या स्वारांला आधीं **कराला** देवीच्या स्थानाभोंवतीं वेढा घालून तपास करण्यास सांगितलें.

**अघोरघंट** हा कोणत्या प्रकारचा मनुष्य आहे, हें **कामंदकी**ला ठाऊक होतेंच व ती स्वतः कापालिकपंथांतली नव्हती, तरी तिला त्या पंथांतल्या लोकांचीं कर्मेंवर्में ठाऊक होतीं. इतक्या कडेकोट बंदोबस्तांतून चवथ्या मजल्याच्या गच्चीवर निजलेल्या **मालती**ला अगदीं तिच्या अंगाला अंग लावून निजलेल्या **लवंगिके**ला कळूं न देतां अकस्मात् नेलें. तेव्हां हें कृत्य जादुगिरावांचून व्हायचें नाहीं.

व **अघोरघंट** आणि त्याची शिष्यीण **कपालकुंडला** हीं तशा प्रकारचें कांहीं कृत्य करण्याला तयार असतात. आकाशमार्गानें जाण्यायेण्याची शक्ति त्यांला सिद्ध झाली आहे हें तिला ठाऊक होतें. ह्मणून **मालती** नाहींशी झाल्याचें वर्त्तमान ऐकतांच हें कृत्य **अघोरघंटा**चें असावें, असें अगोदरच तिच्या लक्षांत आलें.

**कामंदकी**नें हा पत्ता सांगण्याच्या पूर्वींच **मालती**ला धुंडण्याकरितां चहूंकडे स्वार धांवले होते, त्यांला सांगण्याकरितां **कराला** देवीचें स्थान ज्या दिशेला होतें, तिकडे फौजेवरचा एक अधिकारी मोठ्या त्वरेनें धांवत गेला. त्या अंधाऱ्या रात्रींत चहूंकडे स्वार धांवत होते, ते त्या अधिकाऱ्याला दिसले नाहींत. तो त्यांला हांक मारून ह्मणाला, 'अरे, **मालती**चा शोध करणारे सैनिकहो! उगीच चहूंकडे धाऊं नका. भगवति **कामंदकी**नें ह्या इकडच्या स्मशानांत **कराले**चें स्थान आहे तेथें **अघोरघंट** नांवाच्या जादुगिरानें **मालती**ला नेलें असेल, असें सांगितलें आहे. तेव्हां प्रथम त्या **कराले**च्या देवळालाच वेढा द्या, ह्मणजे आपलें काम होईल.'

त्यानें असें सांगितल्यानें सर्व एकीकडे जमून त्यांणीं **कराले**च्या मंदिराला वेढा दिला. स्वारांची गडबड झाली असून आपल्या भोंवती वेढा पडला आहे असें पाहून **कपालकुंडला** घाबरून **अघोरघंटा**ला ह्मणाली, 'गुरुमहाराज, अहो, आपल्या भोंवतीं स्वारांचा वेढा पडला आहे. आतां काय होतें कोणास ठाऊक.' **अघोरघंट** ह्मणाला, 'भिऊं नको, विशेष पराक्रम दाखविण्याची हीच वेळ आहे. आतां या सर्वांचा फडशा पाडतों पहा.'

फौजेच्या नायकानें मोठ्यानें ओरडून स्वारांला **कराले**-च्या मंदिराभोंवतीं वेढा घालण्यास सांगितलें, तें **माधव** आणि **मालती** यांलाही ऐकूं आलें, व त्याप्रमाणें लौकरच मंदिराभोंवती स्वारांचा गराडा पडला तेंही त्यांनीं पाहिलें. आपल्या घराकडून कोणी शोधाकरितां आले असतील, ह्मणून **मालती** आईबापांला व **कामंदकी**ला हाका मारून आक्रोश करूं लागली. तेव्हां—ही येथें असली तर फार घाबरी होईल, याकरितां तिला शोधायाला आलेल्या लोकांच्या हवालीं केलें, ह्मणजे ती स्वस्थ होईल. व नंतर आपण हिच्या देखत ह्या दुष्टाला मारावें, असा विचार करून **मालती**ला—फौजेचा नायक आंत येत होता त्याच्या हवालीं करून **माधव अघोरघंटा**ला ह्मणाला, 'अरे चांडाळा, ही माझी तरवार कठीण अशा हाडांच्या सांध्यांचे तुकडे करीत असतां खणखण आवाज करणारी असून अत्यंत चिवट अशीं आंतडीं तोडीत असतां जिचा धनी शांत होत आहे, व चिखलासारख्या मासाच्या गोळ्यांत यथेच्छ संचार करणारी ही माझी तरवार तुझ्या अंगाचे तिळा तिळा एवढे तुकडे करील!' हें ऐकून **अघोरघंटा**नेंही असेंच मोठ्या डौलानें आपल्या तरवारीचें वर्णन केलें; आणि दोघेही लढूं लागले.

**अघोरघंट माधवा**पेक्षां बांध्यानें मोठा होता, तरी **माधव** तरवारीचे हात करण्यांत फारच चपळ होता. त्या दोघांची लढाई इतर सर्व लोक चित्रासारखे तटस्थ उभे राहून पहात होते. केव्हां **अघोरघंटा**ची सरशी होई, व केव्हां **माधवा**ची होई. याप्रमाणें दोघांची बरोबरी होऊं लागल्यामुळें **मालती**चा जीव अतिशय घाबरा झाला होता. ती

स्वारांला त्याला मदत करण्यास सांगत होती; पण **माधवानें**––कोणीही पुढें येऊं नये, असें सांगितल्यावरून त्यांचा निरुपाय झाला.

इकडे **कपालकुंडलाही** वरचेवर आपल्या गुरूला उत्तेजन देत होती. याप्रमाणें उभयतांचा युद्धचमत्कार प्रेक्षकांला थक्क करून सोडण्यासारखा चालला होता. शेवटीं त्या **अघोरघंटाचे** घडे भरले असून त्याच्या अनन्वित कृत्यांचें फळ येथल्या येथेंच मिळावें, अशी देवाची इच्छा होती, ह्मणूनच कीं काय **माधवानें** त्याचा हात चुकवून असा एक जोरानें सपाटा मारला कीं, त्यासरसें **अघोरघंटाचें** मस्तक तोडून **कराला** देवीच्या पायांजवळ फेंकून देऊन त्याणें तिला––**मालतीला** बली देणाऱ्या **अघोरघंटालाच** बली देऊन देवीच्या नवसाची पूर्णता केली!

नंतर **मालतीला** शोधायला आलेले लोक **कपालकुंडलेला** देखील मारणार होते, पण ती तेथल्या तेथें अकस्मात् अदृश्य होऊन आकाशमार्गानें दुसरीकडे पळून गेली. **माधवाचें** शौर्य पाहून **मालतीला** फार आनंद झाला व तिनें स्नेहभरीत मुद्रेनें अवलोकन करून त्याच्या श्रमाचा परिहार केला. तेथें जमलेले सर्व सैनिक **मालती** मिळाल्यामुळें हर्षित होऊन तिला पुढें करून परत अमात्य **भूरिवसूच्या** वाड्याकडे गेले व **मालती** जिवंत मिळाल्यावरून सर्वांला फार आनंद झाला. इकडे **माधवही** जिवावर उदार होऊन आपलें मांस भुतांखेतांला देणार होता तो–**मालतीला** प्रसंगीं उपयोगीं पडून तिच्या प्राणावरचें संकट दूर करून आपण तिचें रक्षण केलें; तेव्हां ह्या कृत्यानें कांहीं उपयोग होईल अशी आशा धरून परत घरीं आला.

# प्रकरण सहावें.

**कामंदकीनें भूरिवसूसहवर्तमान** आतां पुढें **काय** करा-यचें याचा आधींच विचार करून ठेविला होता. **मालती** रात्रीच्यारात्रीं नाहींशी झाली, व सूर्योदयापूर्वी ती **सुखरूप**-पणें घरींही आली. गेल्या रात्रीं **नंदनाच्या घरीं** व **भूरिवसूच्या** इकडेही लग्नाच्यापूर्वी करावयाचीं कांहीं **कृत्यें** सुरू झालींच होतीं. राजाची मर्जी बिलकुल **जाऊं देऊं** नये ह्मणून **भूरिवसूनें** दुसऱ्या दिवशीं सकाळींच **देवक** ठेविलें; व आज रात्रौ लग्न व्हावयाचें असा निश्चय **प्रसिद्ध** केला होता. यामुळें जिकडे तिकडे कडेकोट **तयारी** चालली होती.

**मालतीला** यासंबंधानें अतिशय दुःख होत होतें; **तथापि** आईबापांच्या सांगण्यावरून जें जें काय करावयाचें तें ती मुकाट्यानें करीत होती. लग्न लागण्यापूर्वी संध्याकाळच्या सुमारास **मालती** त्या नगरांतील मुख्य देवीच्या दर्शनाक-रितां ह्मणून गेली ह्मणजे तेथें **माधवाशीं** तिचें लग्न लावून त्या दोघांला एकीकडे गुप्त ठिकाणीं ठेवावें, व **मकरंदाला मालतीचा** वेष देऊन **नंदनाशीं** त्याचें लग्न लावावें, आणि त्याच प्रसंगांत **मदयंतिका** त्याला द्यावी, अशी **कामंदकीनें** मसलत केली होती.

**माधव** स्मशानांतून सूर्योदय होण्याच्या पूर्वींच घराकडे सुखरूप परत आला. तो एकाएकीं नाहींसा झाला ह्मणून **मकरंद** व **कलहंसक** हे फार घाबरून चिंता करीत बसले होते. त्यांला **माधव** अकस्मात् दृष्टीस पडतांच अतिशय आनंद झाला. ‘ अरे साहसिका, आह्मांला चिंतासमु-

द्रांत लोटून एवढा वेळ कोठें गेला होतास?' असें बोलून **मकरंदानें** त्याला प्रेमानें मिठी मारली. नंतर दोघेही मित्र एके ठिकाणीं बसून गोष्टी करूं लागले. **मकरंदानें** विचारल्यावरून **माधवानें** स्मशानांत झालेल्या गोष्टी अनुक्रमानें त्याला सांगितल्या.

इकडें **मालती**ला घेऊन आलेल्या लोकांनीं **माधवा**च्या पराक्रमाचें वर्णन केलेंच होतें; पण त्यांला बाकीची कांहीं हकीकत माहीत नव्हती. **कामंदकीनें** विचारल्यावरून **मालतीनें कराला** देवीच्या मंदिरांत घडलेला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐकून **कामंदकी, भूरिवसु**, **मालती**ची आई व **लवंगिका** इत्यादि तिच्या सख्या ह्यांना फारच आनंद झाला. **माधवा**विषयीं त्यांचा अनुराग पूर्वींच होता आणि तो हें वर्तमान ऐकून विशेष दृढ झाला.

**मालती माधवाला** द्यायची, असा **भूरिवसु** व त्याची स्त्री यांचा प्रथमच निश्चय ठरला होता. व त्याबद्दल पुढें काय करावयाचें तोही बेत झाला होता; पण **माधवानें** आपला जीव धोक्यांत घालून **मालती**चे प्राण वांचविले, यामुळें ते त्याचे अतिशय आभारी झाले.

**कामंदकी** तेथून **माधवा**च्या बिऱ्हाडीं येऊन त्याला भेटली. आणि गेल्या रात्रीं त्यानें प्राणत्याग करण्याचा व्यवसाय केला होता, याबद्दल त्याला रागें भरून तिनें —आज सायंकाळीं कसें काय करावयाचें तें **माधव, मकरंद,** आणि **कलहंसक** यांला नीट शिकवून ठेवलें, आणि ती परत **भूरिवसू**च्या वाड्यांत गेली. **अवलोकिता, बुद्धरक्षिता** व **लवंगिका** या तिघींला पुढचा बेत कळवून कसें काय करावयाचें तें आधींच शिकवून ठेविलें होतें. एकं-

दर आजपर्यंत जी कांहीं मसलत केली, तिचा आजच्या रात्रींत बार उडवून द्यावा, असा संकेत ठरला होता. **कामंदकीनें** इकडे याप्रमाणें सर्व तयारी केली होती; पण **माधवाचा** घात करण्याविषयीं दुसरीकडे एक कुत्या तयार झाली होती ती तिला माहित नव्हती.

गेल्या रात्रीं **माधवानें अघोरघंटाला** मारलें तेव्हां त्याची शिष्यीण **कपालकुंडला** तेथून पळून गेली, हें वर सांगितलेंच आहे. ती आपल्या आश्रमांत जाऊन गुरुविषयीं पुष्कळ शोक करून शेवटीं—गुरूला मारणाऱ्या **माधवाचा** सूड घेण्याचा निश्चय करून ती परत **पद्मावती** नगरींत आली. मंत्रसामर्थ्यानें तिला आकाशांतून पाहिजे तिकडे जाण्याची व कोणाच्या दृष्टीस न पडतां हवें तेथें जाण्याची विद्या माहीतच होती. तिणें कोणत्या युक्तीनें **माधवाचा** सूड ध्यावा, याचा विचार करण्याकारितां सर्व शहरभर गुप्त रीतीनें संचार केला.

ती **माधवाचें** नांव घेऊन वरचेवर रागानें दांत ओंठ खाऊन म्हणाली, अरे दुरात्म्या, अरे मेल्या दुष्टा ! ती कार्टी **मालती** तिच्याकरितां तूं त्या पुण्यपुरुषाचा ( आपल्या गुरूचा ) घात केलास अं ! बरें कांहीं चिंता नाहीं. मी त्या वेळीं तेथेंच त्या तुझ्या **मालतीला** मारून टाकलें असतें; पण ती लहान कार्टी ह्मणून मी दया करायला गेलें म्हणून तूं विजयी झालास. आणि मी तुझ्यावर प्रहार करायला तयार झालें असतां —उंः, ह्या बायको मनुष्यावर कोण हत्यार धरतो ! असें ह्मणून तूं माझा अपमान केलास; पण मेल्या, तुला ह्या **कपालकुंडलेचा** प्रभाव माहीत नाहीं. आतां कसें करतें तें पहा !

सुस्कारा सोडून ह्मणाली, अरे, सर्पांच्या शत्रूला शांति कोठून प्राप्त होणार? कारण, त्यांनीं राग मुळींच सोडला नाहीं, रात्रंदिवस—कधीं सवड मिळेल व कधीं आपण ह्याला दंश करीन, ह्मणून जिभळ्या चाटून व आपले विखारी दांत पाजळून भयंकर नागीण त्याचा सूड घ्यायला टपलेलीच आहे. **अघोरघंट**रूपी सर्पाला मारलेंस, ह्मणून तूं सुटला नाहींस. तुझा सूड घेणारी नागीण मी तुझ्या घाताकरितां टपून बसलें आहें!

ती याप्रमाणें विचार करीत करीत चालली आहे, तों शहरांत **नंदना**च्या विवाहाच्या संबंधानें मोठी धामधुम उडाली होती. त्याबद्दल माहाराजांनीं आपल्या कामदारांकरवीं आप्त इष्टमित्र व इतर राजे वगैरे कोणी जे त्या लग्नाच्या समारंभाला आले होते, त्यांस पुढें सांगितल्याप्रमाणें सूचना दिली. 'सर्व मंडळीला महाराजांचें असें सांगणें आहे कीं, ह्मातारे ह्मातारे लोक जे ह्या समारंभांत मुख्यत्वें वेळोवेळीं सूचना करण्याकरितां नेमले आहेत, त्यांच्या सांगण्याप्रमाणें इतरांनीं वागावें. ब्राह्मणांनीं मंगलकारक मंत्रघोष करावा. इतर लहान मोठ्यांनीं मंगलकारक व आनंदप्रदर्शक अशा ज्या ज्या गोष्टी करण्याला योग्य असतील त्या सऱ्या कराव्या. आतां लग्नाच्या मुहूर्ताची वेळ अगदीं जवळ आली आहे. इकडे मंडपांत वऱ्हाड्यांची विशेष गर्दी झाली नाहीं तोंपर्यंत **मालती** नगरदेवतेच्या दर्शनाकरितां जाणार आहे. असें **कामंदकी**च्या सांगण्यावरून दिवाणसाहेबांच्या येथली मंडळी सांगतात. तर सगळ्या वऱ्हाड्यांनीं **मालती** नगरदेवतेला जाऊन परत आली ह्मणजे उत्तम पोषाक करून थाटामाटानें दिवाणसाहेबांच्या

इकडच्या मंडपांत हजर व्हावें. तोंपर्यंत उगीच दाटी करूं नये.'

या प्रमाणें राजाचा हुकूम ह्या समारंभाची देखरेख ठेवणाऱ्या कामदारांनीं सर्वांला जाहीर केला. तें ऐकून **कपालकुंडला** आपल्याशींच ह्मणाली, असो; आतां ह्यावेळीं आपण कांहीं खटपट करूं नये. त्या मेल्याचा **(माधवाचा)** सूड घ्यायचा तो दुसऱ्या कोणत्याही प्रकारानें घेऊं नये. जिच्याकरितां त्या दुष्टानें आमच्या गुरूजीचा घात केला त्या **मालती**लाच नाहींशी करून टाकावी ह्मणजे झालें. पण अद्याप ती त्याची बायको कोठें झाली आहे? इकडे तर दुसऱ्याच कोणाशीं तिचें लग्न लागण्याची तयारी चालली आहे. तेव्हां आपण तोंपर्यंत दम धरून आधीं काय होतें तें पहावें, आणि मग पुढें योग्य तें करावें. तोंपर्यंत पुढच्या तयारीला लागावें हें बरें.

**माधवा**ला उद्देशून ह्मणाली, मेल्या, दुष्टा तुझें समूळ तळपट होईल, तेव्हां ह्या **कपालकुंडले**चा जीव थाऱ्यावर येईल. असें बोलून ती राक्षसीण दुसरीकडे निघून गेली.

इकडे संकेताप्रमाणें **माधव** आणि **मकरंद** दोघेही नगरदेवतेच्या मंदिरांतल्या गाभाऱ्यांत दडून बसले होते. स्त्रीयांविषयीं उत्कंठित झालेल्या मनुष्याला एकेक घटका युगासारखी वाटते. बराच वेळ झाला तरी अद्याप **मालती** येत नाहीं; ह्मणून घाबरा होऊन **माधवानें कलहंसका**ला—**मालती** इकडे यायला निघाली किंवा नाहीं तें लौकर पाहून येण्यास सांगितलें. तेव्हां तो धांवत जाऊन **मालती** निघाल्याचें पाहून तें वर्तमान सांगून आपल्या धन्याला खुष करण्याकरितां परत नगरदेवतेच्या मंदिरांत आला.

इकडे **माधवाला** **मालती** शिवाय दुसरें कांहीं सुचतच नव्हतें. **कामंदकीनें** मसलत केली आहे खरी; पण ती तडीस जाईल कीं नाहीं याची त्याला खात्री नव्हती. तो **मकरंदाला** ह्मणाला, 'गड्या, **मालतीला** अगदीं प्रथम मदनोद्यानांत मी पाहिलें, तेव्हांपासून घडोघडी विस्तार पावणारा आणि त्या मृगनयनेच्या—मला अनूकूल अशा वर्तनानें ज्याला अगदीं शेवटच्या पायरीवर चढविलें आहे, अशा माझ्या मनोरथाचा व त्यापासून होणाऱ्या कामव्यथेचा सर्व प्रकारें यावेळीं शेवट होणार आहे. आतां भगवति **कामंदकीची** मसलत सफल होऊन **मालतीशीं** माझा विवाह घडेल, किंवा सगळेंच ॲफस् होईल! दोहोंतून काय तो एक निकाल होणार. जें काय होणार तें होवो. एकदां ह्याचा शेवट लागला ह्मणजे मी सुटलों. माझ्यानें हे कष्ट सहन करवत नाहींत असें झालें आहे.'

हें ऐकून **मकरंद** ह्मणाला, 'अरे गड्या, तूं तर मला अगदीं अधिरा मनुष्य दिसतोस. **कामंदकी**आईसारख्या पक्क्या शहाण्या मनुष्याची मसलत फसेल अशी तुला शंका येते, याचें मला मोठें नवल वाटतें. **कामंदकी** आईची मसलत जर फसली तर ह्या जगांत शहाणपणाचा ह्मणून कांहीं उपयोगच नाहीं. व दूरवर विचार करणारे लोक पुढें करावयाच्या गोष्टीविषयीं पूर्वी खलबत करतात तेंही अगदीं कुचकामाचें असेंच ह्मटलें पाहिजे.'

इतक्यांत **कलहंसक** घाइघाईनें **माधवाजवळ** येऊन ह्मणाला, 'धनीसाहेब, तुमचे मनोरथ पूर्ण झाले. **मालती** बाईसाहेब—नाहीं नाहीं. माझी धनीन इकडे येण्याला निघाली आहे. सर्व तयारी कडेकोट झाली आहे.'

हें ऐकून **माधवा**ला फार आनंद झाला. तरी—अरे, असें खरेंच का? ह्मणून त्यानें त्याला विचारिलें. तेव्हां त्याचा निषेध करून **मकरंद** ह्मणाला, 'अरे, असा अविश्वास्यासारखा विचारतोस कां? ती केवळ यायला निघाली, इतकेंच नाहीं; तर ह्या मंदिराच्या अगदीं जवळदेखील येऊन पोहोंचली असेल असें समज. वाऱ्यानें चहूंकडे पसरलेल्या मेघांच्या गर्जनेसारखा तिच्या स्वारीबरोबर वाजणाऱ्या हजारों मंगलवाद्यांचा नाद एकाएकीं आमच्या कानांत घुमून गेल्यामुळें दुसरा शब्द अगदीं ऐकूं येत नाहीं असें झालें आहे, यावरून ती अगदीं जवळ येऊन पोहोंचली असावी, यांत कांहीं संशय नाहीं. आतां आपण ह्या जाळ्यांच्या खिडक्यांतून तिच्या स्वारीचा थाट पाहूंया.' **माधवा**ला हें पाहिजेच होतें. तो आणि **मकरंद** दोघेही जाळींतून पाहूं लागले, व **कलहंसक**ही तेथेंच होता.

**मकरंदा**नें अनुमान केल्याप्रमाणें **मालती**ची स्वारी नगरदेवतेच्या मंदिराकडे निघाली होती. **भूरिवसु** मुख्य प्रधान असल्यामुळें त्याचें ऐश्वर्य फार मोठें होतें हें सांगावयास नकोच. उत्तम शृंगारलेल्या एका हत्तिणीवर रत्नखचित अंबारींत **मालती**ला बसविलें होतें. तिची आवडती मैत्रीण **लवंगिका** अगदीं तिला टेकून बसली होती. **मालती**चें मन अस्वस्थ असून तिला ह्या चाललेल्या समारंभाचा अतिशय संताप होत होता; ह्मणून ती म्लान व उदास दिसत होती. तिच्या अंगावर हिऱ्यामाणकांचे अमोलिक दागिने असून ती उंची शालू नेसली होती व डोक्यावरून भरगच्ची चादर पांघरली होती. आपल्या शरीराचा भार **लवंगिके**च्या अंगावर टाकून मधून मधून अश्रु टाकीत—गडे **लवंगिके**,

आतां माझें काय होणार ग ?–असे दुःखाचे उद्गार काढीत होती. तिच्यापुढें व मागें हजारों स्वार व शिपाई चालले होते. अंबारींत तिच्या आसनाच्या मागें उभ्या राहून दासी तिच्या मस्तकावर चवऱ्या ढाळीत होत्या. **कामंदकी** दुसऱ्या एका वाहनांत बसून अगदीं तिच्या बरोबर चालली होती. आसमंतात् शेंकडों सुवासिनी स्त्रिया मंगलकारक गीतें गात चालल्या होत्या. सर्वांच्या पुढें अनेक वाद्यांचा गजर चालला होता, व मोठे मोठे शूर सरदार चहूंकडून तिचें रक्षण करीत होते.

इकडे **माधव** आणि **मकरंद** यांना दाखवून **कलहंसक** त्या स्वारीचें मोठें सुरस वर्णन करूं लागला. तो ह्मणाला, 'धनीसाहेब, पहा पहा! वर उडणाऱ्या राजहंसपक्ष्यासारख्या शुभ्र दिसणाऱ्या चवऱ्यांच्या वाऱ्यानें अंबारीच्या खांबाला बांधलेल्या लहान लहान केळीचीं पानें फडफड हालत असल्यामुळें पताकासारखीं दिसत असून, गगनांगणांतल्या सरोवरांत एकसारख्या दाटलेल्या प्रफुल्लित कमळासारखीं अंबारींत असलेल्या स्त्रियांचीं मुखकमलें विशेष शोभत आहेत. तशाच चैनीखातर मुखांत धारण केलेल्या विड्यांच्या कवळांनीं ज्यांचे गाल फुगले असून, त्यांतलेत्यांत मधुर मंगलकारक गीतें गात आहेत, यामुळें स्त्रियांच्या शब्दाशीं मिश्र ध्वनि रम्य वाटत आहे. आणि अनेक रत्नांचे अलंकार अंगावर असल्यामुळें त्या रत्नांचा हिरवा, पिंवळा विविधप्रकारचा प्रकाश मिश्र होऊन इंद्रधनुष्याचें अनुकरण करीत आहे. तसेंच ह्या स्त्रियांच्या पायांतील पैंजणांचा झणझणाट सुटला आहे, हा रमणीय देखावा पाहून घ्या.'

**मकरंद** ह्मणाला, 'खरोखर दिवाण **भूरिवसु** याचें

ऐश्वर्य मोठें वर्णनीय आहे. इकडे तिकडे हालणारा अनेक सोन्याच्या मण्यांच्या आणि रत्नांच्या किरणांचा समुदाय मोराच्या पिसाऱ्यासारखा सूर्याच्या किरणांनीं वर निघत असून त्यांच्या प्रकाशानें इंद्रधनुष्य पडलें आहे किंवा चित्र-विचित्र रेशमी वस्त्रांच्या आकाशांत जिकडतिकडे पताका उभारल्या आहेत काय असें वाटतें!'

इतक्यांत **मालती** बरोबर आलेल्या सर्व स्त्रिया एकीकडे दूर जाऊन उभ्या राहिल्या. तें पाहून **कलहंसक** ह्मणा-ला, 'बरें, धनीसाहेब, ही काय अडचण? ह्या अनेक चोपदारांनीं आपआपल्या हातांत असलेल्या ह्या रत्नखाचि-त सोन्याच्या काठ्यांनीं हिच्या बरोबर आलेल्या सर्व स्त्रियांला एकीकडे केलें आहे. आणि ही ( **मालती** ) शेंदुरासा-रख्या आरक्त गालांच्या व डुलत डुलत चालणाऱ्या व नक्षत्र-[1]माला गळ्यांत धारण केल्यामुळें रमणीय दिसणाऱ्या हत्ति-णीवर बसलेली सर्वांच्या पुढें आली. कौतुकानें वर तोंडें

---

( १ ) नक्षत्रमाला या नांवाचा एक अलंकार आहे. नक्षत्रें सत्तावीस आहेत, ह्मणून सत्तावीस मोत्यांची किंवा रत्नांची किंवा सोन्याच्या मण्यांची ही माळ असते. साधारण श्रीमान् लोकांच्या स्त्रिया ही नक्षत्रमाला आपण धारण करतात. पण भूरिवसूसार-ख्या अपरमित ऐश्वर्यवानाच्या घरीं तिला हत्तिणीच्या गळ्यांत स्थान मिळालें ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. जसजसा भाग्याचा अतिशय असतो तदनुसार वस्त्रें व अलंकार इत्यादिकांला कमीकमी प्रतीची जागा मिळत जाते, हा संप्रदायच आहे. एखाद्या मध्यम स्थि-तीच्या श्रीमंताच्या बायकोची सणावाराचे दिवशीं नेसण्याची जी पैठणी असते, किंवा जे ठेवणीचे दागिने असतात, त्यांच पैठणीला मोठ्या श्रीमंताच्या येथें पडदणीची योग्यता येते, किंवा त्या दागि-न्यांला बटकी कुळंबिणीच्या अंगावर जागा मिळते!

करून सर्व लोक जिचें मनोहर रूप अवलोकन करीत आहेत, जिच्या शरीरावर पांढुरकीची छाया दिसत असून सुकलेल्या कमळिणीसारखी ही अगदीं कृश दिसते आहे; तरी प्रेक्षकांच्या दृष्टीला शुक्ल प्रतीपदेच्या चंद्रकलेसारखी रमणीयच वाटत असलेली ही या मंदिराकडेच येत आहे. बरोबरची सर्व मंडळी आतां मागच्या मागेंच राहिली.'

**मकरंद** ह्मणाला, 'गड्या **माधवा**, पहा पहा तरी. एकवेळ इकडे पहा! या वेळीं हिला (**मालती**ला) कशी नखशिखांत बहुमोल दागिन्यांनीं सजविलेली आहे. जशी फुलांच्या बहरानें मोगरीची वेल ओथंबते तशी ही विवाह महोत्सवाची शोभा धारण करीत असून कृश आणि म्लान झालेल्या शरीरानें मनांत कांहींतरी दुःख आहे, असें उघड दाखविते.'

इतक्यांत हत्तिणीला अगदीं देवळाच्या दरवाज्यांत आणून खालीं बसविली व **लवंगिके**चा हात धरून **मालती** अंबारींतून खालीं उतरली. पूर्वी संकेत करून ठेवलाच होता, त्याप्रमाणें फक्त **लवंगिका** आणि **कामंदकी** ह्या दोघी मात्र तिच्या बरोबर राहिल्या, बाकी सर्व मंडळी देवळाच्या बाहेर उभी राहिली. हत्तिणीला खालीं बसविलें व **मालती**—**कामंदकी** आणि **लवंगिका** यांसहवर्तमान आंत यायला निघाली हें पाहून **माधवाला** फार आनंद झाला. यावेळीं **मालती**चा उजवा हात **कामंदकीनें** धरला होता व डावा हात **लवंगिकेनें** धरला होता. ती चिंतेनें आणि दुःखानें विकल झाली होती व त्यांत दागिन्यांचा भार तिच्यानें तोलवत नव्हता. ह्मणून हळूहळू त्या दोघींनीं तिला देवीच्या गाभाऱ्यांत आणलें.

ती आंत आली असें पाहून **माधव** आणि **मकरंद** तेथल्या तेथें दडून बसले. **कामंदकी** हळूच ह्मणाली, 'आमच्या मनांत जो कांहीं बेत आहे, अर्थात् येथल्या येथें **मालतीचें** लग्न लावायचें, याला देव पूर्णपणें साह्यकारी होवो! तसेंच हें कार्य झाल्यानंतर याचा परिणाम अनुकूल होईल, असा देवांनीं अनुग्रह करावा! दोघां प्रिय मित्रांच्या अपत्यांचा विवाह पार पडला ह्मणजे मी कृतार्थ होईन. हा माझा सर्व प्रयत्न सफळ होऊन पुढें कल्याणकारक होवो ह्मणजे झालें!'

जों जों लग्नाचा बाह्यात्कारें ठरविलेला समय जवळ जवळ येत होता; तों तों **मालतीला** अधिकाधिक दुःख होत होतें. ती मनांत ह्मणाली, आतां माझ्या आशेचा तंतु तुटायला फारसा अवकाश राहिला नाहीं. तेव्हां यावेळीं कायतें एक होणार. मरण किंवा सुखसाधण्याची वेळ हीच आहे; पण मला दोहोंतून कोणतें तरी एक साधण्याची सवड कशी मिळेल? दैवहिनाला मरणदेखील इष्ट वाटतें, ह्मणूनच कीं काय तेंही त्याला दुर्लभ होतें!

तिची ती अवस्था पाहून **लवंगिका** मनांत ह्मणाली, आपला हृदयवल्लभ **माधव** याच्या वियोगानें व **नंदनाला** फसविण्याची आम्हीं जी युक्ति केली आहे ती हिला न समजल्यामुळें ही फार विकळ झाली आहे. तरीपण लवकरच हिचा मनोरथ पूर्ण होण्याचा समय आला आहे. तेव्हां घटकाभर—हिची अवस्था माझ्यानें पाहवत नाहीं; तरी यावेळीं तिच्याकडे दुर्लक्ष केलें पाहिजे.

इतक्यांत दागिन्यांचा करंडा घेऊन एक दासी लवकर लवकर देवीच्या गाभाऱ्यांत आली. नवऱ्या मुलीला घालण्याचे

सर्व दागिने व वस्त्रें **भूरिवसू**कडे राजानें पाठविलीं होतीं तीं तिनें आणलीं होतीं. यावेळीं देवळांत दुसऱ्या कोणाही मनुष्याला येण्याची मनाई होती, तरी ह्या दासीला आंत सोडावें असा पूर्वीं संकेत ठरला असल्यामुळें तिला कोणीं मनाई केली नाहीं. **मकरंदा**ला नवरीचा वेष देऊन ज्या हत्तिणीवर **मालती** बसून आली होती तिच्यावर बसवून परत पाठवावयाचा व त्याच्याशीं **नंदना**चें लग्न लावायचें असा संकेत होता.

ती दासी दागिन्यांचा करंडा पुढें ठेवून **कामंदकी**ला ह्मणाली, '**कामंद**कीआई, यजमानसाहेबांनीं (**भूरिवसूं**नीं) सांगितलें आहे कीं, हे दागिने आणि हीं वस्त्रें नवऱ्यामुलीला लेवविण्याकरितां महाराजसाहेबांनीं पाठविलीं आहेत. हीं ह्या देवीच्या पुढें **मालती**कडून धारण करवावीं, असें त्यांचें सांगणें आहे.'

**कामंदकी**ला हें सर्व ठाऊकच होतें. ती त्या दासीला ह्मणाली, 'अग, दिवाणजींनीं सांगितलें तें योग्यच आहे. हें स्थळ मंगलकारक आहे; तेंव्हां नवऱ्या मुलीला येथेंच सजविलें पाहिजे. बरें पण, हा डबा उघड आणि त्यांत काय काय आहे तें मला दाखीव पाहूं.'

दासीनें डबा उघडला, आणि एकेक वस्तु निरनिराळी करून ह्मणाली,' ही सफेत रेशमी साडी हिच्यावर केशराचे छाटे दिले आहेत. ही केशरी रंगाची चोळी आहे. ही लाल रेशमी ओढणीं आहे. हे सर्व अवयवांत घालावयाचे निरनिराळे दागिने आहेत. हा मोत्यांचा हार आहे व ह्या फुलांच्या-मोत्यांच्या झालरी लावलेल्या मंडवळ्या आहेत. हें सर्व

यथायोग्य धारण करवा.' असें सांगून दासी पुढें उभी राहिली.

**कामंदकी** दागिने वगैरे सर्व नीट पाहून **मकरंदा**कडे पाहून हळूच ह्मणाली, 'हा सर्व पोषाख तर यथायोग्य आहे. वत्सा **मकरंदा**, तूं हें अंगावर घालशील ह्मणजे **मदयंतिके**च्या चांगला डोळ्यांत भरशील.'

दासीला ह्मणाली, 'अग तूं जा, आणि—तुम्हीं सांगितल्याप्रमाणें व्यवस्था करताहेत, असें दिवाणजीला सांग.' दासी **कामंदकी**ची आज्ञा होतांच चटूकर तेथून निघाली.

**कामंदकी लवंगिके**ला ह्मणाली, 'अग **लवंगिके**, तूं **मालती**ला घेऊन गाभाऱ्यांत जा. मी एकांतीं बसून ह्यांतले कोणचे दागिने योग्य आहेत, कोणचे अयोग्य आहेत, तें शास्त्रीय रीतीनें नीट पाहून घेतें.' असें सांगून **कामंदकी** त्या देवळांतल्या एका ओहरींत गेली.

वस्तुतः **कामंदकी**ला यावेळीं एकांतीं जाण्याचें दुसरें कांहीं कारण नव्हतें. ते दागिने वगैरे जे नग आले होते, त्यांतून **मकरंदा**ला कोण कोणते धारण करतां येतील, व कोण कोणते येणार नाहींत, यांची निवड करावयाची होती. व **मालती** गाभाऱ्यांत गेली ह्मणजे तिचा आणि **माधवा**चा तेथेंच विवाह व्हायचा होता. तेव्हां त्यावेळीं परस्परांचीं कांहीं बोलणीं होणार, तशा प्रसंगीं आपला त्यांना कदाचित् संकोच होईल ह्मणून **कामंदकी** मुद्दाम एकीकडे सरली.

इकडे **लवंगिका मालती**चा हात धरून—गडे, ह्या देवीच्या मंदिरांत चल; तेथें पूजा अर्चा काय करावयाची ता करूंया, असें सांगून तिला गाभाऱ्यांत देवीजवळ घेऊन गेली.

ती येत आहे, असें पाहून **माधव** आणि **मकरंद** दोघेही अगदीं छपून बसले.

**मालती** आंत आली तेव्हां अंगाला लावायचीं उटणीं वगैरे तिच्या पुढें ठेवून **लवंगिका** ह्मणाली,' गडे, ह्या फुलांच्या माळा आहेत, हा अंगराग आहे, हे घे.'

यावर **मालती** ह्मणाली, 'हो आहेत. पाहिलें; पण हें घेऊन काय करायचें?'

**लवंगिका** ह्मणाली,' गडे, असें काय बोलतेस बरें? तुला आपला ज्याचा त्याचा कंटाळाच. हा पाणिग्रहणाचा समय आहे, तेव्हां आपलें कल्याण व्हावें, ह्मणून ह्या ग्रामदेवाची पूजा कर. ह्या माळा, हें चंदन, आणि ह्या अक्षता वगैरे सर्व साहित्य पूजेकरतांच आणून ठेविलें आहे.'

लग्नाचें नांव काढलें ह्मणजे **मालती**च्या कपाळाला आठ्या पडत होत्या. **माधवा**शीं लग्न लागायचें असें समजलें असतें तर मात्र ती मोठी खुष झाली असती; पण तें लागायाचें होतें **नंदना**शीं. निदान तिची तरी अशी समजूत होती, ह्मणून तिला लग्नाचें नांव नकोसें झालें होतें. ती ह्मणाली, 'सारेंच माझ्या इच्छेविरुद्ध करायला तयार झालेल्या कठोर दैवानें वरचेवर दुःख देऊन ज्याचें मन अगदीं पोळून सोडलें आहे, अशा मला असल्या गोष्टी सांगून तूं वरचेवर माझ्या दुःखावर डाग देतेस, तेव्हां मला कपाळ फुटकीला तुझ्या मनांत किती तरी छळायचें आहे, तें एकदां सांग. हें कर नी तें कर, कशाला तें? मला कांहीं एक करायचें नाहीं.'

**लवंगिका** तिचे दोन्ही हात आपल्या छातीवर ठेवून ह्मणाली, 'भारी बाई तुला राग येतो. ज्या त्या गोष्टीला

रागावतेस कां? तुला पूजा करायची नसली तर नको करूं; माझा कांहीं आग्रह नाहीं. पण तुझें काय ह्मणणें आहे तें तरी एकदां सांगेसना? ह्मणजे बरें होईल.'

**मालती** ह्मणाली, 'दुसरें काय सांगायचें, दुर्लभ वस्तूवर अभिनिवेश ठेवला असून दैव प्रतिकूल होऊन आपल्याला त्याची प्राप्ति होत नाहीं, अशा स्थितींत असलेल्या मनुष्याचें जें कांहीं ह्मणणें असावयाचें तेंच माझेंही आहे. आणखी काय असणार?'

इकडे **मकरंद** आणि **माधव** दोघेही त्यांचा संवाद ऐकत होते. **मकरंद** ह्मणाला, 'गड्या, आतां पुढें काय निवेल त्याविषयीं कांहीं संशयच नाहीं. पण आतां हिनें (**मालतीनें**) काय ह्मटलें तें ऐकलेंसना? तुझी प्राप्ति होत नाहीं ह्मणून ही आपल्या जिवावरदेखील उदार झाली आहे.'

यावर—होहो! ऐकलें. आणि ह्मणूनच हृदयाला फार असंतोष झाला आहे. असें सांगून **माधव** पुनः लक्ष्यपूर्वक त्यांचा संवाद ऐकूं लागला.

**मालती लवंगिके**ला मिठी मारून ह्मणाली, 'माझे खरेखुरे बहिणी, प्रियसखे **लवंगिके**! आतां माझ्यानें हें दुःख सोसवत नाहीं. ही तुझी अनाथ झालेली प्रिय मैत्रीण **मालती** मरणाला अगदीं तयार झाली आहे, असें समज. अगदीं लहानपणापासून एकत्र सहवास होऊन त्वां केलेल्या अनेक उपकारांनीं माझा तुझ्यावर जो पूर्ण विश्वास आहे, त्याला साजेल अशी ही शेवटची प्रेमाची मिठी मारून तुला प्रार्थना करितें. जर तुला माझ्या मनासारखें करायचें असलें तर एवढें कर कीं, मला आपल्या मनांत ठेवून सर्व सौभाग्यलक्ष्मीचा

निवास, व सर्व मंगलाचें निधान, अशा त्या **माधवाचें** मुखारविंद आनंदभरित नेत्रांनीं माझ्याकरितां अवलोकन कर!' असें सांगून **मालती** रडूं लागली.

इकडे हें ऐकून **माधवाला** अतिशय आनंद झाला. तो **मकरंदाला** ह्मणाला, 'गड्या, कोमेजलेल्या जीवरूपी फुलाला टवटवी आणणारें, सर्व इंद्रियांला मोहित करून तृप्त करणारें, हृदयाला—त्याची व्यथा दूर करून आनंद देणारें, असें हें वाक्यामृत दैवयोगानें माझ्या कानांत पडलें.'

इकडे **मालती** रडें सांवरून ह्मणाली, 'गडे, त्याला भेट, असें मी तुला कां सांगतें समजलीस? मला जीवदान देणाऱ्या त्या महाभागाला मी मेलें असें ऐकून फार संताप होईल; आणि त्या संतापाच्या बहरांत तो कदाचित् आपल्या अनुपम शरीराचादेखील त्याग करील. तेव्हां तशी गोष्ट न व्हावी, ह्मणून तूं असें कर कीं, मी परलोकांत गेलें असलें तरी माझी आठवण होऊन कथाप्रसंगानें त्याला वरचेवर स्मरण देऊन कधींही तो आपल्या घरादारावर विरक्त होणार नाहीं, असें कर. एवढी गोष्ट केलीस ह्मणजे तुझ्या प्रसादानें परलोकांमध्यें आनंदित होऊन मी कृतार्थ होईन!'

हें ऐकून **लवंगिका** ह्मणाली, "इडापिडा टळो! तूं भलतेंच कांहीं तरी बडबडूं लागली आहेस. पुरे कर आतां. आणखी कांहीं बोलशील तर मी अगदीं ऐकायची नाहीं."

यावर—तुझें खरेंच ग. तुह्मां सर्वांला **मालतीचे** प्राण पाहिजेत; पण **मालती** मात्र नको. मी अशा दुःखांत वांचावें असेंच करून तुह्मी माझा दावा पुरता साधा, असें **बोलून मालती** रडूं लागली.

तिचें समाधान करून **लवंगिका** ह्मणाली, ‘ असें वेडें बांकडें काय बोलतेस ? प्राण पाहिजेत आणि **मालती** नको हें काय? मी नाहीं समजलें.’

यावर **मालती** आपली काय अवस्था झाली आहे, ती दाखवून ह्मणाली, ‘ होय, मी ह्मणतें तसेंच तुमच्या मनांत आहे. नाहींतर वरचेवर आशा उत्पन्न होण्यासारखीं गोड गोड बोलणीं बोलून आतां हे लग्नाचे घाणेरडे सोहाळे तुह्मी अनुभवायला लावतां, तेव्हां दुसरें काय ह्मणावें? तर सांप्रत मला दुसरें कांहीं एक नको. ह्या शरीरावर दुसऱ्याची सत्ता असल्यामुळें मी तयार असतांही मला त्याची ( **माधवा**ची ) सेवा करायला मिळत नाहीं. हा जो अपराध घडत आहे, याच्या परिहारार्थ आपल्या जिवाचा त्याग करावा एवढाच माझा मनोरथ आहे. तर या कामांत प्रियसखे **लवंगिके**, तूं माझी वैरीण होऊं नकोस.’

हें ऐकून **माधव** ह्मणाला, ‘ प्रीतीची अगदीं सीमा ती हीच. याहून अधिक प्रीतीचें रूप निदर्शनास येणार नाहीं.’

**मालती** यावेळीं ढळढळां रडत असून तिचे डोळे अश्रुधारांनीं व्याप्त झाले होते. ती **लवंगिके**च्या खांद्यावर मान टाकून अश्रुधारांचा सडा घालीत होती. **माधव** व **मकरंद** तेथें बसले आहेत हें **लवंगिके**ला ठाऊकच होतें. हीच वेळ आहे, असें समजून तिणें **माधवाला** जवळ येण्याची खूण केली; पण मन ठिकाणावर नसल्यामुळें पुढें जाऊन आपण काय करावें, हें त्याला सुचलें नाहीं. इतक्यांत **मकरंदानें**—तूं **लवंगिके**च्या जागीं उभा रहा असें सांगितलें, तरी त्याला तसें करायला धैर्य होईना.

**माधव** ह्मणाला, ‘ अरे, मी यावेळीं काय करावें, तें

मला सुचत नसल्यामुळें अगदीं पराधीन झालें आहें. माझें अंग व बुद्धि जड झाली आहे.'

यावर **मकरंद** ह्मणाला, 'बरोबर, असें व्हायचेंच. अभ्युदय होण्याचा काल जवळ आला ह्मणजे अशीच स्थिति होते. हूं. चल चल, लवकर पुढें हो.' याप्रमाणें **मकरंदानें** आग्रह करून त्याला जाण्यास सांगितल्यावरून तो हळूच जाऊन **लवंगिकेच्या** जागीं उभा राहिला, व ती बाजूला सरली.

**मालतीचे** डोळे अश्रूंनीं भरून आल्यामुळें तिला ही अदलाबदल दिसली नाहीं. आपल्या जवळ उभी आहे ती **लवंगिकाच** असें समजून **मालती** पुनः ह्मणाली, 'गडे, आतां उशीर लावूं नको. लौकर अनुकूल असा माझ्यावर अनुग्रह कर.'

**माधवानें** आपण कोण आहें, याची कांहीं ओळख न दाखवितां—अग भोळे, साहस करण्याचा विचार सोड. हे आवेश कमी कर. माझें चित्त तुझ्या विरहाच्या दुःखाला सहन करण्यास असमर्थ आहे,—असें उत्तर दिलें.

या त्याच्या उत्तराचा संबंध दोहोंकडेही सारखाच लावतां येण्यासारखा आहे. ह्मणजे हे शब्द **लवंगिकेच्या** तोंडचे असें समजण्यासही कांहीं संशय येण्यासारखा नव्हता. ह्मणून **मालती** हें **लवंगिकेनेंच** आपल्याला उत्तर दिलें असें समजून—**मालतीचें** मागणें आजपर्यंत कधींच तूं मोडलें नाहींस, आणि आतां मात्र मोडतेस. बरें हा तुला शेवटचा माझा नमस्कार आहे, तो घे, असें ह्मणाली.

यावर **लवंगिका** बनून उत्तर देणारा **माधव** हर्षानें ह्मणाला, 'अग, वियोगानें असह्य आयास देणारे, तुला मी

काय बोलूं ? आतां तुला काय करायचें असेल तें कर; पण एकदां मला मिठी मार ह्मणजे झालें!'

'काय करायचें असेल तें कर' असें सांगितलें हा आपल्यावर मोठा अनुग्रह केला, असें समजून **मालती** ह्मणाली, 'वाहवा! तूं तर माझ्यावर अनुग्रहच केलास. ही पहा मी तुला आलिंगन देतें.'

असें बोलून तिला आलिंगन देऊन ह्मणाली, 'पण गडे, तुझें दर्शन मात्र होत नाहीं. पाण्यानें डोळे भरून आले आहेत, यामुळें माझा निरुपाय आहे.'

पुनः प्रेमपूर्वक आलिंगन देऊन **माधवाचें** आंग अंमळ कठीण लागल्यावरून ह्मणाली, 'सखे, कठीण कमलासारखा तुझ्या शरीराचा स्पर्श आज मला कांहीं निराळ्याच प्रकारचा आनंद देत आहे. आतां मी तुला काय सांगतें तेवढें कर. ज्याला ( **माधवाला** ) मी तुला भेटायला सांगितलें, त्याला मस्तकापासून हात जोडून माझ्याबद्दल प्रार्थना कर कीं—म्यां कपाळफुटकीनें प्रफुल्लित कमळाच्या शोभेला लाजविणाऱ्या तुझ्या मुखचंद्राला डोळेभर पाहून चिरकाल आपल्या नेत्रांला आनंद दिला नाहीं. उगीच कांहीं तरी मनोरथ करून एकसारखा वाढणारा अनावर उद्वेग मात्र नेहमीं मनांत धारण केला. वरचेवर आपली कठीण स्थिति पाहून ज्यांला अतिशय दुःख व्हावयाचें अशा सखिजनांला अस्वस्थ करणाऱ्या शरीरसंतापाचा अनुभव करीत इतके दिवस घालविले. चंद्राचा प्रकाश, मलयाचलावरचा मंद सुगंध वायु इत्यादि एकापुढें एक मला दुःख देणारे अनर्थ कसे तरी आजपर्यंत सहन केले; पण सांप्रत मी अगदीं निराश झालें आहें!

प्रियसखे **लवंगिके**, तूंही माझी वरचेवर आठवण करीत जा बरें. तुला वरचेवर आठवण येण्याकरितां त्या माझ्या प्राणनाथानें आपल्या हातांनीं गुंफून तयार केलेली ही बकुळीची माळ मी तुझ्या गळ्यांत घालतें. हिला तूं माझ्या ठिकाणीं मानून नेहमीं हृदयांत धारण कर.' असें बोलून मदनोद्यानांत **माधवा**कडून **लवंगिके**नें मागून घेतलेली व जिला प्राणापेक्षांही प्रीय मानून तिणें हावेळपर्यंत आपल्या गळ्यांत धारण केली होती, ती माळ आपल्या गळ्यांतून काढून ज्याला ती **लवंगिका**च समजत होती, त्या **माधवा**च्या गळ्यांत घातली.

माळ **माधवा**च्या गळ्यांत घालीत असतां तिनें डोळे उघडून वर पाहिलें, तों **लवंगिका** नसून ज्याच्याकरितां आपण हा वेळपर्यंत पुढच्या सर्व गोष्टी सांगत होतें व प्राणत्याग करायला तयार झालें होतें, तोच प्रत्यक्ष **माधव** आहे, असें पाहून भयानें एकदम मागें सरून ती अगदीं घामाघुम झाली. तिच्या सर्व अंगावर रोमांच उभे राहून कंप सुटला. रसशास्त्रकारांनीं अशी स्थिति होणें याला सात्विक भावाचा उदय असें ह्मणून याचें फार सुरस वर्णन केलें आहे. अतिशय प्रेमाचें लक्षण हेंच आहे. त्या दृष्टीआड राहून हृदयवल्लभाला पाहणें, व त्याच्या परोक्ष अनेक मनोरथ करणें आणि त्याची भेट होतांच वर सांगितल्याप्रमाणें स्थिति होणें, हें शुद्ध व अतिशय प्रेमाचें लक्षण आहे. असो.

विवाहांतलें मुख्य अंग माळ घालणेंतें तर—न समजून कां होईना, पण झालें. तेव्हां आनंदित होऊन **माधव** ह्मणाला, ' अहाहा! कापूर, चंदन, कमळ, चंद्रकांत, चं-

केला असावा असें वाटतें!'

माधवाला ओळखून **मालती** हळूच ह्मणाली,'अगबाई! **लवंगिके**नें माझी थट्टा केली.'

यावर **माधव** ह्मणाला, 'अग, आपल्या दु:खाला मात्र जाणून दुसऱ्याला किती दु:ख होत आहे तें न जाणणारे! ही पहा मी तुझी थट्टा करितों. निरंतर अंगाची अतिशय काहिली होत असून मनांत समागमाची कल्पना करून कशीतरी आपल्या मनाची समजूत करून घेऊन केवळ तुझ्या स्नेहावर आशा ठेवून प्राण धारण करणाऱ्या मीही तसे केवळ दु:खांत दिवस घालविले नाहींत काय? मग मला थट्टा करायला काय भय आहे?'

**लवंगिका** ह्मणाली, 'गडे, माझ्यावर उगीच रागाऊं नकोस. मी कांहीं तुझी थट्टा केली नाहीं. ज्यानें करायची त्याणेंच केली. माझ्यावर विनाकारण कां रागावतेस?'

**मकरंद** ह्मणाला, 'महाभागे **मालती**, झालें हें योग्यच झालें. तूं फार प्रेमळ आहेस, असें समजून कसा तरी मनाला धीर देऊन केवळ आशेवरच या मनुष्यानें (**माधवानें**) खरोखर इतके दिवस कसेतरी काढले. आतां ज्याला कंकण बांधलें आहे, अशा तुझ्या हातांनीं प्रेमाचा प्रसाद प्राप्त होऊन बहुत दिवस मनांत धारण केलेले याचे मनोरथ पूर्ण होवोत!'

हें ऐकून **लवंगिका मकरंदाला** ह्मणाली, 'महाभागा, आपल्या इच्छेनें विवाह करून घेण्याचें साहस जिच्या मनांत-

देखील कधीं येत नाहीं, तेव्हां हातांत कंकण आहे, आणि त्याणें आपलें पाणिग्रहण करावें, हा विचार हिच्या मनांत कोठून येणार आहे? '

**लवंगिकेनें** आपल्या भाषणांत असें सुचविलें कीं, पाणिग्रहण करणें हें हिच्या हातून व्हायचें नाहीं, तेव्हां तें **माधवानें**च करावें. हा तिचा अभिप्राय जाणून **मालती** अतिशय घाबरली. कारण, त्या भोळ्या मुलीला आईबापांनीं दिल्यावांचून आपला आपण चोरून विवाह करणें ह्या गोष्टीचें मोठें भय वाटत होतें. ती—अरे देवा! मुलीच्या वर्तनाविरुद्ध ही ( **लवंगिका** ) मला कांहीं तरी करायला सुचवीत आहे; आतां काय करावें ? असें ह्मणाली.

इतक्यांत **कामंदकी** तेथें आली. ती ह्याच वेळेची वाट पहात होती. कारण **मालती** आपल्या आपण विवाह करून घेण्याला तयार होणार नाहीं, हें तिला ठाऊकच होतें. व **लवंगिके**च्या सांगण्याचें तितकें वजन पडणार नाहीं, ह्मणून ती मुद्दाम तेथें आली, आणि **मालती**ला ह्मणाली, 'मुली, अग मित्रे, हें काय? ' **कामंदकी**ला पाहतांच **मालती** एकदम तिला गच्च मिठी मारून रडूं लागली. तिला हे सगळे आपल्याकडून बलात्कारानें भलतीच गोष्ट करायला लावणार, याचें मोठें भय वाटलें होतें.

**कामंदकी** तिच्या हनुवटीला धरून मुका घेऊन ह्मणाली, ' बाळे, उगी, रडूं नकोस. अशी घाबरलीस कां?' समक्ष पहात असतां डोळ्यांला आनंद व वियोग झाला असतां मन तदाकार होऊन शरीराला ग्लानी यावी, अशी स्थिति केवळ तुझ्याकरितां ज्याची होते व ज्याच्याकरितां तुझीही स्थिति तशीच होते, तो हा तुझा आवडता तरुण

प्रियकर ( **माधव** ) तुझें पाणिग्रहण करण्याला तयार झाला आहे, तर आतां भय सोड, आणि त्याला अनुकूल हो. विधात्याचें रसिकत्व तुह्मां दोघांचा जोडा जमवून दिल्यानें सफळ होवो! आणि मदनाचा मनोरथ पूर्ण होवो!'

**लवंगिका** ह्मणाली, '**कामंदकी**आई, ही ( **मालती** ) भित्री नाहीं. पण कृष्णचतुर्दशीच्या अंधाऱ्या रात्रींत घोर स्मशानांत संचार करून आपलें मांस विकण्याचें भयंकर कृत्य करायला तयार झालेला आणि त्या मेल्या पाखंड्याला (**अघोरघंटा**ला) आपल्या बाहुबलानें नाहींसा करणारा असा हा **माधव** खरोखर मोठा साहसी आहे, ह्मणून ही कांपली, दुसरें कांहीं नाहीं.'

**लवंगिके**नें मोठें खुबीदार व समयोचित भाषण केलें. **मालती** यावेळीं आढेवेढे घेत आहे, ह्मणून तिणें—तुझ्याकरितां हा आपला प्राण देण्यास तयार झाला होता व तुझ्याकरितां जिवावर उदार होऊन **अघोरघंटा**पासून तुला सोडवून घेतलें, या गोष्टीची तिणें **मालती**ला मुद्दाम आठवण केली. कारण प्राणदान करणाऱ्या **माधवा**चे उपकार फेडण्याकरितां तरी तिणें यावेळीं माघार घेऊं नये, असा तिचा मतलब होता. **मालती**ला त्या भयंकर प्रसंगाची आठवण दिली तेव्हां ती—अरे बाबा! अग आई! ह्मणून ओरडली.

**कामंदकी माधवा**ला ह्मणाली, 'वत्सा **माधवा**, ही—सर्व मांडलिक राजांनीं ज्याच्या पायांची धूलि मस्तकावर धारण केली आहे, अशा अमात्य **भूरिवसू**ची एकुलती एक मुलगी **मालती**, अनुरूप जोडा जमविण्याची इच्छा करणाऱ्या भगवान् **ब्रह्मदेवा**नें, मदनानें आणि मीही तुला दिली आहे!'

असें सांगून **कामंदकीनें मालतीचा** उजवा हात **माधवाच्या** हातांत दिला. यावेळीं तिचा गळा दाटून आला.

तिनें सांगितलेलें ऐकून **मकरंद** ह्मणाला, 'ह्या योगानें भगवतीच्या चरणरजांचा प्रसाद सफळ झाला !'

**कामंदकीचे** डोळे पाण्यानें भरले आहेत असें पाहून **माधवानें**—असें कां ? म्हणून विचारिलें. तेव्हां अंगावरच्या छाटीच्या पदरानें डोळे पुसून ती ह्मणाली, 'बाबा, तुला कांहीं सांगायचें आहे.'

**माधवानें** आज्ञा कर ह्मणून सांगितलें, तेव्हां **कामंदकी** म्हणाली, 'वत्सा **माधवा** ! तुझ्यासारख्या चांगल्या मनुष्याची प्रीति परिणामीं चांगलीच होणार आहे. मीही याला सर्व प्रकारें मान्यच आहें, तेव्हां तुला दुसरें कांहीं सांगायचें नाहीं. ह्या माझ्या लाडक्या बाळेवर माझ्या परोक्ष विशेष परिचय ठेवण्याची दया करण्याच्या कामांत अंतर करूं नकोस, एवढी तुला माझी प्रार्थना आहे,' असें बोलून **माधवाच्या** पायां पडूं लागली!

ती नमस्कार करायला लागली तेव्हां वरच्यावर तिला धरून **माधवानें** निवारण केलें, आणि ह्मणाला, 'अतिशय वात्सल्यानें हा मोठा अतिक्रम होणार होता. आईकडून पायां पडून घेऊन मुलानें आपल्याला अपराधी करून घ्यावें हें आपल्याला योग्य नाहीं.'

लग्नांत नवऱ्या मुलाबरोबर घेडे ह्मणून असतात. नवऱ्याला भिडेनें विशेष कांहीं बोलवत नाहीं, तेव्हां प्रसंगीं योग्य उत्तर देण्याचें काम बहुतकरून घेड्यांकडे असतें. **मकरंद** हा यावेळीं **माधवाचा** घेडा झाला होता. **कामंदकीनें मालतीबद्दल** जें कांहीं सांगितलें, त्याचें उत्तर

हिचें प्रेमही अतिशय आहे. सर्व गुणांनीं अलंकृत आहे. हे हिचे एकेक गुण स्वतः मोठें वशीकरणच आहे. असें असून त्या सर्वांचा हिच्या अंगीं समावेश झाला आहे. तेव्हां तुह्मीं जें काय करायला सांगितलें तें आपोआपच घडून येणार आहे, याहून अधिक मी काय बोलूं? भगवतीला सर्व विदितच आहे.'

**मालती**—आपल्याच इच्छेनें नवरा वरल्याचा आपल्यावर अपवाद येईल ह्मणून भ्याली होती. **कामंदकी** ही तिच्या आईसारखीच होती. तिणें आपण होऊन कन्यादान केलें. नंतर **मालती**ला आतां आपल्यावर लोकापवाद येणार नाहीं, असें वाटून तिचा जीव अम्मळ ठिकाणावर आला. नंतर **कामंदकी** तिला आणि **माधवा**ला ह्मणाली, 'वत्सा **माधवा**, वत्से **मालती**, अत्यंत प्रियमित्र, बंधु किंवा सर्व कांहीं, अथवा आपले प्राणदेखील—स्त्रियांला भर्ता, आणि पुरुषाला धर्मपत्नि हींच या संसारांत मुख्य आहेत. हें तुम्हीं दोघांनींही आपआपल्या मनांत घट्ट धरून वागावें. बाकी इतर सर्व गोष्टी आपआपल्या भाग्यानुसार घडत असतात.'

**कामंदकी**च्या ह्या उपदेशावर **माधव** आणि **मालती** यांच्यानें कांहीं उत्तर देववलें नाहीं; ह्मणून **मकरंद** आणि **लवंगिका** यांणीं—भगवतीची आज्ञा आम्हांला सर्वथा मान्य आहे, असें सांगितलें.

**कामंदकी**ला दोघांचा चोरून विवाह करायचा होता,





तें तर काम आटपल्यासारखें झालें. पण **नंदनाला** फसवून झालेला विवाह पक्का करावयाचा व **मकरंद** आणि **मदयंतिका** यांचा विवाह लावून द्यायचा, हें काम तसेंच राहिलें होतें. इकडे नवऱ्यामुलीबरोबर आलेले लोक मुहूर्ताची वेळ भरत आली ह्मणून गडबड करूं लागले. तेव्हां **कामंदकी मकरंदाला** ह्मणाली, 'वत्सा **मकरंदा**, हूं आतां तूं उशीर लावूं नकोस. हा दागिन्यांचा पेटारा घे, आणि हुबेहुब **मालतीचा** वेष घेऊन माझ्याबरोबर चल, आणि पुढच्या संकेताप्रमाणें आपलें आपणच लग्न करून घे.' असें सांगून पेटारा त्याच्या हवालीं केला.

तुमच्या आज्ञेप्रमाणें करतों, असें सांगून गाभाऱ्याच्यावर शिखराच्या मजल्यावर चढण्याची वाट होती तिणें मजल्यावर जाऊन **मकरंदानें** हुबेहुब **मालतीसारखा** वेष केला. एखादा अडाणी वेदघोक्या भटाचा मुलगा असता किंवा केवळ खरडें घांसणारा बांड कारकून असता, तर त्याला यावेळीं मोठें कठीण पडलें असतें. पण **मकरंद** सर्व कलांत प्रवीणच होता. आधींच सुस्वरूप असून आंगानें गोंडस व ऐन सोळा वर्षांच्या वयांत असल्यामुळें ज्याला मिशीचा केंसदेखील फुटलेला नव्हता, अशा त्या **मकरंदानें** स्त्रीचा वेष इतका हुबेहुब घेतला कीं, तो एकदम खालीं उतरला तेव्हां **माधवाला** देखील अम्मळ भ्रम झाला!

आतां हें याणें बायकोचें सोंग घेतलेलें अखेरपर्यंत उमगणार नाहीं, व ही केलेली मसलत कशी शेवटास जाईल, याविषयीं **माधवाला** मोठी शंका होती. आपण दोघेही याठिकाणीं अगदीं परकी असून अनाथ आहों. कदाचित् ही गोष्ट फुटली आणि त्यापासून भलतेंच कांहीं

झालें तर काय करावें? **नंदना**चा पक्ष जबरदस्त आहे; तेव्हां उगीच धोक्यांत पडल्यासारखें होईल. ह्मणून **माधव** **कामंदकी**ला ह्मणाला, 'भगवति **कामंदकी**आई, तुमच्या सांगण्यावर माझें कांहीं ह्मणणें नाहीं; पण हें जें तुम्हीं आरंभिलें आहे यापासून माझ्या मित्रावर (**मकरंदा**वर) पुष्कळ अनर्थ व संकटें येण्याचा संभव दिसतो.'

**कामंदकी** त्याला दटावून ह्मणाली, 'जाउंदे रे, तुला त्याची कां काळजी?' **माधवा**ची यावर आणखी कांहीं बोलण्याची प्राज्ञा नव्हती. 'कायतें तुमचें तुम्ही जाणा,' असें सांगून तो उगीच बसला. इतक्यांत **मकरंद** हंसत हंसत पुढें येऊन **माधवा**ला ह्मणाला,'गड्या, माझ्याकडे पहा तरी. मी यावेळीं दुसरी **मालती**च बनलों आहें. **मकरंदा**ला पाहून **कामंदकी**ला मोठें कौतुक वाटलें. **मालती** हळूच डोळे वर करून **मकरंदा**ला पाहून गालांतल्या गालांत हंसली.

**माधव मकरंदा**ला आलिंगन देऊन थट्टेनें ह्मणाला, '**कामंदकी**आई, तुमच्या त्या **नंदना**नें असली उत्तम बायको मिळण्यासारखी पूर्वजन्मीं कांहीं मोठी तपश्चर्या केली होती असें वाटतें. नाहीं तर अशी सुंदर बायको त्याला कोठून मिळाली असती. पाहा तरी ही कशी दिसते आहे ती.'

**कामंदकी** ह्मणाली, 'वत्सा **माधवा**, मुली **मालती**, तुम्ही दोघेंही ह्या मागच्या दिंडींतून बाहेर निघून विवाहाचा सोहाळा अनुभवण्याकरितां या इकडून झाडींतून माझ्या मठाच्या मागच्या बाजूला बाग आहे तेथें चला. **अवलोकिते**नें विवाहाला उपयोगी सर्व साहित्य तेथें तयार करून ठेविलें आहे. आणखी अत्यंत उत्कंठित झालेल्या **केरक**

देशांतल्या स्त्रियांच्या गालासारखीं ज्यांचीं पिवळीं जर्द पानें आहेत, अशा नागवेलींनीं सुपारीचीं झाडें वेढलेलीं आहेत. तसेंच पिकलेलीं बोरें खाऊन आनंदित झालेले पक्षी जेथें शब्द करताहेत, तसेंच मावळुंगावर बांधलेलें वेष्टन जेथें वाऱ्यानें उडत आहे, असे तेथील प्रदेश तुह्मांला फार आनंदकारक होतील. आणि तेथें गेलां ह्मणजे हा **मकरंद** **मदयंतिके**ला घेऊन येईपर्यंत तेथेंच रहा.'

**माधव** हर्षानें ह्मणाला, 'एक विवाहाची संपत्ति प्राप्त झाली. तिला आतां दुसरा ह्मणजे **मकरंदा**च्या विवाहाचा तुरा लागणार आहे. ही मोठी आनंदाची गोष्ट आहे.'

**कलहंसक** ह्मणाला, ' वाहवा! एकूण दुसरें एक लग्न होणार तर?' **मकरंद** ह्मणाला, 'हो हो. वेड्या, तुला यांत संदेह तो कसला वाटला? तें अगदीं खचित व्हायचेंच.'

**लवंगिका मालती**ला ह्मणाली, '**कामंदकी**आईनें काय सांगितलें तें ऐकलेंसना? त्यांनीं सांगितल्याप्रमाणें वाग हो. उगीच आढेवेढे घेत बसूं नको. तुझा तो हट्ट अगदीं सोडून दे. पण आतां माझ्यावरचा तुझा राग अगदीं गेलाना?' हें ऐकून **मालती** खालीं पाहून हंसली.

इतक्यांत **कामंदकी, मकरंद** आणि **लवंगिका** ह्यांला —चला चला आपण लौकर जाऊंया, असें ह्मणाली.

**मालतीला लवंगिका** आपल्याबरोबर येणार नाहीं हें कळलें नव्हतें. **कामंदकीनें** तिला चल ह्मटलें तेव्हां **मालती** ह्मणाली, 'गडे, तूं देखील जाणार कायग? छे गडे, मला एकटीला टाकून जाऊं नको.'

यावर **लवंगिका** हंसून ह्मणाली, 'होहो. आतां आह्मांलाच येथून लौकर गेलें पाहिजे. आतां एकटी

कशी? असें बोलून **लवंगिका**, **कामंदकी**, आणि **मकरंद**, तिघेंही त्या देवळांतून बाहेर निघालीं.

इकडे **कामंदकी**च्या आणि **लवंगिके**च्या वियोगानें अम्मळ दुःखित झालेल्या **मालती**चें समाधान करून **माधव** ह्मणाला, 'आतां मी यावेळीं मूळापर्यंत ज्यावर कांटा उभा राहिला असून कोमल बाहुरूप देंठावर राहणारें, घामानें भिजलेलीं बोटें हींच ज्याचीं कोमळ पानें आहेत, असें हिचें सुंदर आरक्त करकमल—हत्ती आपल्या शुंडादंडानें पुष्करणींतून कमल ग्रहण करितो, त्याप्रमाणें मी ग्रहण करीन.' असें बोलून त्याणें **मालती**चा हात धरून तिला हळूच युक्तिप्रयुक्तीनें कोणाला न दृष्टी पडतां **कामंदकी**नें ज्या ठिकाणीं जावयास सांगितलें होतें, त्या ठिकाणीं नेलें. आणि तेथें **अवलोकि**तेनें करून ठेविलेलें साहित्य घेऊन पुढचा विधि उरकण्यास त्यानें आरंभ केला.

---

# प्रकरण सातवें.

इकडे **मालती**चा वेष दिलेल्या **मकरंदा**ला ज्या हत्तिणीवर **मालती** बसून आली होती, तीवरच नेऊन बसविलें. **लवंगिका** बरोबर तयार होतीच. अंबारींत आणखीही दासी होत्या, पण **मकरंदा**चा वेष अगदीं हुबेहुब होता. त्यांतून रात्रीची वेळ, आणि तशांतूनही नवरीचा वेष घेतल्यामुळें शेंदरीरंगाच्या रेशमी चादरीचा **मकरंदा**नें बुरखा घेतला होता. शिवाय **लवंगिका** जेव्हां तेव्हां पुढें होऊन प्रत्येक गोष्ट सांवरून धरण्यास तयार होतीच. यामुळें **मकरंदा**विषयीं कोणालाच कांहीं संशय आला नाहीं. ज्या थाटा-

माटानें नवरीची स्वारी घराकडून आली, त्यापेक्षां विशेष थाटानें परत जातांना गेली. मुहूर्ताची वेळ भरण्याला सुमारें घटका अर्धि घटकेचा अवकाश आहे, तों ह्या खोट्या नवरीची स्वारी **भूरिवसू**च्या मंडपांत येऊन पोहोंचली.

इकडे मंडपांत हजारों सुवासिनी बायका व ब्राह्मण तसेच इतर मांडलिक राजे शेटसावकार वगैरे यांचा थाट जमला होता. **कामंदकी** आणि **लवंगिका** या दोघींनीं **मकरंदा**ला हळूच हत्तीवरून उचलून घेऊन मंडपांत गौरिहराची पूजा करायला नेऊन बसविलें. **भूरिवसू**ला व त्याच्या स्त्रीला हें सर्व माहीतच होतें; ह्मणून त्यांणीं त्याविषयीं कांहींच पारिस्फोट केला नाहीं. शेजारणी पाजारणी पुष्कळ आयाबाया जमल्या होत्या त्यांला ही गोष्ट कदाचित् कळली असती; परंतु **मालती**चें मन अस्वस्थ झालें आहे, याकारितां कोणीं कांहीं गडबड करूं नका, असें सांगून **लवंगिके**नें नवरीजवळ कोणालाच फिरकूं दिलें नाहीं. तशांतूनही कोणी ह्मातार्‍या कोतार्‍या बाया पुढें आल्या व—मुली **मालती**, आतां तुझें लग्न होणार, असें कांहीं बोलूं लागल्या, तर **लवंगिका**च त्यांला उत्तर देत होती. **मालती** बनलेला **मकरंद** तोंडावरून खोल पांघरून घेऊन खुशाल **मदयंतिके**चें ध्यान करीत बसला होता.

इकडे नवरदेवाची स्वारी आपल्या घराकडून निघाली. स्वतः राजेसाहेब या कार्यांत अगदीं पुढारी असल्यामुळें ते नवर्‍याच्या बरोबर चालले होते. **नंदना**ला एका मोठ्या शृंगारलेल्या हत्तीवर अंबारींत बसविलें होतें. राजेसाहेब अगदीं त्याच्या जवळ बसले होते. सर्वांच्या पुढें शेंकडो वाजंत्री वाद्यें वाजवीत होते. उत्तम वेश्या नृत्य करीत होत्या.

ब्राह्मण मंगलकारक मंत्र ह्मणत होते, व नवऱ्याच्या हत्तीच्या मागें हजारों स्त्रिया मंगलकारक गाणीं गात होत्या. त्यांच्या मागून मांडलिक राजे व सरदार व इतर मोठमोठे लोक चालले होते. मुख्य करवली **मदयंति**का ही दुसऱ्या एका शृंगारलेल्या हत्तिणीवर बसून **बुद्धरक्षिता** व इतर सख्या ह्यांसहवर्तमान मोठ्या थाटानें भावाबरोबर चालली होती. याप्रमाणें मोठ्या समारंभानें नवरदेवाची स्वारी लग्नमंडपाच्या दारांत येऊन पोंचली.

इकडे **भूरिवसु** व त्याची स्त्री मंडपाच्या दारांत नवरदेवाची पूजा करायला तयारच होतीं. **नंदन** हत्तीवरून खालीं उतरतांच **भूरिवसूनें** त्याची मधुपर्क पूजा करून जांवयाला बोहल्यावर नेऊन उभा केला. **मालतीचा** वेष घेतलेल्या **मकरंदाच्या** आणि त्याच्यामध्यें अंतःपाट धरून ब्राह्मण मंगलाष्टकें ह्मणूं लागले. सुवासिनी गीतें ह्मणूं लगल्या. बाहेर वाद्यांचा गजर चाललाच होता. यामुळें कांहीं वेळ आकाश पाताळ ह्या नादानें गच्च भरून गेलें होतें.

मंगलाष्टकें झाल्यावर संप्रदायाप्रमाणें कन्यादान वगैरे जो कांहीं विधि व्हावयाचा तो झाला. **भूरिवसु** सर्व जाणत असूनही त्याणें न चुकतां सर्व विधि यथासांग उरकला. नंतर आलेल्या मंडळीचा आदरसत्कार जेवणखाण वगैरे सर्व आटपून मंडळी हळूहळू आपआपल्या ठिकाणीं परत जाऊं लागली. राजाला **भूरिवसूनें** आपल्या सांगण्याप्रमाणें **नंदनाला** मुलगी दिल्याबद्दल अतिशय आनंद झाला; व त्याचे आभार मानून तो आपल्या वाड्यांत निघून गेला.

मुली उपवर असल्यामुळें विवाह आणि गर्भाधान दोन्ही संस्कार पूर्वकाळीं एकाच दिवशीं होत असत. वऱ्हाडी मंडळी पातळ झाली, तेव्हां घरची मंडळी हळूहळू पुढच्या तयारीला लागली. इकडे वधूवरांकरितां उत्तम शृंगारलेल्या रंगमहालांत सर्व प्रकारची तयारी करून ठेविली होती. **मालती**च्या अधरामृताचा आस्वाद घेण्याला आतुर झालेल्या दुर्दैवी जांवईबुवाला सूचना झाली तेव्हां ते—नाहीं होय, नाहीं होय ह्मणत व मनांत मांडेखात रंगमहालांत गेले. त्यांच्या मित्रमंडळीनीं त्यांना महालांत पोहोंचवून त्यांचा निरोप घेऊन ते आपआपल्या ठिकाणीं निघून गेले. नंतर **कामंदकी**बाईची स्वारी महालांत जाऊन **नंदनाला** आपला आनंद प्रदर्शित करून—बायकोला चांगल्या रीतीनें वागविण्याविषयीं उपदेश करून त्यांणीं त्यांचा निरोप घेतला. आणि **भूरिवसू**ला येतें ह्मणून सांगून त्या दिवशीं इतकी रात्र झाली होती तरी **कामंदकी** आपल्या मठांत निघून गेली.

नंतर **मालती**चा वेष घेणाऱ्या **मकरंदाला** पुढें करून सगळ्या बायकांनीं तिला रंगमहालाच्या दारांत आणून सोडून त्या भराभर निघून गेल्या. **लवंगिके**नें तिला आंत नेलें. **मदयंत**काही या वेळीं बरोबरच होतो. तिच्या मनांत **मालती**ची पुष्कळ थट्टा करायची होती; पण—आज ती फार दुःखित झाली आहे तेव्हां तूं कांहीं बोलशील तर ती चिडेल; याकरितां तूं तिच्या वाटेस जाऊं नको, असें **लवंगिके**नें सांगितल्यावरून **मदयंतिका** कांहीं एक बोलली नाहीं, व कांहीं कमीजास्ती झालें तर आपल्याला लौकर कळवावें, असें सांगून आपली मैत्रीण **बुद्धरक्षिता** हिला

तेथें ठेवून **मदयंतिका** भावाचा निरोप घेऊन वधूप्रवेशाची तयारी करण्याकरितां घराकडे निघून गेली.

इकडे **लवंगिकेनें** मुद्दाम लाजत असून मी नाहीं, मी नाहीं करणाऱ्या **मालतीचें** सोंग घेणाऱ्याला बळेंच **नंदनाच्या** पलंगावर बसवून **नंदनाला** ह्मणाली, 'ही आमची प्रियसखी अम्मळ रागीट असून भिडस्तही आहे. अल्लड स्त्रियांला कसें राजी करावें याविषयीं आपल्याला मी काय सांगायचें आहे. केवळ भाषणावरच महाराजांसारख्यांला आपण मोहित करणारे आहां. सांगायचें ह्मणून इतकेंच कीं हिला सुख होईल, व आपणां उभयतांचा आनंद वृद्धिंगत होईल असें करावें ह्मणजे झालें.' असें सांगून **लवंगिका** महालाचे बाहेर जाऊन तिणें दार लावून घेतलें; आणि पुढें काय मजा उडते ती पाहण्याकरितां तेथेंच जवळ छपून बसली.

इतका हा सर्व विधि होई तोंपर्यंत बरीच रात्र झाली. **मकरंद** आपल्या नवऱ्याशीं कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें त्या पलंगावर खुशाल मुसकूट मारून निजला. वेडा **नंदन** त्याला **मालती** समजून ही नववधू आहे, हिला लाडीगोडीनें राजी केलें पाहिजे, ह्मणून त्याच्या विनवण्या करूं लागला. खुषमस्कऱ्याच तो, त्याला खोल कारस्थान कोठून माहीत असणार! आपण आतां हिला राजी करीन, या घमेंडीखालीं त्याणें आपल्याकडून कमाल केली; पण **मकरंदानें** हूं की चूं एक अक्षर देखील तोंडावाटे काढलें नाहीं. आर्जवानें ही ऐकत नाहीं, तेव्हां आतां बळजोरीनें तरी आपला हेतु पूर्ण करून घ्यावा, असा विचार करून **नंदन मकरंदावर** बलात्कार करूं लागला.

प्रथम एक दोन वेळ त्याला झिटकारलें तरी कांहीं केल्या ऐकत नाहीं, असें पाहून **मकरंदानें** जोरानें अशी एक लाथ मारली कीं, त्यासरसा **नंदन** धाडकन पलंगाखालीं पडला. दुसरा एखादा ज्वान नवरा असता तर त्याणें कोमळ पायानें हळूच मारलेल्या ह्या लाथेचा बदला घेतला असता; पण स्वारी पडली रुपेरी केंसाची! बायकोनें लाथेचा तडाका मारला त्याची कळ अद्याप गेली नव्हती. तेव्हां आणखी कांहीं तरी हालचाल केली, आणि दुसरी लाथ बसली तर काय करावें? असा विचार करून राजश्रीनीं तोंड सोडलें.

ज्या मनुष्याच्या हातानें कांहीं होत नाहीं, तो तोंडानें विशेष बडबड करीत असतो. बायकोला राजी करण्याची अक्कल नाहीं हें एकीकडेच राहिलें, आणि उगीच घालून पाडून बोलायला प्रारंभ केला. **नंदन** म्हणाला, 'मला तूं लहानपणापासूनच वाईट चालीची आहेस हें ठाऊकच आहे! तूं व्यभिचारिणी आहेस. व्यभिचारिणीला नवरा मुळींच आवडत नाहीं. मी या भानगडींत मुळींच पडणार नव्हतों, पण महाराजसाहेबांच्या आग्रहामुळें मला असें करावें लागलें. बरें कांहीं चिंता नाहीं. मी आजपासून तुला बायको असें ह्मणेन, किंवा तुझ्या अंगाला हात लावीन तर शपथ. जा, काय पाहिजे तें कर.' असें बोलून जांवईबुवा हात पाय आपटीत महालाच्या बाहेर पडले.

**मकरंदाला** मुळापासूनच हसूं येत होतें, व त्याच्या त्या बडबडीनें तर तें त्याच्या पोटांत मावेनासें झालें. तथापि मसलत पुरी केली पाहिजे ह्मणून तोंडावर घांघरूण

घेऊन तो मुकाट्यानें पडला होता. **नंदन** हात पाय आपटीत बाहेर निघून गेला तेव्हां त्याचें हंसें एकदम बाहेर फुटलें.

**नंदन** महालाच्या बाहेर निघाला तों—**लवंगिका** वगैरे दासी जांवईबुवा काय झालें ह्मणून विचारूं लागल्या, तरी कोणाला कांहींच न सांगतां तो मुकाट्यानें तडक आपल्या घरीं निघून गेला. बिचाऱ्याला घरींदेखील तोंड दाखवायला मार्ग नव्हता. कारण इकडे महालांत काय झालें तें कोणाला सांगावें तर जो तो आपल्यावर भलताच आरोप करणार; ह्मणून तो कोणाला कांहीं न कळवितां मुकाट्यानीं आपल्या महालांत जाऊन निजला.

इकडे **नंदन** बाहेर जातांच **लवंगिका** व **बुद्धरक्षिता** महालांत आल्या आणि दार लावून घेऊन दुर्दैवी जांवईबुवांची काय दशा झाली, त्याबद्दल पोटभर हंसून, त्यापुढचें काम कसें उरकावें याचा विचार करूं लागल्या. **बुद्धरक्षिते**ला—इकडे कांहीं अधिकउणें झालें तर आपल्याला कळवावें असें **मदयंतिके**नें सांगितलेंच होतें. तेव्हां **लवंगिके**नें आणि तिणें मसलत करून **मदयंतिके**ला तेथें आणण्याचा निश्चय करून **बुद्धरक्षिता** तिला आणण्याकरितां तत्काल **नंदना**च्या घराकडे निघून गेली.

इकडे **मालती**चा वेष घेतलेला **मकरंद** बिछान्यावर पडला होता, व **लवंगिका** त्याच्या जवळ बसली होती. **मकरंदा**ला **कामंदकी**चें कारस्थान सफळ होईल किंवा नाहीं याविषयीं चिंता होती. तो **लवंगिके**ला ह्मणाला, ‘ अग, **कामंदकी**आईनें या मसलतीचा शेवट काय तो **बुद्धरक्षिते**च्या हातांत दिला आहे. तिच्या हातून तो पार पडेल असें तुला वाटतें का? ’

**लवंगिका** ह्मणाली, 'हो हो, यांत काय संशय? महानुभावा, **बुद्धरक्षिता** ह्मणजे कांहीं सामान्य मसलती आहे असें तुला वाटलें का? **कामंदकी**आईच्या पट्ट शिष्यिणींपैकींच ती एक.' इतक्यांत पैंजणांचा शब्द ऐकून ह्मणाली, 'वाहवा! आतां अधिक सांगण्याची कांहीं गरज नाहीं. हा पैंजणांचा आवाज ऐकूं येत आहे, यावरून आह्मी योजलेलें निमित्त करून **बुद्धरक्षितेनें मदयंतिके**ला इकडे आणलें असावें असें वाटतें. हो हो! खास **मदयंतिके**च्याच पैंजणांचा हा शब्द. हो बरी आठवण झाली. तूं आतां असा राहूं नको. ही शालजोडी पांघरून घेऊन सुस्त निजल्याचें सोंग घे.'

**मकरंदानें** शालजोडी पांघरून अगदीं सुस्त निजल्याचें सोंग घेतलें. इतक्यांत **मदयंतिके**ला घेऊन **बुद्धरक्षिता** आली. **बुद्धरक्षितेनें**—तुझ्या भावानें **मालतीला** राग आणला आहे, तिचें समाधान करायला चल व दोघांचीं समजूत घाल, असें सांगून **मदयंतिके**ला इकडे आणलें होतें. आपण आतां **मालतीची** खूप थट्टा करूं, या उमेदीनें ती लौकर लौकर येत होती. **बुद्धरक्षिते**ला ह्मणाली, 'अग, खरेंच का **मालतीनें** माझ्या भावाला राग आणला?'

**बुद्धरक्षिता** ह्मणाली, 'अग, मी तुला खोटें सांगतें का?'

यावर **मदयंतिका** ह्मणाली, 'असें झालें असेल तर खरोखर गडे फार वाईट झालें. त्या **मालतीचा** स्वभाव फारच हट्टी! आतां तिची खूप चांगली पूजा काढू या.'

असें बोलत बोलत त्या महालाच्या दरवाज्यांत येऊन पोहोंचल्या. तेव्हां **बुद्धरक्षिता** ह्मणाली, 'हा पहा तिचा महाल! आणि ती तेथें पलंगावर आहे तीच **मालती**!

आतां, तुला काय बोलायचें असेल तें बोल, आणि एकदांची तिची समजूत कर ह्मणजे झालें.'

**मदयंतिका** पलंगाजवळ गेली आणि पाहते तों **मालती** घोरत पडली आहे. तेव्हां **लवंगिकला** म्हणाली, 'गडे **लवंगिके,** तुझी प्रिय मैत्रीण सुस्त निजली आहे असें वाटतें.'

**लवंगिकेला मकरंदाच्या** सोंगाची बतावणी करायचीच होती. ती म्हणाली, 'आधीं अशी इकडे ये. एव्हांशीं तिला जागी करूं नकोस. तिला अतिशय खेद झाल्यामुळें हावेळपर्यंत एकसारखी ती तळमळत होती. नुकतेंच कोठें अम्मळ मन शांत करून स्वस्थ झाल्यामुळें तिचा डोळा लागला आहे. याकरितां हळूच येऊन या पलंगावर बैस.'

**मदयंतिका** गडबड न करितां पलंगावर बसून **लवंगिकेला** ह्मणाली,' अग, ही ( **मालती** ) फार तेढ्या स्वभावाची आहे. ही इतकी रागावते तरी कां ?'

यावर **लवंगिका** भिवया वर करून ह्मणाली, 'बाई, न रागावेल तर काय करील ? नववधूला विश्वास उत्पन्न करून तिला राजी करण्याचे उपाय जाणणारा, स्त्रीचें मन हरण करणारा, मोठा रसिक असून मधुर भाषण करणारा, विशेष स्नेह ठेवणारा व ज्याचा स्वभाव रागीट नाहीं, अशा चतुर तुझ्या भावाशीं गांठ पडली असून माझी सखी दुःखित न होईल तर करील काय ?'

**लवंगिकेनें** ह्या भाषणावरून **मदयंतिकेची** खूपच थट्टा केली. तिनें **नंदनाला** चांगलीं चांगलीं विशेषणें देऊन स्तुति केली; पण तींत कपट होतें. पर्यायमात्रानें—तुझा

भाऊ इतका मूर्ख आहे, असें तिनें **मदयंतिके**ला सुचविलें. तिचा अभिप्राय जाणून **मदयंतिका** म्हणाली, 'सखे **बुद्धरक्षिते**, ही **लवंगिका** काय बोलते पहा. आम्हीं देखील उलट अशी थट्टा करून बदला घेऊं. आम्हाला कांहीं बोलायला येत नाहीं असें नाहीं.'

यावर **बुद्धरक्षिता** म्हणाली, 'तूं याच्या उलट काय बोलणार? सुलटच बोल म्हणजे झालें.'

**मदयंतिका** म्हणाली,' तसें कां?'

यावर **बुद्धरक्षिता** म्हणाली, 'अग, **लवंगिका** बोलली तें कांहीं खोटें नव्हे. नवरा पायांवर पडला असून त्याचा स्त्रीनें जर लज्जेनें बहुमान केला नाहीं, तर त्याबद्दल तिला दोष देतां येत नाहीं. गडे **मदयंतिके**, नववधूला राजी केल्यावांचून तिच्या इच्छेविरुद्ध नवऱ्यानें कांहीं साहस करण्याला आरंभ केला, आणि त्यामुळें ती भ्याली, आणि तिच्या हातून कांहीं चूक झाली, तर त्याबद्दल रागावून तुझ्या भावानें भलभलतें बडबडायचें नव्हतें. कामसूत्रकार देखील असें म्हणतात कीं, तशा प्रसंगीं स्त्रीच्या हातून अपराध झाला तरी पतीनें त्याबद्दल तिला दोष लावूं नये.'

**बुद्धरक्षिते**नें मोघम शद्बांनीं सांगितलें, पण त्यावर डोळ्यांत पाणी आणून **लवंगिका** रागावल्यासारखी होऊन ह्मणाली, 'घरोघर पुरुष आहेत आणि ते कुलीन मुलींशीं विवाहही करून घेतात; पण असा बाई चमत्कार कोठें पाहिला नाहीं. लाजाळू स्वभावाची असून निरपराधी व कोमल मनाच्या मुलीला तिच्यावर आपली सत्ता आहे ह्मणून भलभलतें असंबद्ध बोलून तिला कोणी संताप देत नाहीं. नवऱ्याच्या तोंडचे हे शब्द कांहीं सामान्य ना-

हींत. शल्यासारखे मनाला टोंचत असून आमरण हृदयाला बोंचणारे, व पतिगृहांत राहण्याविषयीं त्यांच्या मनाला वैताग उत्पन्न करणारे, असे हे शब्द मोठे वाईट आहेत. असले प्रसंग येतात, ह्मणूनच मुली जन्मासच येऊं नयेत, असें त्यांचे आप्त देवाजवळ गाऱ्हाणें घालीत असतात !'

हें ऐकून **मदयंतिका लवंगिके**ला कांहीं बोलली नाहीं; पण **बुद्धरक्षिते**ला ह्मणाली, 'बाई **बुद्धरक्षिते**, या बोलण्यावरून प्रियसखी **लवंगिका** फारच दुःखित झाली आहे असें वाटतें. आणि यावरून माझ्या भावानें हिचा तसाच कांहीं मोठा अपराध होण्यासारखें भाषण केलें असेल, असें वाटतें.'

**बुद्धरक्षिते**ला पुढें काय बोलायचें तें माहीतच होतें. ती ह्मणाली, 'होहो ! तूं ह्मणतेस तसें असेल खरें. मी कांहीं प्रत्यक्ष ऐकलें नाहीं. तुझ्या भावानें—तिला ( **मालतीला** ) बालव्यभिचारिणी असें म्हटलें, व तुझ्याशीं मला कांहीं गरज नाहीं असेंही सांगितलें,— असें म्हणतात.'

हें ऐकून बिचाऱ्या भोळ्या **मदयंतिके**ला तें खरें वाटलें. ती कानांत बोटें घालून म्हणाली, 'बाई पुरे कर ! आतां नको सांगूं; माझ्यानें असें बोलणें ऐकवत देखील नाहीं. काय अमर्यादा आणि कायमूर्खपणा हा ! बाई **लवंगिके**, सांप्रत मला तोंड दाखविण्याची देखील लाज वाटते; पण मी आपलें मन घट्ट करून कशी तरी बोलतें.'

'आम्हीं तुझ्याच आहोंत. खुशाल हवें तें बोलेनास कां?' असें **लवंगिके**नें सांगितल्यावर **मदयंतिका** म्हणाली, 'आतां त्या गोष्टी असूं देत एकीकडे. माझ्या भावाचा दुष्ट स्वभाव एकीकडे ठेवून तो कसाही असला तरी

तुम्ही आतां त्याचा तिरस्कार करून उपयोग नाहीं. त्याच्या म ाप्रमाणेंच वागण्याविषयीं हिला ( **मालतीला** ) सांगितलें पाहिजे. कारण कसा झाला तरी तो नवरा आहे. दुसरें असें आहे कीं, त्यानें ( **नंदनानें** ) हा जो अगदीं हलकट शब्दानें हिचा अधिक्षेप केला त्याचें खरें कारण तुम्हांला ठाऊक नाहीं.'

**लवंगिका** ह्मणाली, ' बाई, पण तूं सांगितल्याशिवाय आह्मांला तें समजावें तरी कसें? तसें कांहीं योग्य कारण असलें तर आमचें कांहीं ह्मणणें नाहीं.'

**मदयंतिका** ह्मणाली, ' दुसरें कांहीं नाहीं. तो महानुभाव **माधव** त्याच्यावर हिचा ( **मालतीचा** ) कांहीं नक्षत्राचा योग होता, ही गोष्ट सर्व लोकांच्या तोंडीं जिकडे तिकडे पसरली आहे. त्याचाच हा सर्व प्रभाव आहे, आणि दुसरें काय! झाली ती गोष्ट झाली; पण गडे **लवंगिके**, नवऱ्याविषयीं हिच्या ( **मालतीच्या** ) मनांत जो कांहीं तिरस्कार उत्पन्न झाला असेल तो तिच्या मनांतून समूळ नाहींसा होईल, असा कांहीं तरी तुह्मी प्रयत्न करा. नाहींतर मोठा दोष लागेल, हें तुह्मांला माहीत असूंद्या. हंसत हंसत परपुरुषाकडे पाहण्याची संवय लागल्यामुळें निर्लज्ज झालेल्या मुली त्या वाईट खोडीनें आपल्या घरांतल्या माणसांच्या हृदयाला अतिशय दुःख देतात. पण बाई, ही गोष्ट तुह्मी आपल्या मनांतल्या मनांतच ठेवा. मी असें असें म्हणत होतें, म्हणून मात्र हिला ( **मालतीला** ) सांगूं नका. नाहींतर करवाल माझी चांगली तिच्याकडून!'

हें ऐकून **लवंगिका** ठांसून म्हणाली,' अग भाबडे, खोट्या लोकापवादाला मोहित होऊन असें म्हणतेस काय!

**मदयंतिका** तिचा हात धरून म्हणाली, "गडे, अशी रागावूं नकोस. माझें बोलणें तुला वाईट लागलें असेल, तर क्षमा कर. तुम्ही असें अस्पष्ट बोलून उगीच राहूं नका. दुसरें असें आहे कीं, **मालती**ला हें सारें जग **माधव**मय झालें आहे, असें खरोखर आम्ही जाणतों. नाहींतर जून झालेल्या केतकीच्या गाभ्यासारखें दिसणाऱ्या आपल्या कृश आणि दुर्बल, अशा सुंदर शरीराला धारण करणाऱ्या **माधवानें** आपल्या हातानें गुंफलेली बकुळीची माळ गळ्यांत धारण करून केवळ तिच्यावरच दृष्टि देऊन ज्यानें प्राण धारण केले आहेत, अशा **माधवा**च्या आणि **मालती**च्या शरीरावर सूर्योदयींच्या चंद्राप्रमाणें निस्तेजता दिसते, ती पाहून कोणाच्या मनांत तशी गोष्ट येणार नाहीं ? आणखी त्या दिवशीं कुसुमाकर उद्यानाच्या जवळच्या रस्त्यावर त्यांची गांठ पडली व टवटवीत दिसणाऱ्या नेत्रकमलांनीं तिनें ( **मालतीनें** ) विलासयुक्त व मोठ्या कौतुकानें त्याला अवलोकन केलें, त्यावेळीं मदनाच्या नाट्याचार्यत्वांतील सार ज्यांत भरलें आहे, असे ह्या दोघांचे कटाक्ष कसे होते, ते तूं पाहिले नाहींस का ? तसेंच माझ्या भावाला ही द्यायची, असा ठराव झाल्याचें वर्तमान ऐकून **माधवा**ची आणि हिची कशी अवस्था झाली, व दोघांचीं मुखकमलें एकाएकीं कशीं कोमेजलीं व यांच्या मनाची स्थिति काय झाली, तें तूं पाहिलें नाहींस का ! मग माझ्यावर डोळे कां लाल करतेस ? हो बरें झालें. मला आणखी एक गोष्ट आठवली."

हें ऐकून—दुसरें आणखी काय बाई आठवलें तुला? ऐकूंदे तरी एकदांचें, सगळें काय असेल तें सांग, असें **लवंगिकेनें** ह्मटल्यावरून **मदयंतिका** ह्मणाली, 'मलाच आठवलें ह्मणजे काय? तें त्वां देखील ऐकलेंच असेल. ज्यानें मला जिवंत केलें, त्या महानुभावाला मूर्च्छा आली होती. नंतर तो सावध झाल्याचें प्रिय वर्तमान **मालतीनें** सांगितलें. तेव्हां तेंच निमित्त धरून **कामंदकी**आईनें मोठ्या खुबीनें सूचना केली. तीवरून **माधवानें** तिला (**मालतीला**) आनंदकारक वर्तमान सांगितल्याबद्दल बक्षीस ह्मणून आपलें हृदय आणि प्राण हे आपणच तिला अर्पण केले हें तुला ठाऊक नाहीं काय? आणि तूंच त्यावेळीं—प्रियसखीला, हा लाभ मोठा इष्टच आहे, असें ह्मणाली नव्हतीस का?'

प्रसंगानें **मकरंदा**ची तिणें गोष्ट काढली, याचा **लवंगिके**ला फार आनंद झाला. सांप्रत दोघींचा जो कोटिक्रम चालला होता तो अगदीं निष्कारण होता, हें **लवंगिके**लाही ठाऊकच होतें; पण मुद्दाम तिणें तो चालविला होता. कारण, आपण होऊन **मकरंदा**ची गोष्ट काढण्यापेक्षां आपल्या आपणच तिणें काढलेली बरी, असें समजून ती तिच्याशीं बोलत होती. **मकरंदानें** वाघाच्या तडाक्यांतून तिला सोडविलें या गोष्टीला उद्देशून ती बोलत होती. **लवंगिके**ला **मकरंदा**ची आठवण नव्हती असें नाहीं. पण ती मुद्दाम न कळल्यावर घालून ह्मणाली, 'अग, तूं महाभाग ह्मणालीस तो कोण? मला कांहीं बाई त्याची आठवण होत नाहीं.'

**मदयंतिका** ह्मणाली, 'गडे, नीट आठव, नीट आठव. त्या दिवशीं विक्राळ अशा त्या दुष्ट श्वापद (वाघ) रूपी मृत्यूच्या हातांत सांपडलें असून, जिचें कोणी रक्षण करणारा नाहीं,

अशा मला त्या प्रसंगीं अकस्मात् तेथें येऊन ज्याणें वांचविलें, आणि ज्या विशालबाहूनें निष्कारण माझ्यावर स्नेह ठेवला त्याणें (**मकरंदानें**) सर्व लोकांत अप्रतिम सुंदर असा आपला देह वाघाच्या तोंडांत देण्याचें साहस करून माझें रक्षण केलें. आणखी ज्याणें, त्या वाघाचीं नखें लागून छातीवर निघालेल्या ओरबाड्यांची व्यथा सहन करून, त्या दुष्ट श्वापदाला मारून टाकिलें, त्याचें तुला स्मरण नाहीं ह्मणतेस तें कसें?'

हें ऐकून **लवंगिका** आठवलेंसें करून ह्मणाली, 'हो हो, तो **मकरंद** का?' **मकरंदाचें** नांव ऐकून आनंदानें–प्रियसखे, काय काय ह्मटलेंस? ह्मणून **मदयंतिकेनें** विचारलं. तेव्हां **लवंगिका** ह्मणाली, 'अग, दुसरें काय ह्मणणार? तो **मकरंद** असें ह्मटलें.'

पुनः **मकरंदाचें** नांव घेतल्यावरून **मदयंतिकेला** फारच आनंद झाला. **मकरंदावर** अनुरक्त असल्यामुळें तिच्या अंगावर आनंदानें रोमांच उभे राहिले, व तत्काल तिचें शरीर विकल झालें. ही तिची अवस्था पाहून **लवंगिकेला** पाहिजे होती तीच संधि मिळाला. **मालतीचा माधवावर** अनुराग आहे, याबद्दल ती तिला दोष देत होती. व **नंदनानें** कांहीं वेडें वांकडें भाषण केलें असलें, तरी त्याबद्दल राग न मानतां उभयतांचा समेट करण्याविषयीं प्रयत्न करा, ह्मणून ती मोठ्या पोक्तपणाचा आव घालून **लवंगिकेला** उपदेश करीत होती; त्याचा बदला घेण्याला **लवंगिकेला** ही चांगली संधि मिळाली. ती तिला मिठी मारून ह्मणाली, 'सखे, तूं हावेळपर्यंत जें सांगितलेंस तें सगळें खरें आहे. **मालतीचा माधवावर** अनुराग

आहे हें मला कबूल आहे; पण यावेळीं काय बोलावें तें मला सुचत नाहीं. गोष्टी बोलत असतां ही कुलीन कन्यका (**मदयंतिका**),एकाएकीं सर्व अंगावर रोमांच उभे राहिल्यामुळें, कदंबगोलासारखी दिसत असून विव्हळ झाली आहे, तेव्हां ही अगदीं निष्कलंक आहे असें ह्मणतां येईल का? मला बाई कांहीं बोलतां येत नाहीं, ह्मणून विचारिलें.'

हें ऐकून **मदयंतिका** अतिशय लाजली. हावेळपर्यंत **मालती**ला जो दोष ती लावीत होती, तोच–अर्थात् **मकरंदा**वर मन आसक्त आहे हा, तिच्याही अंगीं लागला. ती वरमल्यासारखी होऊन ह्मणाली, 'गडे **लवंगिके**, माझी अशी थट्टा कां बरें करतेस? मी तुला खरेंच सांगतें, आपल्या जिवावर उदार होऊन मृत्यूच्या दाढेंत सांपडलेल्या मला बलात्कारानें सोडवून घेण्याचा मोठा उपकार करणाऱ्या त्या मनुष्याचें (**मकरंदाचें**) सहज गोष्टीवरून केवळ नांव घेतलें, तरी देखील माझा आत्मा गार होतो. आणि गाढ प्रहाराच्या वेदना होऊन मूर्च्छित झालेला, व ज्याच्या सर्व अंगांतून घाम वहात होता, मोह आल्यामुळें ज्यानें डोळे झांकले होते, जमिनीवर टेकलेल्या तरवारीच्या आश्रयावर ज्यानें आपल्या शरीराचा भाग धारण केला होता, अशा त्याला तूं देखील पाहिलेंच आहेस. केवळ ह्या **मदयंतिके**करितांच ज्यानें आपल्या अमूल्य शरीरावर असें संकट ओढवून घेतलें, त्याचें विस्मरण कसें करावें?'

**मदयंतिके**च्या अंगाला यावेळीं दरदरून घाम सुटून ती थरथर कांपूं लागली. शरीरांत कामाचा संचार झाल्यावर जितके म्हणून कांहीं विकार होतात, तितके सारे झाले. तिची तशी अवस्था होणें हें **लवंगिके**ला इष्टच

होतें. पुढचा प्रसंग काढण्याला हीच संधि उत्तम आहे असें जाणून **बुद्धरक्षिता** म्हणाली, ' गडे **मदयंतिके**, तुझ्या शरीरानें तर त्या महाभागाचे ( **मकरंदाचे** ) उपकार फेडण्याचा यावेळीं पुरता निश्चय केला आहे असें वाटतें.'

हें ऐकून **मदयंतिका** फारच लाजून म्हणाली, 'गडे, जाजा येथून. असें भलतेंच बोलूं नकोस. तुझ्या विशेष सहवासावर विश्वास ठेवून मीं आपले उद्गार प्रकट केले, म्हणून तूं भलतेंच कांहीं तरी बोलूं नकोस.'

यांवर **लवंगिका** म्हणाली, 'सखे **मदयंतिके**, आम्हीं देखील जसें समजायचें तसेंच समजलों. तूं देखील उगीच रागावूं नकोस, आणि कांहीं तरी निमित्तानें उगीच **मकरंदावर** स्नेह आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करूं नकोस. आमच्या जवळ मन चोरून ठेवण्याचें काय कारण ? अगदीं मन मोकळें करून गोष्टी बोलूंया. पडदा ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं.'

**लवंगिकेच्या** ह्या भाषणाला **बुद्धरक्षितेनें**ही अनुमोदन दिलें. तेव्हां—सख्यांनों! मी तुमची बांधली गेलें आहे, ' असें **मदयंतिका** म्हणाली. त्यावर **लवंगिका** म्हणाली, असें खरेंना? तर मग आतांशीं तुझ्या शरीराची स्थिति कशी असते, व तुझा वेळ कसा जातो, तें सांग पाहूं.'

हें ऐकून **मदयंतिका** म्हणाली, 'सख्यांनों! तुमच्या पुढें माझें काय चालणार आहे. मी आपली सर्व हकीकत सांगतें ती ऐका. ह्या **बुद्धरक्षितेनें** वरचेवर मला त्याच्या ( **मकरंदाच्या** ) गोष्टी सांगितल्यांवरून माझा त्याच्यावर अतिशय पक्षपात व अनुराग झाला होता. तसेंच त्याच्या दर्शनाविषयीं माझें मन अतिशय उत्कंठित झालें होतें. नंतर दैवयोगानें त्याच्या दर्शनाचा लाभ

होऊन अनिवार मदनाच्या व्यथेनें पीडित झाल्यामुळें माझें जीवित संशयांत पडावें, अशी स्थिति मला प्राप्त झाली. सर्वांगांत मदनज्वराचा संचार होऊन त्याच्या आयासानें मी वांचतें कीं मरतें अशी होऊन माझ्या जिवलग मैत्रिणी माझ्या विषयीं अगदीं निराश झाल्या. तथापि ह्या बुद्धरक्षितेनें वरचेवर कांहीं गोष्टी सांगितल्या, त्यावरून आशा उत्पन्न होऊन हावेळपर्यंत कशीतरी जीवंत राहिलें आहें.'

'मला काय काय होतें, तें माझ्यानें सांगवत देखील नाहीं. त्याच्या समागमाचा विचार करीत असतां मला स्वप्नें पडतात, व त्यांत मी त्या पुरुषाचें अवलोकन करून मोहित होतें आणि तो मजकडे एकसारखा पहात आहे, असें वाटतें. तो येऊन, माझ्या कानांत—प्रिये मदयंतिके, ह्मणून मला हाक मारीत आहे असें वाटतें. माझ्या अंगावरच्या पदराला स्पर्श करून तो मला फार त्रास देतो आहे असें वाटतें. घटकेंत तो माझी थट्टा करितो असें वाटतें. पुनः कांहीं तरी दांडगेपणाची गोष्ट करण्याविषयीं तो माझीं आर्जवें करतो आहे असेंही वाटतें. याप्रमाणें स्वप्नांत अनेक प्रकारच्या सुखाचा अनुभव घेऊन जेव्हां मी चटकन् जागी होतें तेव्हां हें जग मला उजाड अरण्यासारखें वाटतें!'

यावर लवंगिका ह्मणाली, 'गडे मदयंतिके, अगदीं उघड काय तें सांग. तूं सांगितलीस तशी जेव्हां तुझी अवस्था होते, तेव्हां स्नेहयुक्त होऊन हंसत असणाऱ्या ह्या बुद्धरक्षितेनें डोळ्यांच्या खुणेनें दाखविलेलें व तुझ्या दासीलादेखील न कळविण्यासारखें आणि बिछान्याच्या वरच्या पलंगपोसानें दडविण्यासारखें असें तुला कांहीं होतें कीं नाहीं, तें सांग. आतां उगीच चोरूं नकोस.'

मदयंतिकेला ही तिची थट्टा फारच आहे असें वाटलें. ती लवंगिकेला ह्मणाली, 'चल! भलतेंच कांहीं तरी बोलून थट्टा करतेस. मला हें नाहीं असलें आवडत.'

बुद्धरक्षिता ह्मणाली, 'सखे मदयंतिके, ही लवंगिका मालतीची प्रियसखी आहे. मालती कशी आहे, त्याचें तूं वर्णन केलेंच आहेस. तेव्हां हिला असेंच बोलायला कळतें.'

मदयंतिकेनें मालती निर्लज्ज आहे असें उघड ह्मटलें नाहीं, तरी पर्यायानें तिनें तसेंच ठरविलें होतें; ह्मणून बुद्धरक्षितेनें तिला असा टोला दिला. पण मदयंतिका यावेळीं चांगली शुद्धीवर आली होती. ती ह्मणाली, 'गडे, तसें ह्मणूं नको. मालतीची अशी थट्टा करणें चांगलें नाहीं.'

मकरंदाविषयीं गोष्ट काढण्याला ही संधि चांगली आहे असें पाहून बुद्धरक्षिता ह्मणाली, 'गडे मदयंतिके, मला कांहीं गोष्ट सांगावी, असें वाटतें; पण तूं विश्वासघात न करशील तर सांगेन.'

मदयंतिका म्हणाली, बुद्धरक्षिते, मी यापूर्वी तुझें सांगणें कधीं मोडलें, असें तुला आठवतें का? म्हणून तूं असें म्हणतेस. खरोखर माझ्यानें अधिक कांहीं बोलवत नाहीं. ही लवंगिका आणि तूं ह्या दोघीही सांप्रत केवळ माझें हृदयच झालां आहां.'

बुद्धरक्षिता म्हणाली, 'असें असेल तर मी विचारतें त्याचें नीट उत्तर दे. यावेळीं तो तुझा हृदयवल्लभ— नाहीं नाहीं जीवदान देणारा मकरंद, तुझ्या दृष्टीस पडेल तर तूं काय करशील?'

हें ऐकून मदयंतिका आनंदानें म्हणाली, 'बाई, दुसरें

माझ्या हातानें काय होणार आहे? त्यांच्या प्रत्येक अवयवावर एकसारखी फारवेळ दृष्टि लावून आपल्या डोळ्यांचें पारणें फेडून घेईन; आणखीं काय!'

**बुद्धरक्षितेला** चोरून विवाह करून घेण्याविषयीं **मदयंतिके**ला तयार करायची होती, म्हणून ती ह्मणाली, 'गडे, हें तर झालेंच. तूं डोळेभर त्याला पाहशील; पण त्यानें (**मकरंदानें**) कामाच्या आवेशांत मन्मथ उत्पन्न करणाऱ्या तुला—जशी **कृष्णानें रुक्मिणी**ला बलात्कारानें बायको करून घेतली, तशी—आपली स्त्री करून घेतली तर मग तूं काय करशील?'

**मदयंतिके**ला तसें होणें इष्टच वाटत होतें; पण तसा योग येण्याचा संभव नाहीं, असें वाटल्यावरून ती सुस्कारा टाकून ह्मणाली, 'असें बोलून उगीच माझ्या मनाची समजूत कशाला करतेस?'

आपल्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं असें समजून **बुद्धरक्षिता** ह्मणाली, 'गडे, खरेंच सांग काय करशील तें.' **मदयंतिके**चा अभिप्राय समजून—अग, विचारतेस काय? हृदयांतलें दुःख सुचविणारा सुस्कारा टाकून तिणें आपला हेतु कळविलाच आहे, कीं—तसें झालें तर आपल्याला फार आनंद होईल, मग आणखी विचारायचें तें काय,—असें **लवंगिके**नें उत्तर दिलें.

**मदयंतिका** ह्मणाली, 'सख्यांनो! तुह्मी उगींच असें कशाला बोलतां? आपल्या शरीराचा पण लावून त्यानें मला वाघाच्या तोंडांतून सोडवून घेतलें, तेव्हांपासून हें शरीर त्याचेंच आहे. तेव्हां आतां मीं तेंच त्याला अर्पण करणारी कोण!'

यावर **लवंगिका** ह्मणाली, 'शाबास! मोठेपणाला योग्य असेंच बोललीस.'

यावर **बुद्धरक्षिता** म्हणाली, 'सखे **मदयंतिके**, यावेळेस तूं काय बोलली आहेस, त्याची नीट आठवण ठेव हां.' असें सांगून तिनें जवळच झोंपेचें मिष करून पडलेल्या **मकरंदाला** हातानें चाळवलें.

**मकरंद** येथेंच असून **बुद्धरक्षिता** आणि **लवंगिका** यांणीं सांगितल्याप्रमाणें आतांच तो प्रसंग येणार, असें समजतांच ती दचकल्यासारखी झाली. **मकरंद** तेथेंच होता, हें तिला हावेळपर्यंत ठाऊक नव्हतें, ह्मणून ती मन मोकळें करून बोलत होती. तरुण मुली, त्यांच्या मनांत ज्याला वरायचें असेल, त्याच्याविषयीं पुष्कळ गोष्टी बोलतात; पण प्रत्यक्ष तो प्रसंग आला, ह्मणजे त्यांला तितकें धैर्य होत नाहीं. **मदयंतिका** तेथून निसटून जाण्याच्या बेतांतच होती, इतक्यांत दुसऱ्या प्रहराचा नगाराही वाजला. तो ऐकून ती ह्मणाली, 'अग बाई! हा दुसऱ्या प्रहराचा नगारा वाजतो आहे. तर आतां मी जातें, आणि दादाची ( **नंदनाची** ) खूप निर्भर्त्सना करून **मालतीच्या** पायां पडून तिचें समाधान करण्याविषयीं त्याला अनुकूल करून घेतें.'

**मदयंतिका** असें बोलून जायाला निघाली, इतक्यांत हळूच तोंडावरचा बुरखा काढून तिचा हात धरून **मकरंदानें** तिला ओढून धरलें. यावेळीं **मकरंदानें** **मालतीचा** वेष घेतला होता, तेव्हां **मालती** जागी होऊन तिनें आपला हात धरला असें समजून **मदयंतिका** म्हणाली, 'गडे **मालती**, तूं जागी झालीस?'

तिणें असें ह्मटलें खरें; पण नीट पाहिल्यावर ही **मालती** नव्हे, असें तिला वाटलें, व चकित होऊन— अग बाई ! हें दुसरेंच कांहीं तरी आहे, **मालती** नव्हे, असें बोलून ती घाबरली.

इतक्यांत **मकरंद** उठून उभा राहून तिचे दोन्ही हात धरून ह्मणाला, 'अग रंभोरू प्रिये **मदयंतिके**, भिऊं नकोस. तुझ्या अंगांत कांपरें सुटलें आहे, त्याच्या योगानें हा तुझा अवजड शरीराचा वरचा भाग ह्या अत्यंत बारीक कंबरेच्यानें धारण करवत नाहीं. ज्याच्या प्रेमाचें व ज्याच्यावर केलेल्या प्रसादाचें हावेळपर्यंत तूंच वर्णन केलेंस, तो हा तुझा दास तुझ्या सेवेंत राहण्याला तयार आहे.'

उभयतांचा विवाह होण्याला मुख्य कायती प्रीति असावी लागते. ती तर परस्परांची परस्परांवर पूर्वींच झाली होती. आतां कायतो लग्नविधि व्हायचा राहिला होता ; पण तें काम **मदयंतिका** स्वतः करूं शकणार नाहीं, असें समजून **बुद्धरक्षिता** तिचें तोंड वर करून ह्मणाली, ' सखे **मदयंतिके**, तुला अत्यंत प्रिय असून अनेक मनोरथ करून तूं ज्याला वरलेंस, तो हा तुझा हृदयवल्लभ **मकरंद**.' असें बोलून **मदयंतिके**चा हात **मकरंदा**च्या हातांत दिला आणि ह्मणाली, ' झालें ; तुम्हां दोघांचें लग्न झालें. हें अमात्य **भूरिवसू**चें घर आहे. यावेळीं झाडून सारे लोक जिकडे तिकडे घोरत पडले आहेत. जिकडे तिकडे अंधार पसरला आहे. तर आतां येथें राहूं नका. पैंजण हातांत काढून घेऊन हळूच कोणाला न कळतां आपण येथून जाऊंया.'

**मालतीनें** चोरून **माधवाशीं** विवाह लावला, हें **मदयंतिके**ला मुळींच ठाऊक नव्हतें. **मालती** गेली तिकडे जायाचें असें **बुद्धरक्षितेनें** म्हटलें, त्यावरून——**मालतीनें** तें साहस ( लग्न ) केलें काय ? म्हणून तिनें विचारिलें. त्यावर **बुद्धरक्षितेनें** होय म्हणून सांगितलें.

नंतर **बुद्धरक्षिता** म्हणाली, ‘ सखे **मदयंतिके**, आपलें शरीर अर्पण करणारी मी कोण ? असें तूं म्हटलेंस. यावरून तूं आपलें शरीर अर्पण केलेंस असेंच झालें. तेव्हां आणखी तुझ्या तोंडांतून तशीं अक्षरें निघालींच पाहिजेत असें कांहीं नाहीं.’ **मकरंदाला** म्हणाली, ‘ महाभागा, ही आमची प्रियसखी **मदयंतिका** हिणें आपलें शरीर तुला अर्पण केलें असें समज.’

**मकरंद** म्हणाला, ‘ आज मी सर्व कांहीं जिंकलें. माझें तारुण्य सफल होऊन मला मोठा आनंद झाला. मजवर भगवान् मदन प्रसन्न होऊन त्याणें, बांधवांनीं करायचें काम, तें आपणच पतकरून हें रत्न मला अर्पण केलें, त्याचा मला फार आनंद झाला. पण आतां फार वेळ लावून उपयोग नाहीं. लवकर हळूच येथून खालीं उतरून दिंडीच्या वाटेनें बाहेर पडून पुढचा बेत साधला पाहिजे.’ असें पाहून **मकरंद**, **बुद्धरक्षिता**, आणि **मदयंतिका** हीं तिघेंही हळूच बाहेर निघालीं.

मध्य रात्रीची वेळ असून जिकडे तिकडे सामसूम झालें होतें. तो शांत रमणीय देखावा पाहून **मकरंद** उत्कंठित होऊन ह्मणाला, ‘आहाहा ! यावेळीं हा राजमार्ग किती रमणीय दिसत आहे पहा. हा वायु उंच उंच राजबंगल्यावर संचार करून व तेथील सुरेच्या सुवासानें व्याप्त

होऊन आसपासच्या सुगंधिक फुलांच्या वासानें मनोहर असा होत्साता तरुण स्त्रीपुरुषांला एकमेकांच्या समागमाविषयीं उत्कंठित करीत आहे.'

---

# प्रकरण आठवें.

पूर्वप्रकरणांत सांगितल्याप्रमाणें **नंदनाला** फसविण्याकरितां **मालतीचा** वेष घेतलेल्या **मकरंदानें मदयंतिकेशीं** विवाह केला आणि तिला घेऊन, **मालती** आणि **माधव कामंदकीच्या** मठाच्या जवळच्या बागेंत होतीं, तिकडे जाण्यास निघाला. आतां **मालतीसहवर्तमान माधव** शंकराच्या मंदिरांतून **कामंदकीच्या** मठाजवळच्या बागेंत गेला. त्याच्याकडे जाऊन **कामंदकी, मालतीशीं** भांडून गेलेल्या **नंदनाची** समजूत करण्याकरितां मुद्दाम त्याच्या घराकडे गेली होती. तिनें सांगितलेल्या कामाचें काय झालें तें तिला कळविण्याकरितां **अवलोकिता** तिकडे जात होती. तिला **नंदनाच्या** घराहून परत येत असतां मध्येंच **अवलोकिता** भेटली, आणि तिणें जें कांहीं सांगावयाचें होतें तें सांगितलें. **माधव** आणि **मालती** तिकडे गेलीं आहेत, त्यांच्या जवळ ऐस, असें सांगितल्यावरून **अवलोकिता** परत मठाकडे आली, आणि तेथें कांहीं व्यवस्था करावयाची ती करून मागच्या बाजूला बागेंत **माधव** आणि **मालती** यांना भेटण्याकरितां तिकडे गेली.

इकडे या उभयतांनीं, उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें अंगाला घाम सुटला होता, व पुष्कळ श्रम झाले होते, त्या-

चा परिहार करण्याकरितां बागेंतल्या तळींत यथेच्छ जलक्रीडा केली. इतक्यांत **अवलोकिता**ही तेथें आली.

**माधव** त्या मध्य रात्रीच्या समयाची शोभा अवलोकन करून आनंदानें ह्मणाला, 'मदनाचा प्रियमित्र असा हा रात्रीचा मध्यकाल यावेळीं भर ज्वानींत असून त्याची शोभा फार चांगली दिसते. सुकलेल्या ताडाच्या पानांसारखा पांढरा दिसणाऱ्या व नुकताच उदय पावणाऱ्या चंद्राचा हा प्रकाश अंधाराच्या समुदायाचा नाश करीत आहे. तसाच वाऱ्याच्या जोरानें उडालेल्या केतकीच्या दाट परागाप्रमाणें हा चंद्राचा प्रकाश हळू हळू सर्वत्र प्रसार पावत आहे.'

**माधवा**नें याप्रमाणें बराच वळ त्या समयाचें अनेक प्रकारांनीं वर्णन केलें. त्याच्या मनांत **मालतीनें** खुष होऊन कांहीं तरीं बोलावें असें होतें; पण तिणें त्याकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. ती दुःखित होऊन रागानें फुगल्यासारखी खालीं मान घालून एकीकडे उभी होती. तिला आलीकडे येण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला; पण ती येईना. तेव्हां—हिला कशी प्रसन्न करून घ्यावी, याचा **माधवा**ला मोठा विचार पडला. वस्तुतः तिला दुःखित होण्याचें कारण निराळेंच होतें, तरी ती आपल्यावरच रागावली आहे, असें समजून **माधव** ह्मणाला—

'प्रिये **मालती**, तूं स्नान करून अम्मळ थंड झाली आहेस; ह्मणून मला पुनः ताप न होण्याविषयीं ही विज्ञापना करितों. विनाकारण तूं दुःखित झाल्यासारखी कां दिसतेस? प्रिये, जोंपर्यंत तुझ्या भिजलेल्या केंसांतून पाण्याचे थेंब घरळून जाऊन खालीं पडत आहेत, जोंपर्यंत स्तनकलशांचा ओलेपणा गेला नाहीं, व जोंपर्यंत

अंगावर सारखे रोमांच उठले आहेत, तोंपर्यंत एकवेळ प्रसन्न होऊन मला आलिंगन दे!'

'अग **मालती**, किंचित् भयभित झाल्यामुळें ज्याच्यावर थोडे थोडे घामाचे बिंदु उठले आहेत, असा—चंद्राच्या किरणांनीं स्पर्श केलेल्या चंद्रकांत मण्याच्या हाराप्रमाणें शीतल तो तुझा बाहु माझ्या खांद्यावर टाक.'

पुनः ह्मणाला, 'असो. तें तर दूरच आहे; पण नुसते दोन शब्द बोलण्याची देणगी देण्याला देखील मी तुला अयोग्य कसा वाटतों! प्रिये, ह्या चंद्राच्या किरणांनीं फार वेळ माझें अंग अगदीं जाळून टाकलें; पण तूं तुझें शीतल आलिंगन देऊन अद्याप त्याला कां शांत करीत नाहींस? बरें, तेंही असो. पण कोकिळाच्या मधुर शब्दासारखी मनोहर अशी तुझी वाणी ऐकण्याचा तरी माझ्या कानाला लाभ होऊं दे!'

**माधवानें** याप्रमाणें तिच्या अनेक प्रकारें विनवण्या केल्या, तरी **मालती** मुळींच कांहीं बोलली नाहीं. ती तोंड रडवें करून एका बाजूला उभी राहिली आहे, असें पाहून **अवलोकिता** ह्मणाली, 'अग अधीरे, तूं हा **माधव** घटकाभर कोठें दृष्टीस पडला नाहीं तर घाबरी होऊन—आर्यपुत्रानें फार वेळ लावला; बाई, आतां पुनः कधीं स्वस्थपणें त्यांच्याकडे पाहायला मिळेल, कोणास ठाऊक; आतां पुनः भेट झाली ह्मणजे—घट्ट आलिंगन देऊन मला संतुष्ट करा, असें सांगेन, अशी तूं माझ्याजवळ बोलत होतीस. त्या तुझा असा परिणाम झाला हें मोठें आश्चर्य आहे. एवढा वेळ तो प्रार्थना करीत असून त्याच्याकडे पहात देखील नाहींस, याचें मला मोठें नवल वाटतें!'

**अवलोकितेचें** हें भाषण ऐकून **मालतीनें** तिच्याकडे असूयापूर्वक पाहिलें. तेव्हां **माधव** आपल्याशींच ह्मणाला, एकून **कामंदकी**आईची शिष्यीण ही **अवलोकिता** मोठी चतुर आहे खरी. हिनें मोठें चटका लागण्यासारखें भाषण करून स्वारीची ( **मालती**ची ) दृष्टि अम्मळ वर करविली खरी. **मालती**ला ह्मणाला, '**अवलोकिता** ठीक बोलली.'

यावर देखील **मालतीनें** कांहीं उत्तर तर दिलें नाहींच; पण मान मात्र हालविली. इतक्यांत **माधव** तिच्याजवळ जाऊन ह्मणाला, 'तुला माझ्या गळ्याची शपथ आहे, आणि ह्या **लवंगिका** व **अवलोकिता** यांच्याही प्राणांची शपथ आहे. काय तें उघड सांग. आह्मांला कांहीं असल्या खुणाबिणा कळत नाहींत.'

याप्रमाणें **माधवानें** शपथा घातल्या तेव्हां ह्मणाली, 'मला नाहीं कांहीं एक ठाऊक!' पुढें कांहीं बोलणार होती, पण इतक्यांत लाजली. यावर **माधव**—अद्याप मतलब पुरा बाहेर पडलाच नाहीं, तरी हें भाषण किती गोड आहे; अशी त्याची तारीफ करून **मालतीच्या** डोळ्यांतून अश्रुपात होत आहे, असें पाहून **अवलोकितेला** ह्मणाला, 'अग **अवलोकिते**, हें काय तें पहा!'

'ह्या कमलनयनेचा स्वतःच स्वच्छ असाही गाल अश्रूंच्या उदकानें धुतला जात आहे. या वेळीं हें हिचें मुख कांतिरूप अमृत—गाल भरभरून पिण्याविषयीं प्रवृत्त झालेल्या चंद्रानें, तें ओढून घेण्याकरितां कमळाचा दंड लावला आहे कीं काय असें वाटतें.'

**मालती** रडत आहे असें पाहून **अवलोकिता** तिला

ह्मणाली, 'खांदे वरचेवर उचलले जात आहेत, अशा रीतीनें तूं या वेळीं इतकी रडतेस हें कां तें सांग.'

याप्रमाणें दोघांनीं अगदीं पाठ पुरविल्यासारखें केलें तेव्हां **मालती** रडें सांवरून ह्मणाली, 'गडे **अवलोकिते**, प्रियसखी **लवंगिका** जवळ नसल्यामुळें होत असलेल्या दुःखाचा असा आणखी किती वेळ मला अनुभव घेतला पाहिजे? ती कोठें आहे हें देखील कळत नाहीं!'

**मालतीनें** आपल्या दुःखाचें कारण काय तें **अवलोकिते**-ला सांगितलें. पण तें अडखळत अडखळत व हळूच सांगितल्यामुळें **माधवाला** नीट समजलें नाहीं. ह्मणून त्यानें **अवलोकितेला**—ती काय ह्मणते? ह्मणून विचारिलें.

**अवलोकिता** म्हणाली, 'दुसरें कांहीं नाहीं. तिच्या रड्याला कारण तूंच आहेस. तिची प्रियसखी **लवंगिका** इतका वेळ झाला तरी इकडे आली नाहीं, आणि त्यांतून तूं तिचें नांव घेऊन तिच्या गळ्याची शपथ घातलीस; तेव्हां तिची आठवण होऊन ही फार दुःखित झाली दुसरें काय?'

**माधव** ह्मणाला, 'मग याविषयीं मी देखील कांहीं बेफिकीर राहिलों नाहीं. आतांच मी **कलहंसकाला** तिकडे पाठविलें असून **नंदन** ज्या महालांत निजला होता, तिकडची काय खबर आहे, ती युक्तीनें काढून घेण्यास सांगितलें आहे.'

नंतर **मकरंदाच्या** लग्नाची आठवण होऊन आशेनें **अवलोकितेला** ह्मणाला, 'सखे **अवलोकिते**, **बुद्धरक्षितेच्या** प्रयत्नाला चांगलें फळ येऊन **मदयंतिकेच्या** लाभानें माझा प्रियमित्र **मकरंद** कृतार्थ होईल का? तुला कसें वाटतें बरें?'

**अवलोकिता** ह्मणाली, ' महानुभावा, याविषयीं तुला काय संदेह वाटतो? महाभागा, त्या दिवशींच वाघाचीं नखें लागून तो मूर्च्छित पडला होता, आणि नंतर सावध झाला; तेव्हां तें वर्तमान सांगणाऱ्या ह्या **मालती**ला भगवतीच्या आज्ञेनें जसें तूं आपलें हृदय आणि प्राण बक्षीस केलेस, तसेंच यावेळीं तुझा मित्र **मकरंद** ह्याला **मदयंतिके**चा लाभ झाल्याचें वर्तमान सांगून कोणीं खूष करील, तर तूं त्याला काय बक्षीस देशील तें सांग.'

हें ऐकून तिचा अभिप्राय जाणून **माधव** ह्मणाला, ' ठीक चांगलें विचारलेंस.' आपल्या हृदयाकडे पाहून म्हणाला, ' ह्या **मालती**चें अगदीं पहिल्या प्रथम दर्शन होऊन मन हिच्यावर आसक्त झालें, त्या वेळची साक्ष देणारी ही बकुळीची माळ माझ्या गळ्यांत आहे. आणि ही स्वतः मी गुंफली आहे म्हणून आवडीनें हिची सखी **लवंगिका** हिणें माझ्याकडून मुद्दाम मागून नेली, व विस्तार पावणाऱ्या स्तनकलशांवर धारण करून हिनें जिचा सत्कार केला, व पाणिग्रहणाच्या वेळीं आपली सखी **लवंगिका**च असें समजून हिणें जसा एखादा ठेवा अर्पण करावा, तशी ही पुनः माझ्या गळ्यांत घातली.'

हें ऐकून **अवलोकिता** म्हणाली, ' गडे **मालती**, ही बकुळीची माळ तुझ्या फार आवडीची आहे. आणि प्रिय निवेदन करणाऱ्याला ही बक्षीस देण्याला हा तयार झाला आहे; तर तूं मोठी सावध रहा. ही दुसऱ्या कोणाच्या हातीं न जाईल अशी तजवीज कर.' यावर **मालती** ह्मणाली, ' चांगलें सांगितलेंस. मला जें पाहिजे तेंच तूं बोललीस.'

इतक्यांत **माधवानें** पाठविलेला **कलहंसक** लवकर लवकर तिकडची खबर घेऊन **माधवाकडे** येत होता, त्याचीं पावलें ऐकून हा कोण आला असा विचार करतात, इतक्यांत तो दिसला. त्याची आनंदित मुद्रा पाहून **मालती माधवाला** म्हणाली, ' **मदयंतिकेचा** लाभ झाला असें वाटतें.'

हें ऐकून **माधव** आनंदानें तिला आलिंगन देऊन—हें मोठें प्रियकारक वर्तमान सांगितलेंस म्हणून तुला हें बक्षिस देतों असें बोलून आपल्या गळ्यांतली बकुळीची माळ त्याणें **मालतीच्या** गळ्यांत घातली.

**अवलोकिता** ह्मणाली, ' भगवति **कामदंकी**आईची मसलत **बुद्धरक्षितेनें** पुरी पाडली, असें वाटतें.' यांचा असा संवाद चालला आहे इतक्यांत **कलहंसक**, **लवंगिका** आणि **बुद्धरक्षिता** हीं घाबरीं होऊन लौकर तेथें आलीं. **लवंगिके**ला पाहून **मालतीला** फार संतोष झाला.

**मकरंद** हा **लवंगिका**, **बुद्धरक्षिता**, आणि आपली प्रिया **मदयंतिका** ह्या तिघींला बरोबर घेऊन **माधवा**कडे यायला निघाला होता, हें वर सांगितलेंच आहे; पण त्याला वाटेंत एक विघ्न उपस्थित झालें. अपरात्रीं बायका बरोबर घेऊन तो गावांबाहेर जात होता. त्याणें **मालतीचा** वेष घेतला होता हें वर सांगितलेंच आहे. त्यावरून जरी तो पुरुष होता, तरीं शहरांत गस्त घालणाऱ्या शिपायांला त्या चारही बायकाच आहेत, असें वाटलें. अपरात्रीं त्या शहराच्या बाहेर जात आहेत, तेव्हां यांत कांहीं तरी निराळा हेतु असावा, असा संशय आल्यावरून त्या लोकांनीं त्यांना अटकाव केला. **मकरंदानें** आपण पुरुष आहों याची

ओळख न देतां, सामोपचारानें त्यांच्याकडून मोकळिक मिळण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला, पण ते कांहीं केल्या ऐकेनात. ते अधिकच धमकावूं लागले, तेव्हां आतां त्यांचा चांगला समाचार घ्यावा, असें **मकरंदा**च्या मनांत आलें; पण बरोबर तिघी बायका होत्या. आपण इकडे यांच्याशीं लढूं लागलों तर ह्या स्त्रियांचें रक्षण कोण करील, याचा त्याला मोठा विचार पडला होता.

इतक्यांत **माधवानें** त्याच्या समाचाराला पाठविलेला **कलहंसक** त्याला भेटला. **कलहंसका**ला पाहतांच—**मदयंतिका** वगैरे तिघी स्त्रियांला—लवकर **माधवा**कडे घेऊन जा, आपण ह्या गस्तवाल्यांचा समाचार घेऊन पाठोपाठ येतों असें सांगून तो त्या गस्तवाल्यांशीं लढूं लागला. यावेळीं तो रंगमहालांतून आला होता, व त्याणें स्त्रीवेष घेतला होता, तरीं त्याचीं शस्त्रें त्याच्याजवळच होतीं.

त्यानें झट्कन **मालती**चा वेष टाकून दिला. तो भरगच्ची पैठणी नेसला होता तरी त्याच्या आंत त्याचें धोतर होतेंच, त्यामुळें वेष बदलण्याला त्याला फारसें कठीण पडलें नाहीं.

**कलहंसक, लवंगिका, मदयंतिका,** आणि **बुद्धरक्षिता** हीं घाबरींघुबरीं होऊन **माधवा**कडे येण्याचें कारण हेंच कीं, एकटा **मकरंद** त्यांच्याशीं लढत असून शिपाईलोकांचा जमाव फार मोठा आहे. काय होईल कोणास ठाऊक ? असें त्यांला भय पडलें होतें. **लवंगिका** पुढें होऊन **माधवा**ला ह्मणाली, 'महाभागा, आपल्या मित्राचा बचाव कर! अर्ध्या वाटेंत शहराचें रक्षण करणाऱ्या लोकांशीं **मकरंदा**चें युद्ध जुंपलें आहे त्याला लवकर साह्य कर!'

**कलहंसक** ह्मणाला, 'ते शिपाईलोक थोडेसे असते

तर कांहीं काळजी नव्हती; पण आम्ही अम्मळ पुढें स-रलों तों मागें मोठा कलकलाट ऐकूं आला. यावरून त्या शिपायांला आणखीही पुष्कळ मदत येऊन पोहोंचली असेल असें वाटतें.'

**माधव, मालती,** व **अवलोकिता** हीं इकडे मोठ्या आ-नंदांत असून आपआपल्या संबंधाप्रमाणें त्यांचे येणाऱ्या मंडळीविषयीं अनेक मनोरथ चालले असून तीं फार उमेदींत होतीं; पण **मकरंदाची** लढाई जुंपली हा म-ध्येंच एक अनर्थ उत्पन्न झाला. **मालती** आणि **अवलोकिता** ह्मणाल्या, ' अरेरे! हर्ष आणि उद्वेग होण्याला कारणें ए-काच वेळीं प्राप्त झालीं. **मदयंतिकेची** प्राप्ति झाल्यानें आनंद झाला खरा; पण हें कलहाचें वर्तमान ऐकून तितकाच उद्वेगही झाला!'

**मकरंदाच्या** संबंधानें इतरांपेक्षां **मदयंतिकेला** अधिक दुःख व काळजी लागणें साहजिकच होतें. लग्न होऊन पुरत्या चार घटका देखील झाल्या नाहींत, इतक्यांत आ-पल्या प्रिय पतीवर असें संकट आलें, हें पाहून ती विशेष अस्वस्थ होईल, ह्मणून **माधवानें** तिचें समाधान केलें.

तो ह्मणाला, ' सखे **मदयंतिके**, तुझें स्वागत असो. आज तूं आमच्यावर मोठा अनुग्रह केलास ! त्याच्याविषयीं ( **मकरंदाविषयीं** ) तूं इतकी घाबरलीस कां ? ज्यानें वाघावर चाल केली होती तोच तो. तो एकटा असून पुष्कळांशीं लढाई जुंपली आहे, यांत फारसें कांहीं नाहीं. भयंकर हत्तींशीं किंवा त्याच्या कळपाशीं लढणाऱ्या अतुल परा-क्रमी सिंहाला—शेंकडों हत्तींचीं गंडस्थळें फोडण्याला स-मर्थ असा त्याचा हातच त्याला साह्य करणारा बस्स होतो.

असें आहे तरी मीही त्या प्रिय मित्र **मकरंदा**ला साह्य करण्यास्तव हा निघालोंच. तूं अस्वस्थ होऊं नकोस.' असें सांगून **कलहंसका**ला बरोबर घेऊन **माधव मकरंदा**कडे जाण्यास निघाला.

त्यावेळीं **अवलोकिता, लवंगिका** आणि **बुद्धरक्षिता** ह्मणाल्या, 'आई जगदंबे! ह्या दोघांलाही (**माधव** आणि **मकरंद** यांला) सुखरूपपणें परत आण.'

**मालती** चिंताक्रांत होऊन **अवलोकिता** आणि **बुद्धरक्षिता** यांना ह्मणाली, 'बायांनों, लवकर जाऊन हें वर्तमान **कामंदकी**आईला कळवा.'

**माधवा**ला **मालती** किती प्रिय होती, या विषयीं कांहीं सांगावयास नको; पण यावेळीं त्याणें तिच्याकडे पाहिलें देखील नाहीं. तिचा निरोप घेऊन जाणें हें अशक्य असल्यावरून तो घाईघाईनें तसाच निघून गेला. ह्मणून **मालतीनें लवंगिके**ला—जर आमच्यावर तुह्माला दया करायची असेल तर मेहेरबानी करून मोठ्या हुषारीनें वागा,—असा निरोप सांगून **माधवाकडे** पाठविलें.

याप्रमाणें **लवंगिका, बुद्धरक्षिता,** आणि **अवलोकिता** ह्या तिघीही आपआपल्या कामास गेल्या. इकडे **मालती** आणि **मदयंतिका** ह्या दोघीच राहिल्या होत्या. दोघीही आपआपल्या पतीची काळजी करीत असल्यामुळें त्यांला चैन पडेनासें झालें. **मालती** ह्मणाली, 'काय करावें बाई! आतां ही वेळ कशी घालवावी, हेंदेखील सुचत नाहीं. माझें तर कोणीकडेच लक्ष्य लागत नाहीं. आतां **लवंगिका** तिकडे निरोप सांगायला गेली आहे ती परत येण्याची वाट पहात बसलें आहें.'

इतक्यांत तिचा उजवा डोळा लवूं लागला. हें काय दुश्चिन्ह आहे, तें तिला समजलें नाहीं. आधींच ती काळजींत होती, आणि त्यांत हें दुश्चिन्ह झालें यामुळें फारच घाबरली. मध्येंच—हे आर्यपुत्रा, ह्मणून तिणें **माधवाला** मोठ्यानें हांक मारली; पण पुनः आपल्याच ठिकाणीं लाजून जीभ दाबून धरल्यासारखी करून बसली. **माधवानें** **अघोरघंटा**ला मारल्यामुळें त्याची शिष्यीण **कपालकुंडलाही** त्याचा सूड घेण्याकरितां **मालतीचा** घात करण्याविषयीं टपून बसली होती, हें पूर्वी सांगितलेंच आहे. ती मंत्रसामर्थ्यानें त्याच बागेंत दडून बसली होती. **मालती** एकटी मिळेल आणि आपण तिला घेऊन जाईन असा तिचा इरादा होता. त्याप्रमाणें तिला यावेळीं संधि मिळाली.

**मालतीजवळ** **मदयंतिका** होती; तरी तिचेंही चित्त ठिकाणावर नव्हतें. आपण **लवंगिके**ची वाट पहात बसलें आहें, असें **मालतीनें** ह्मटलें तेव्हां **मदयंतिका** तिला तेथेंच सोडून अम्मळ तिच्यापुढें गेली, यामुळें **कपालकुंडलेला** चांगली सवड मिळाली. **मालतीनें** **माधवाला** हांक मारली ती ऐकून **कपालकुंडला** दांतओंठ खाऊन आपल्याशीं ह्मणाली, अग कार्टे! थांब. आलें तुझा समाचार घ्यायला. रागानें हंसून ह्मणाली, त्या मेल्याच्या नांवानें ओरडतेस काय? खुशाल ओरड. तपस्विजनांला मारणारा आणि कन्येचा जारपति, तुझा तो प्रियकर चांडाळ ( **माधव** ) कोठें गेला तो पहा. आतां तो तुझें रक्षण करूंदे. मेला कसें करतो तें पाहीन. ससाण्याच्या झडपीनें चकित झालेल्या बगळीणीसारखी इकडे तिकडे काय पहातेस? मी आतां तुला खाऊन टा-

कलें असें समज. आतां **श्रीपर्वतावर** नेऊन तुझे तिळा तिळाएवढे तुकडे करून टाकतें. असें बोलून **कपालकुंडलेनें** घारीसारखी झडप घालून **मालतीला** आकाशांत उचलून नेलें.

इकडे **मदयंतिका बुद्धरक्षितेची** वाट पहात दुसरीकडे बसली होती; तों अकस्मात् **लवंगिका** हळूच तिच्या पाठीमागें येऊन उभी राहिली, आणि हंसून ह्मणाली, 'अग, कोणाचें ध्यान करतेस? तूं घाबरूं नकोस. अशी येथें एकटीच येऊन कां बसलीस?'

**मदयंतिका** भ्रमिष्टासारखी होऊन बसली होती. **लवंगिकेनें** अकस्मात् तिला इषारा केला, तेव्हां दचकल्या सारखी होऊन ह्मणाली, 'काय! तूं **माधवाला** निरोप सांगून आलीस?'

**लवंगिका** ह्मणाली, 'नाहीं नाहीं. मी त्याच्या पाठोपाठ गेलें, पण तो ह्या बागेच्या बाहेर पोहोंचला; आणि तिकडचा कलकलाट ऐकून मोठ्या आवेशानें दंड थोपटून एकसारखा धांवत शत्रूच्या फौजेंत शिरला. यामुळें मला त्याची भेटच झाली नाहीं. शहरांतले लोक—हे **माधवा**! हे **मकरंदा**! ह्मणून त्यांच्याविषयीं दुःखित होऊन आक्रोश करताहेत. व स्वतः महाराज अधिक फौज पाठवून त्यांच्यावर हल्ला करताहेत. तुला आणि **मालतीला** त्या दोघांनीं फसवून हरण केलें, याचा महाराजांला फार राग आला आहे ते आपल्या फौजेला उत्तेजन देऊन आपण गच्चीवर बसून युद्धाचा चमत्कार पहात आहेत, असें लोक बोलतात.'

हें ऐकून **मदयंतिका**–हायरे! आतां कसें होईल को-

णास ठाऊक, असें ह्मणाली. **लवंगिके**ला **मालती**ची विशेष काळजी होती. ती तेथें कोठें दिसली नाहीं ह्मणून तिणें—**मालती** कोठें आहे? ह्मणून **मदयंतिके**ला विचारिलें.

**मदयंतिका** ह्मणाली, 'ती तिकडे तुझी वाट पहात बसली होती. तिला सोडून मी अम्मळ पुढें सरलें. त्यानंतर मला ती कोठें दिसली नाहीं. कदाचित् बागेंत कोठें तरी असेल.'

**लवंगिका** ह्मणाली, 'चल गडे, लौकर तिला पाहूं या. ती भारी भित्री आहे. हा अनर्थ उपस्थित झाला आहे, तेव्हां यावेळीं ती आपले प्राण धारण करील किंवा नाहीं कोणास ठाऊक. गडे, तुला खरेंच सांगतें, ती **मालती** खरीखुरीच मालती (मोगरी) आहे.' असें बोलून दोघी-ही **मालती**चा शोध करूं लागल्या.

**मकरंद** शहराचें रक्षण करणाऱ्या शिपायांबरोबर लढत होता, हें वर सांगितलेंच आहे. हळूहळू शिपाई लोकांचा बराच मोठा जमाव जमला. **मकरंद** त्यांच्याशीं लढत आहे, इतक्यांत सुर्योदय झाला. त्याणें **मालती**चा वेष टाकला होता, तरी पुष्कळ चिन्हें त्याच्या अंगावर राहि-लीं होतीं. कोतवालानें ही सारी हकीकत राजाला क-ळविली; व हा **कुंडिनपूर**च्या राजाच्या दिवाणाचा मुल-गा **माधव** ह्याचा प्रियमित्र **मकरंद** आहे, असें लोकांनीं ओळखलें. पण त्याच्या अंगावर स्त्रियांचे अलंकार वगैरे आहेत हें कसें? याविषयीं चर्चा झाली. व काल महा-राजांनीं नवऱ्यामुलीकरितां ह्मणून जो पोषाख पाठविला होता, तोच याच्या अंगावर आहे हें काय? याविषयीं तर्क करतां करतां **माधव** आणि **मकरंद** यांणीं केलेलें कपट

हळू हळू उघड झालें. परंपरेनें हें वर्तमान राजाच्या कानावर जाऊन, **मकरंद** आणि **माधव** ह्या दोघांनीं कपटानें **मालती** आणि **मदयंतिका** या दोघींला वरून आपल्याला फसविलें असें समजून राजाला फार राग आला.

वस्तुतः **मकरंदा**ला गस्तवाल्यांनीं अडविल्यावरून त्यांची बोलाचाली झाली. हें प्रकरण इतक्या विकोपाला गेलें नसतें; पण हा वेळपर्यंत त्यांणीं केलेलें कपट उघडकीस येऊन राजाला राग आल्यामुळें फौजेची कुमक पाठवून **माधव** आणि **मकरंद** यांचा सूड उगविण्याचा त्याणें निश्चय केला होता, यामुळें त्या भांडणाला फार भयंकर स्वरूप आलें.

**माधव** मदतीला आल्यामुळें **मकरंदा**ला विशेष अवसान आलें. ते दोघेही समुद्रांत मगर किंवा हरणाच्या कळपांत सिंह यांसारखे मोठ्या पराक्रमानें शत्रूचा पराभव करीत होते. त्यांणीं पुष्कळ मोठमोठ्या वीरांचा पराभव केला, आणि शेंकडों शिपायांचीं डोकीं तोडलीं. याप्रमाणें तिसरा प्रहर होईतोंपर्यंत एकसारखी त्यांची लढाई चालली होती. दोघां तरुण मुलांशीं हजारों शिपायांला लढायला लावतो, हा मोठा अन्याय आहे; ह्मणून लोक राजाला दोष देत होते. व बिचारे परदेशी दोघे मुलगे विनाकारण मारले जातील, ह्मणून ते फार हळहळत होते.

पुष्कळ वेळ एकसारखी लढाई चालली असून **माधव** आणि **मकरंद** दोघेही हटत नाहींत, व विनाकारण फौजेची कत्तल होत आहे, हें पाहून राजाला अम्मळ विचार करावा लागला. सर्व लोक आपल्याला दोष देत आहेत असें पाहून व त्या उभयतांच्या पराक्रमानें संतुष्ट

होऊन राजानें एकदम लढाई बंद करण्याविषयीं आपल्या फौजेला हुकूम दिला. एर्वीतेवीं ते दोघे हटत तर नाहींतच, व शेवटीं त्यांच्याकडून पराभवाचें अपेश घ्यावें त्यापेक्षां त्यांच्यावर मेहर नजर करून लढाई पुरी करावी, असा राजानें विचार केला हें फार चांगलें केलें.

राजानें लढाई बंद करून त्या दोघां वीरांला आपल्यासमोर बोलावून आणिलें. आणि—'त्रैलोक्यांत अद्वितीय अशा तुह्मां उभयतां वीरांना अवलोकन करून मला फार संतोष होतो. माझा प्रधान अर्थात् **भूरिवसु** आणि **बुद्ध-मस्कऱ्या** यांच्या मुली **मालती** आणि **मदयंतिका** यांना तुम्ही वरलें, या योगानें तुम्ही माझे जांवई झालां आहां. तेव्हां आतां तुमच्याशीं युद्ध करून काय करायचें आहे? तुह्मी खुशाल जा,' असें सांगून राजा अंतर्गृहांत निघून गेला.

राजाला लढाई बंद करावी असें वाटण्यापूर्वीं त्याणें हे दोघे कोण आहेत, याची विशेष चौकशी केली होती. आजपर्यंत **माधव** आणि **मकरंद पद्मावती** नगरींत बरेच दिवस रहात होते, तरी ते विद्यार्थिदशेंत असल्यामुळें राजाशीं त्यांचा कधीं प्रसंग आला नाहीं; व त्यांच्यासंबंधीं त्याला विशेष माहितीही झाली नव्हती. त्यांचें उत्तम स्वरूप व शौर्य अवलोकन करून राजाला जिज्ञासा उत्पन्न झाली, तेव्हां त्याच्या जवळच्या एका मनुष्यानें **कलहंसका**-ला, राजाकडे बोलावून नेलें. आणि **कलहंसकानें** त्यांची सर्व हकीकत सांगितली, तेव्हां हे दोघेही चांगले कुलीन व योग्य आहेत, असें समजल्यावरून तो फार खुष झाला होता.

**माधव** आणि **मकरंद** लढाईंत गुंतले, तेव्हां **कामंदकी** मोठ्या काळजींत पडली होती; पण आतां राजानें लढाई बंद करून त्या दोघांवर अनुग्रह केला, हें वर्तमान **कलहंस**कानें पाहिलेंच होतें. ह्मणून **कामंदकी**ला हें वर्तमान कळवून तिची चिंता दूर करण्याकरितां तो तिकडे निघून गेला.

राजानें मेहरबानी केल्यावरून खुष झालेले **मकरंद** आणि **माधव** बागेकडे परत जाण्यास निघाले. **मकरंद माध**वाला ह्मणाला, 'गड्या, तुझ्या बाहूंचें बल इतर सर्व पुरुषांहून अतिशयित आहे, यांत कांहीं संशय नाहीं; पण मला देखील प्रियेच्या ( **मदयंति**केच्या ) लाभानें आज कांहीं विलक्षण सामर्थ्य आलें. मोठमोठ्या वीरांच्या अंगावर चाल करून प्रथम एक दोन असामींचीं मी शस्त्रें हिरावून घेतलीं, आणि त्यांच्याच शस्त्रांनीं त्यांचीं मस्तकें तोडलीं. मी इतके वीर मारले कीं, त्यांच्या प्रेतांचा मधोमध ढिगारा झाल्यामुळें तो युद्धसमुद्र दुभागल्यासारखा दिसूं लागला.'

**माधव** ह्मणाला, 'मित्रा, वस्तुतः आजचा प्रसंग मोठा गर्व बाळगण्यासारखा आहे खरा. एकाच रात्रींत परस्परांविरुद्ध असे दोन समागम तूं अनुभवलेस. गेल्या रात्रीं चंद्रकिरणांनीं केवळ खचलें आहे कीं काय, असें प्रियेला मधुर आलिंगन देऊन तिनें पिऊन राहिलेलें मद्य रात्रीच्या आनंदाच्या प्रसंगांत प्राशन केलेंस. ज्या तुझ्या शरीरानें अतिशय नाजुक अशा त्या मनोहर प्रसंगाचा अनुभव घेतला त्याच शरीरानें थोडक्याच अंतरानें हजारों वीरांचीं मस्तकें उडवून रक्ताच्या नद्या वाहविल्या, ही गोष्ट कांहीं सामान्य नाहीं.'

'तें कांहीं असो, पण गड्या, ह्या राजाचें सौजन्यही लक्षांत ठेवण्यासारखें आहे, यांत कांहीं संशय नाहीं. कारण, आमच्या हातून ह्याचा कांहीं लहानसान अपराध घडला नाहीं. तथापि त्यानें जणूं काय अपराध मुळीं केलाच नाहीं व त्याची आह्मीं एखादी मोठी कामगिरी बजाविली आहे, असें त्याणें करून दाखविलें. वाहवा! एकंदरींत राजाचें अंतःकरण मोठें उदार खरें. असो. झाला तो प्रसंग उत्तमच झाला असें ह्मटलें पाहिजे. आतां आपण बागेंत जाऊंया. तूं **मदयंति**केला कोणत्या रीतीनें वरलेंस, हें मला विस्तारपूर्वक ऐकावयाचें आहे. पण **मालती**च्या समक्षच ती गोष्ट ऐकूं. कारण तिच्यासमक्ष तूं ती हकीकत सांगूं लागलास ह्मणजे **मदयंतिका** आणि **मालती** ह्या दोघी एकमेकींच्या लाजेनें माना खालीं घालतील, व **मदयंतिका** तुझ्याकडे कटाक्षप्रेरणा करील ह्मणजे ती एक विलक्षण मौजच होईल.' असें बोलत बोलत दोघेही बागेच्या दरवाज्याच्या आंत आले.

**मालती** व **मदयंति**का यांला त्या तळीच्या कांठावर सोडून **माधव** गेला होता, ह्मणून ते दोघेही थेट तेथेंच सरळ गेले. पण तेथें कोणीच दिसलें नाहीं यामुळें **माधव** अम्मळ खिन्न झाला, हें पाहून **मकरंद** ह्मणाला, 'गड्या, आह्मी तिकडे लढाईंत गुंतल्यावरून त्यांचें (**मालती** व **मदयंतिका** यांचें) मन अस्वस्थ होऊन त्या इकडे तिकडे कोठें तरी बागेंतच फिरून वेळ घालवीत असतील. तर लवकर चल आपण त्यांना शोधून काढूं.'

असें बोलून दोघेही अम्मळ पुढें गेले, तों तेथें **लवंगिका** आणि **मदयंतिका** जवळच होत्या त्या दिसल्या. त्यांनीं

त्यांच्या दृष्टीस पडलें. उभयतांस कांहीं इजा न होतां ते सुखरूपपणें परत आले आहेत, असें पाहून त्या दोघींला फार आनंद झाला. **माधव** आणि **मकरंद** त्यांच्या जवळ येऊन—**मालती** कोठें आहे? ह्मणून विचारूं लागले. तेव्हां त्या ह्मणाल्या, '**मालती** कुठली? पावलें वाजल्यावरून आह्मी वेड्या फसलों. तीच असेल असें आह्मांस वाटलें होतें.'

हें ऐकून **माधवाला** कांहीं निराळाच भास झाला. **मालतीला** कोठें तरी दडून बसायाला लावून या दोघी आपली थट्टा करीत आहेत असें त्याला वाटलें. तो ह्मणाला, 'अगं काय तें खरोखर सांगा. माझें हृदय कंपायमान झालें आहे. तिला पाहिल्यावांचून मला कांहीं एक सुचत नाहीं. त्या कमलपत्राक्षीला बघितल्यावांचून माझें मन स्थिर होत नाहीं. माझी शुद्धि नाहींशी होते. हा पहा माझा डावा डोळादेखील लवूं लागला आहे. आणि तुमच्या बोलण्यावरून माझा घात झाला असावा असें वाटतें.'

**मदयंतिका माधवा**ला ह्मणाली, ' महानुभावा, आपण येथून निघून गेल्यावर **अवलोकिता** आणि **बुद्धरक्षिता** यांला तिणें **कामंदकी**आईला हें लढाईचें वर्तमान कळविण्याकरितां ह्मणून तिकडे पाठविल्या. व **लवंगिके**ला —मोठ्या सावधपणानें आर्यपुत्राला वागायाला सांग, ह्मणून सांगून तिला आपल्याकडे पाठविली. आणि मन अधिक अस्वस्थ झाल्यामुळें ती येथेंच **लवंगिका** येण्याची वाट पाहत बसली होती. त्यानंतर हावेळपर्यंत ती कोठें दिसली

नाहीं, म्हणून आह्मी येथें चहूंकडे शोध करीत आहों; इतक्यांत आपण दिसलां.'

हें ऐकून **माधव** फारच उद्विग्न झाला. बागेंत असून ती एकाएकीं येथून नाहींशी होण्याचा त्याला संभव वाटला नाहीं. तो म्हणाला. 'यावेळीं भलभलत्या अनेक गोष्टी माझ्या मनांत येत आहेत. अग कठोर मनाचे **मालती**, विनोद करण्याकरितां दडून बसली असलीस तर घटकाभर तो एकीकडे असूंदे, आणि लौकर माझ्या दृष्टीस पड. माझें मन घाबरें होईतोंपर्यंत थट्टा करणारी इतकी तूं निर्दय आहेस का?'

याप्रमाणें **माधव** विलाप करूं लागला, तेव्हां **मदयंतिका** आणि **लवंगिका** याही विशेष घाबरल्या. पण **मकरंद माधवा**ला धीर देऊन म्हणाला, 'गड्या, तूं असा घाबरतोस कां? कारण ती येथेंच कोठें तरी बसली असेल. आपण नीट शोधून पाहूंया. तोंपर्यंत तूं असा विकल होऊं नकोस.'

**माधव** म्हणाला, 'अरे, तूं देखील असेंच म्हणतोस हें काय? माझ्यावांचून ती किती दुःखित होईल, व काय करून घेईल, याचा कांहीं नेम आहे काय?'

यावर **मकरंद** म्हणाला, 'तूं म्हणतोस तसें आहे खरें; पण मला वाटतें कीं, ती बहुतकरून **कामंदकी**आईकडे गेली असेल. तर आधीं आपण तिकडे जाऊन शोध करूंया; मग पुढें काय तो विचार.'

**मकरंदा**चा हा तर्क **लवंगिका** आणि **मदयंतिका** यांलाही खरा वाटला, आणि सर्व मंडळी **कामंदकी**च्या मठाकडे निघाली. **माधवा**चें मन ठिकाणावर नव्हतें.

तो आपल्याशींच ह्मणाला, माझी प्रियसखी **मालती**, हे ह्मणतात त्याप्रमाणें, कदाचित् **कामंदकी**च्या मठाकडे गेली असेल. पण एकंदरींत ती सुखरूप आहे किंवा काय, याविषयीं मला मोठी शंकाच आहे. सुखाचे प्रसंग बहुतकरून विद्युल्लतेसारखे क्षणिकच असतात, पण त्याविषयीं मनुष्याचा कांहीं इलाज नाहीं. असो. दैव सर्व प्रकारें आपल्याला अनुकूळ होऊन इष्टहेतु सिद्धीस नेईल!

---

# प्रकरण नववें.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें **कपालकुंडलेनें मालती**ला मंत्रसामर्थ्यानें बांधून नेलें, ही गोष्ट **माधव, मकरंद, मदयंतिका, लवंगिका,** इत्यादि तिच्या आप्तजनांपैकीं कोणालाही माहीत नव्हती. तथापि त्यांनीं चहूंकडे तिचा शोध करून पाहिला, व कोठें सांपडत नाहीं, तेव्हां ती नाहींशीच झाली असेल, असें समजून सर्व लोक तिच्याविषयीं शोक करूं लागले. बाकी सर्वांपेक्षां **माधवा**ला तिच्या संबंधानें अधिक दुःख व शोक होणें साहजिकच आहे. तो **मालती**चा शोध करण्याकरितां म्हणून जिकडे दिशा फुटेल तिकडे फिरूं लागला. त्यानें शहराकडे तोंड फिरविलेंच नाहीं. **माधवा**ची तशी स्थिति झाल्यामुळें त्याचा प्रियमित्र **मकरंद** यालाही त्याच्या बरोबरच फिरावें लागलें. ह्या असह्य दुःखाच्या प्रसंगीं **माधव** कांहींतरी साहस करून घेईल; ह्मणून **मकरंदा**नें त्याची पाठ सोडली नाहीं.

इकडे **कपालकुंडलेनें मालती**ला **श्रीपर्वता**वर नेऊन तेथें तिचा नाश करण्याचा विचार केला होता, त्याप्रमाणें ती तिला

तिकडे घेऊन गेली; पण तिचा हेतु मात्र पूर्ण झाला नाहीं. **सौदामिनी** नांवाची एक बुद्धतापसी होती. ती **कामंदकी**, **देवरात** आणि **भूरिवसु** हीं पाठशाळेंत शिकत होतीं, त्यावेळीं त्यांची सहाध्यायिनी असून **देवरात** आणि **भूरिवसु** या दोघांनीं व्याह्याचें नातें जमविण्याची जी प्रतिज्ञा केली होती, तिची ती एक साक्षीदार होती, ह्मणूनच **मालती** आणि **माधव** यांचा विवाह व्हावा हें हिच्याही मनांत होतें. तिचा, **देवरात** आणि **भूरिवसु** या दोघां शाळासोबत्यांवर, विशेष अनुराग होता, व पाठशाळा सोडल्यानंतर तर्कविद्येचें अध्ययन करण्याकरितां ती **कामंदकी**ची शिष्यीण झाली होती, वगैरे गोष्टी पूर्वीं सांगितल्याच आहेत, त्यावरून **मालतीकडे सौदामिनीचा** विशेष पक्षपात असणें साहजिकच आहे.

**कपालकुंडलेनें मालतीला श्रीपर्वतावर**—ज्या ठिकाणीं तिचा नाश करण्याचें तिणें योजिलें होतें, त्या ठिकाणीं नेलें. **सौदामिनी**ला मंत्रशास्त्राचा विशेष नाद लागला होता, व ती जारण मारण इत्यादिकांत मोठी प्रवीण झाली होती, यामुळें **कपालकुंडले**चें आणि तिचें सख्य होतें. तथापि **कामंदकी** व **मालती** यांच्याशीं **सौदामिनी**चा कसा काय संबंध आहे हें तिला ठाऊक नव्हतें. **सौदामिनी** आपल्याला हरकत करील, हें तिला ठाऊक असतें तर तिणें तें कृत्य **श्रीपर्वतावर** करण्याचें मुळीं योजलेंच नसतें. पण **मालतीं**च्या आयुष्याची दोरी सबळ होती ह्मणून, किंवा आपल्या समक्ष **देवरात** आणि **भूरिवसु** यांणीं जी प्रतिज्ञा केली होती, ती त्यांच्याकडून पुरी करविण्याच्या कामांत **कामंदकी**प्रमाणेंच **सौदामिनी**कडून कांहीं प्रयत्न व्हाय-

नाहीतर सर्वांचाच घात झाला असता. असो.

**कपालकुंडले**नें आपला गुरु **अघोरघंट** याचा मठ **श्रीपर्वता**वर होता, तेथें **मालती**ला नेलें. आणि लौकरच तिला मारणार, इतक्यांत **सौदामिनी** सहज **कपालकुंडले**च्या येथें आली, आणि आपल्या आप्त संबंध्यांचीं नांवें घेऊन आक्रोश करणाऱ्या **मालती**ला ओळखून तिणें '**कपालकुंडलेनें**' तशी वाईट गोष्ट केल्याबद्दल तिला दोष देऊन **सौदामिनी** **मालती**ला आपल्या आश्रमांत घेऊन गेली.

**कपालकुंडले**चा **मालती** आणि **माधव** यांच्यावर किती राग होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आणि त्यावरून तिनें **मालती**ला कधींही जीवंत सोडलें नसतें; पण प्रत्यक्ष **सौदामिनीनें** सांगितल्यावरून तिचा नाइलाज झाला. **सौदामिनी** ही तिची मैत्रीण होती. व त्यांतूनही मंत्रविद्येंत **कपालकुंडले**पेक्षां ती फारच प्रवीण होती. **कपालकुंडलेनें** भल्या गोष्टीनें **मालती**ला सोडलें नसतें तर **सौदामिनी**चें इतकें सामर्थ्य होतें कीं, तिणें **कपालकुंडले**ला देखील ठार केलें असतें. हा तिचा प्रभाव जाणूनच **कपालकुंडलेनें** **मालती**ला सोडून—तुझा हिच्यावर इतका पक्षपात आहे, हें मला ठाऊक नव्हतें, ह्मणून माझ्या हातून अशी गोष्ट झाली. याबद्दल तूं क्षमा कर, अशी **सौदामिनी**ची प्रार्थना केली.

**सौदामिनीनें** मोठ्या प्रेमानें **मालती**चें समाधान करून तिची सर्व हकीकत विचारून घेतली. **माधवा**चा आणि तिचा विवाह झाला, ही गोष्ट ऐकून **सौदामिनी**ला फार संतोष

झाला. अकस्मात् **कपालकुंडलेनें** तिला इकडे आणलें, तेव्हां ही नाहींशी झाल्यामुळें **माधव** व तिचे इतर आप्त हे फार दुःखांत पडले असतील. तेव्हां त्यांना **मालती** जिवंत असल्याचें वर्तमान कळवून त्यांचें समाधान केलें पाहिजे, नाहीं तर कांहीं तरी अनर्थ होईल. ह्मणून **सौदामिनीनें** **पद्मावती** नगरीकडे जाण्याचा विचार करून **मलती**जवळ विशेष खूण पटण्यासारखी कांहीं वस्तु मागितली. तेव्हां तिणें **माधवानें** तिच्या गळ्यांत घातलेली बकुळीची माळ काढून तिच्या हातीं दिली.

वस्तुतः **सौदामिनी** मंत्रसामर्थ्यानें क्षणमात्रांत **मालती**-लाच तिकडे घेऊन जाण्यास समर्थ होती व तसें तिणें केलेंही असतें; पण **मालती**चा विवाह झाला तो गुप्तपणें झाला असून त्या कामीं राजा विशेष प्रतिकूळ होता. व त्याची आणि **माधव** व **मकरंद** यांची लढाई जुंपली आहे, असें **मालतीनें** सांगितलें. लढाईचा परिणाम चांगला झाला, व झाल्या गोष्टीबद्दल राजानें आपली सम्मति दिली हें वर्तमान **मालती**ला ठाऊक नव्हतें. तेव्हां अर्थात् लढाई जुंपली आहे, येथपर्यंतच तिनें हकीकत सांगितली. त्यावरून पुढें परिणाम काय होईल कोणास ठाऊक? मग **मालती**ला तिकडे नेऊन उगीच धोक्यांत घालावी, त्यापेक्षां येथें सुरक्षित ठिकाणीं आहे, हीच बरी. असा विचार करून आपल्या शिष्यिणीला तिची चांगली व्यवस्था ठेवण्याविषयीं सांगून **सौदामिनी** बकुळीची माळ घेऊन आकाशमार्गानें निघाली, ती **पद्मावती** नगरींत आली.

तिला सर्वांपेक्षां **माधवाला** आधीं हें वर्तमान कळवावयाचें होतें, पण **माधव** यावेळीं **पद्मावतींत** नव्हता.

दिसलें. मंत्रसामर्थ्यानें स्वच्छंद चालत असल्यामुळें तिची गति विलक्षण होती. ती आपल्या गतीला उद्देशून ह्मणाली.

वाहवा ! मी किती जलद चाललें आहें पहा. माझ्या अतिशय त्वरित गमनानें ह्या नद्या, पर्वत, गांवें, हीं दृष्टीपुढें ठरत देखील नाहींत. मागें दृष्टि फिरवून **पद्मावती**ची शोभा अवलोकन करून ह्मणाली, वाहवा ! ही नगरी मोठी शोभायमान आहे खरी. **सिंधु** आणि **पारा** ह्या दोन नद्यांचा येथें समागम झाला असून ह्या नद्यांच्या वेष्टणानें—उंच उंच मंदिरांचीं शिखरें, तसेच बंगले, यांणीं फोडून टाकलेल्या आकाशाला ही धारण करते आहे कीं काय, असें वाटतें. तशीच ही **लवणा**नदी कशी शोभते आहे पहा. वर्षाकालांत जिच्या दोहीं बाजूंला उगवलेल्या हिरव्याचार गवतावर चरत असलेल्या गाई व लहान लहान वृक्ष यांची शोभा अवलोकन करून मोठा आनंद होतो.

तसाच हा येथें **सिंधु** नदीचा मोठा धबधबा आहे. फार उंचावरून वेगानें ही नदी खालीं पडत असल्यामुळें हिच्या उदकाचा प्रवाह पृथ्वीचा भेद करून खालीं जात आहे कीं काय, असें वाटतें. ह्या धबधब्याचा आवाज मेघगर्जनेसारखा प्रचंड असून तो आसमंतात् असणाऱ्या पर्वतांच्या दऱ्या खोऱ्यांत घुमून दिग्गजांच्या गर्जनेसारखा भासतो.

तसेच हे चंदन, केसर, पाटल, इत्यादि अनेक एक-

मेकांला लागणारे वृक्ष व त्यांच्या पिकलेल्या फळांच्या आणि फुलांच्या सुवासानें सुगंधित झालेले पर्वताच्या आसपासचे अरण्याचे प्रदेश—कदंब, जांभळी इत्यादि वृक्षांनीं घनदाट व **गोदावरी**च्या प्रवाहानें ज्यांतून शब्द उत्पन्न होत आहे, अशा दक्षिणेंतील **पंचवटी**जवळच्या **दंडकारण्य** प्रदेशाची आठवण देतात.

अम्मळ पुढें जाऊन ह्मणाली, हा येथें **मधुमती** आणि **सिंधु** ह्या दोन नद्यांचा संगम झाला आहे. आणि ह्याच्या जवळच **सुवर्णबिंदु** नांवाचें हें **शंकराचें** लिंग आहे. त्या लिंगाला नमस्कार करून ह्मणाली, 'भगवन् देवा **शंकरा**! भुवनाचें रक्षण करणाऱ्या, अखिलनिगमाच्या अधिपते, चंद्रशेखरा, मदनांतका, आदिगुरो, तुझा जयजयकार असो! आह्मांवर तुझा सर्वकाल अनुग्रह असावा.'

याप्रमाणें त्या **शंकरा**ची प्रार्थना करून **सौदामिनी** एका पर्वताकडे पाहून ह्मणाली, नूतन उदय पावलेल्या मेघासारखा काळा कुट्ट असून अतिशय उंच व रमणीय दिसणारा हा पर्वत मला फारच आनंद देतो. येथें मोठमोठ्या गुहांत बसून घूं घूं करणाऱ्या घुबडांचा आवाज जिकडे तिकडे घुमून जात आहे, व त्या योगानें उत्पन्न होणारा प्रतिशब्द चहूंकडे पसरला आहे. लहान लहान पाण्याचे झरे उंचावरून खालीं पडत असल्यामुळें त्यांच्यापासून होणाऱ्या आवाजानें हा पर्वत विशेष गंभीर दिसत आहे.

याप्रमाणें निरनिराळ्या प्रदेशांची रमणीयता पाहून त्यांचें वर्णन करीत करीत ती मोठ्या आनंदांत चालली होती. इतक्यांत ऊन अंगाला झोंबल्यासारखें वाटल्यावरून वर

पुष्कळ नसल्यामुळें ऊन लागल्यावरून दुसऱ्या दाट छायेच्या वृक्षावर जाऊन बसत आहे. तशाच ह्या माशा शिसव्याच्या झाडावरून उठून पाण्याच्या आश्रयाला बसताहेत. यावरून दोनप्रहर झाली, ह्यांत कांहीं संशय नाहीं. तेव्हां आतां आपण लौकर लौकर **माधवा**कडे जाऊन त्याचें समाधान करावें, असा विचार करून **सौदामिनी** **माधवा**कडे त्वरेनें जाण्यास निघाली.

आतां ह्या **सौदामिनी**ला वाट अतिक्रमण करण्याच्या कामास लावून देऊन आपण **माधवा**ची काय अवस्था झाली आहे, तें पाहूं या. तो **मकरंदा**सहवर्तमान अरण्यांत **मालती**चा शोध करीत भटकत होता, हें वर सांगितलेंच आहे. त्याची ती विलक्षण दुःखकारक स्थिति पाहून **मकरंद** सुस्कारा सोडून दयेनें म्हणाला, ‘ आतां आपण काय तरी करावें ? यावेळीं आम्ही दैवाच्या अवकृपेनें विलक्षण प्रकारच्या ह्या विपत्तींत पडलों आहों. आम्हीं त्या राजाची असंख्य फौज जिंकून विजयी झालों; पण येथें आमचा कांहींच इलाज चालत नाहीं ! ती **मालति** नाहींशी झाली आहे ती पुनः खचित भेटेल, अशी खात्री होत नाहीं ; तथापि तिच्याविषयीं अगदीं निराशाही होत नाहीं. आणि असें झाल्यामुळें मन मोहरूपी गाढ अंधकारांत अगदीं निमग्न होतें. बरें, एवढें मोठें संकट प्राप्त झालें असून व आम्ही त्याच्या निवारणाविषयीं पाहिजे तो उपाय करण्याला सिद्ध असून

आमच्या हातून कांहीं एक होत नाहीं हा चमत्कार नव्हे का ? अमुक एक उपाय करावा, हें समजेल तर साऱ्या गोष्टी. ती नाहींशी झाली एवढें मात्र समजलें; पण ती कोठें गेली, किंवा तिला कोणी नेलें, अथवा तिचें झालें तरी काय? हें मुळींच कांहीं समजत नाहीं. तेव्हां उपाय करायचा तो करावा तरी कोणता? आणि ह्या अशा मुग्ध स्थितींत आमचा परिणाम होणार तरी कसा ? हें कांहीं समजत नाहीं !'

**माधव** भ्रमिष्टासारखा झाला होता. **मकरंद** इतकें बोलला तरी त्याचें तिकडे लक्ष्य नव्हतें. तो **मालति** कोठें तरी जवळच असून आपल्याला दिसत नाहीं, असें समजून ह्मणाला, 'प्रिये **मालति**, तूं कोठें आहेस तें कां सांगत नाहींस? अदृश्य होण्याचें कारण अथवा साधन न कळवितां एकदम कशी अदृश्य झालीस ! अग निर्दये, प्रसन्न हो, आणि एकवेळ मला भेट. मी तुला फार प्रिय आहें, असें असून एकदम मजवर निर्दय कां झालीस ! त्या **शंकराच्या** मंदिरांत सुंदर कांकणें धारण केलेला तुझा कोमळ हात मला केवळ मूर्तिमान् महोत्सवच वाटला होता, तोच हा मी **माधव** आहें. असें असून तूं मजविषयीं इतकी कठोर कां बरें झालीस !'

**मकरंदाला** ह्मणाला, 'गड्या **मकरंदा**, ह्या जगांत माझ्यावर तिच्यासारखी प्रीति करणारें दुसरें कोणीही मिळणार नाहीं. त्या **शंकराच्या** मंदिरांत काय प्रकार झाला तो तुला आठवतच असेल. कोमेजलेल्या कमळासारखें मानसिक दुःखानें तिचें अंग अगदीं विकळ झालें असूनही—केवळ माझ्या प्राप्तीच्या आशेवरच प्राण धारण

करून क्षणक्षणीं सहन करण्याला असह्य असाही कठीण कामज्वर तिनें सहन केला. आणि शेवटीं आपला हेतु पूर्ण होत नाहीं, असें वाटलें तेव्हां प्राणाला देखील तृणासारखें मानून तिणें त्याचा त्याग करण्याचा विचार केला. या इतक्या दुःखाचें मूळ कारण काय तर मला आपला हात अर्पण करावयाचा हा तिचा हेतु. याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. आणखीं विवाह होण्यापूर्वी तो योग घडून येण्याची तिला निराशा होती. तेव्हां तिणें हृदयाला भेद करणारे **लवंगिके**जवळ कसे विलाप केले, ते तुला आठवतातना? आणि मला तरी त्यावेळीं किती दुःख झालें होतें, हेंही तुला माहीत असेलच.'

दुःखाचा वेग असह्य होऊन पुनः ह्मणाला, 'अरेरे! यावेळीं मला काय होतें तें माझ्यानें सांगवत देखील नाहीं. माझें हृदय फुटून जातें; पण त्याचे दोन तुकडेमात्र पडत नाहींत. विकळ झालेल्या शरीराला मूर्च्छा येते; पण चेतना नाहींशी होत नाहीं. हृदयांत दुःखाग्नि धगधगतो आहे; पण तो ह्या शरीराला जाळून खाक करीत नाहीं. मर्मावर प्रहार करणारें दैव वरचेवर माझ्यावर दुःखाचे आघात करीत आहे; पण प्राण नाहींसे करीत नाहीं, यावरून दैवाच्या मनांत मला अनंत दुःखें भोगायाला लावायाचें आहे, असें वाटतें!'

यावेळीं भर दोन प्रहर झाले होते. आधींच दुःखानें शरीर व्याकूळ झालें होतें, व त्यांतून इकडे तिकडे भटकण्याचे अतिशय श्रम झाले होते. यामुळें सूर्याचा ताप सहन होईनासा झाल्यावरून **मकरंद** ह्मणाला, 'गड्या **माधवा**, आमचें दैव जसें आपल्याला संताप देत आहे, तसेंच हा

भगवान् सूर्यही आह्मांला तापवितो आहे. तशांतून तुझ्या शरीराची अवस्था तर अशी झाली आहे. याकरितां ह्या पुष्करणीच्या छायेंत बसून घटकाभर विश्रांति तरी घे. येथें प्रफुल्लित झालेल्या कमलाच्या सुगंधानें सुवासित झालेला व पाण्याच्या लाटांच्या तुषारांनीं शीतळ झालेला असा वायु तुला अम्मळ विश्रांति देईल, याकरितां तिकडे चल.'

**माधव** यावेळीं आपल्या जिवाकडे मुळीं पहातच नव्हता; त्याला ऊन आणि सावली यांचा भेद कांहींच वाटत नव्हता. तो ह्मणाला, 'हा भगवान् सूर्य याहीपेक्षां प्रखर होऊन हें माझें शरीर जाळून खाक करील तर बरें होईल. मला सावलीची किंवा शीतळ वाऱ्याची मुळींच गरज नाहीं. तथापि तूं ह्मणतोस तर तसेंच कां होईना. त्या पुष्करणीच्या कांठीं चल पाहिजे तर.' असें बोलून दोघेही त्या तळीच्या कांठीं छायेंत जाऊन बसले.

**मकरंदा**च्या मनांत कांहीं तरी दुसऱ्या गोष्टी काढून **माधवा**ला अम्मळ विश्रांति मिळेल, असें करण्याचा हेतु होता. ह्मणून तो ह्मणाला, 'सख्या **माधवा**, ह्या सरोवराची शोभा अवलोकन केलीस काय? तेथें पाण्यांत संचार करणाऱ्या हंस पक्ष्यांनीं आपले पंख फडफडावून पाणी उचंबळविल्यामुळें त्यांतल्या कमलिनी अस्ताव्यस्त होऊन पडल्या आहेत. याच्या योगानें ही तळी किती रमणीय दिसत आहे बरें.'

त्याचें मन दुसऱ्या विषयाकडे लवण्याकरितां **मकरंदानें** त्या सरोवराचें पुष्कळ वर्णन केलें; पण **माधवाचें** तिकडे लक्ष्य गेलें नाहीं. उलट एकाएकीं दुःखाचा वेग आल्यासारखा होऊन तो तेथून उठून दुसरीकडे गेला. तेव्हां

बारीक वेलींचे कुंज नद्यांच्या काठीं उगवले असून ते पाण्यांत लोंबत आहेत. तशींच हीं जाईचीं फुलें प्रफुल्लित होऊन आपल्या वासानें पाण्याला सुवासित करीत आहेत. इकडे नुकतींच उमलणाऱ्या कुड्यांच्या कळ्यांनीं रमणीय दिसणाऱ्या पर्वतांच्या शिखरावर लोंबणारे मेघ, मोरांला मंजुळ शब्द करायला लावून किती रमवीत आहेत पहा. हे पर्वताचे रमणीय भाग अवलोकन तरी कर. यांच्यावर कळंबाचे मोठमोठे वृक्ष विराजमान आहेत. तसेच ज्यांच्या शिखरांवरून वाहणाऱ्या लहान लहान नद्यांच्या दोहों बाजूला छत्रीच्या आकाराचीं हीं आळंबीं उगवलीं आहेत, व त्यामुळें तो प्रदेश विशेष रमणीय दिसत आहे.'

**मकरंदानें** हीं वेळपर्यंत केलेलें वर्णन ऐकून **माधव** ह्मणाला, ' अरे होय. तूं ज्यांचें वर्णन करतोस ते प्रदेश मीही पाहतों, पण ह्यांची रमणीयता यावेळीं माझ्यानें मुळींच पाहवत नाहीं हें काय ? ' डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाला,' दुसरें काय असणार ! प्रफुल्लित झालेले अर्जुनवृक्ष आणि भूर्जवृक्ष यांच्या वासानें सुवासित झालेल्या ह्या पूर्वेकडच्या वाऱ्यानें इकडून तिकडे उडविलेल्या काळ्याकुट्ट मेघांच्या पंक्ति पर्वतांचा आश्रय करीत आहेत. आणि त्या मेघोदकानें भिजविलेल्या जमिनीचा वास घेऊन वाहणाऱ्या वाऱ्यानें, अंगाला वरचेवर येणाऱ्या घामाचा परिहार करून कसे तरी हुशहुश करीत घालविण्याचे हे दिवस आहेत. ज्याला मनाला आनंद देणाऱ्या प्रियेचा सहवास घडला असेल, त्याला हें वर्षाकालाचे दिवस फार रमणीय आहेत.





पण माझ्यासारख्या हतभाग्याला मेघांचें अवलोकन करून अधिक दुःख मात्र होत.'

इतक्यांत **मालतीचें** स्मरण करून ह्मणाला, 'हे प्रिये **मालति**, यावेळीं तरुण अशा तमालवृक्षासारखे काळेभोर दिसणारे आकाशांत उदय पावलेले मेघ आणि त्यांच्या पासून थंडगार वाऱ्याच्या योगानें पडणारे नूतन उदकाचे बिंदु म्यां यावेळीं कसे बरें अवलोकन करावे? तसेंच चित्रविचित्र रंगांनीं सुशोभित दिसणारें इंद्रधनुष्य पाहून आनंदानें नृत्य करणाऱ्या मोरांच्या शब्दानें दुमदुमलेल्या ह्या दिशा तरी माझ्यानें कशा पाहवतील?' **मकरंदाला** असें सांगून **माधव** अतिशय शोकाविष्ट झाला.

त्याची ती अवस्था पाहून **मकरंदाला** आपण केलेल्या प्रयत्नाचें फार वाईट वाटलें. तो ह्मणाला, 'गड्या, तुला कांहीं भयंकर दुर्दशेचा कठोण परिणाम सांप्रत भोगावा लागत आहे. (डोळ्यांत पाणी आणून) आणि मी आपलें हृदय वज्रासारखें करून अशा वेळीं तुझ्याशीं विनोद आरंभला आहे, तेव्हां याला काय ह्मणावें? (सुस्कारा सोडून) ह्यावरून एकंदरींत आम्ही तुझ्याविषयीं आशा ठेवायाला नको असें वाटतें.'

हें ऐकून **माधव** मूर्च्छित झालेला पाहून भयानें ह्मणाला, 'अरेरे! हा तर मूर्च्छित पडला!' आकाशाकडे पाहून ह्मणाला, '**मालति** अग **मालति**, तूं इतकी निर्दय कां झालीस? सखे, तुझे आप्त व बांधव या सर्वांना सोडून तूं आपल्या मनाप्रमाणें मोठें साहस करून या **माधवाशीं** विवाह केलास, आणि सांप्रत हा अगदीं निरपराधी असतां याच्यावर असा निर्दयपणा कां करतेस?'

वाटतें. हा तर कांहीं सावध होत नाहीं. आई आई! माझें हृदय तटतटां तुटत आहे. देहाला बिलकुल शक्ति नाहींशी झाली. ह्या प्रिय मित्राच्या अशा स्थितीनें सारें जग अगदीं ओसाड झालें. हृदयांत दुःखाग्नि एकसारखा भडकत आहे. अवर्णनीय दुःखानें पीडित होऊन माझा अंतरात्मा अज्ञानरूपी अंधकारांत बुडून जात आहे. जिकडे पहावें तिकडे पसरलेला मोह मला अगदीं मंद करून टाकीत आहे. आतां म्यां मंदभाग्यानें करावें तरी काय!'

पुनः ह्मणाला, 'अरेरे! मोठे कष्ट! हा **माधव** बंधुस्नेहरूप चंद्रिकेचा प्रकाश, **मालती**च्या डोळ्याला चंद्रासारखा आनंद देणारा, ह्या जीवलोकांत परम श्रेष्ठ आणि ह्या दुर्दैवी **मकरंदा**चा प्रियमित्र एकाएकीं नाहींसा होत आहे. हाय हाय! गड्या **माधवा**, तूं माझ्यावर असा निर्दय होऊं नकोस. तूं मला भेट दिलीस ह्मणजे अंगास चंद्रासारखा शीतल आणि माझ्या हृदयाला केवळ मूर्तिमान् आनंदच होतास. त्या तुला अकालीं असा वाईट प्रसंग प्राप्त झालेला पाहून मी कसा बरें जिवंत राहीन!'

**माधवाच्या** अंगावरून हात फिरवून ह्मणाला, 'अरे निर्दया **माधवा**! एकवेळ हंसत हंसत माझ्याकडे पहा तरी. असें तुझें मन किती तरी कठोर आहे! एक वेळ माझ्याशीं थोडें तरी बोल. लहानपणापासून नेहमीं तुझ्याबरोबर फिरणारा असून ज्याचा स्नेह तुझ्यावर एकसारखा वाढत गेला आहे, अशा आपल्या प्रियमित्र **मकरंदा**ला सोडून जावें, हें तुला योग्य तरी कसें वाटलें!'





इतक्यांत **माधव** अम्मळ सावध झाला, असें पाहून ह्मणाला, 'नुकताच धुतलेल्या काळ्या खडकासारखा सुंदर दिसत असून अत्यंत मोठा असा हा आकाशांत उदय पावलेला नूतन मेघ, उदकधारांच्या वृष्टीनें, ह्या माझ्या मित्राला सावध करतो आहे असें वाटतें.( **माधवा**कडे पाहून) वाहवा ! अरे हा सावध देखील झाला ! बा मेघा ! तूं माझ्यावर हे मोठे उपकार केलेस.'

**माधव** एकाएकीं उठून बसून ह्मणाला, 'अरेरे ! ती माझी प्रिया **मालती** या सजल मेघाला पाहून फार उत्कंठित होईल, आणि यावेळीं माझें वर्तमान देखील न कळल्यामुळें दुःखानें काय करील कोणास ठाऊक. तेंव्हां आतां तिला माझें कुशल कळविलें पाहिजे, नाहींतर ती प्राण ठेवणार नाहीं. पण हा निरोप देऊन तिच्याकडे कोणाला पाठवावें बरें ?'

मेघाकडे पाहून ह्मणाला, कांहीं चिंता नाहीं. वाहवा ! मला योग्य दूत मिळाला. 'फुलांचा बहार पिकून फळें काळीं दिसत असल्यामुळें जिचे कुंज शामवर्ण दिसत आहेत आणि जिच्या ल्हान ल्हान लाटा अडखळत अडखळत चालल्या आहेत, अशा ह्या नदीच्या उत्तरेकडून तिला अगदीं भिडल्यासारखा दिसणारा, तमालवृक्षाच्या फुलांसारखा काळा हा नूतन मेघ पर्वतशिखराचा आश्रय करीत आहे, तेंव्हां यालाच दूत करून पाठवावा ह्मणजे झालें.'

**माधव**, कामी पुरुषाला ज्या निरनिराळ्या दहा अवस्था प्राप्त होतात, त्यांपैकीं उन्माद नामक अवस्थेत यावेळीं असल्यामुळें जड मेघाला आपण सांगावें काय, आणि तो ऐकेल तरी कसा ? दूतत्वाचें काम त्याच्यानें कसें होईल ?

'भल्या गृहस्था मेघा, तू कुशल आहेस ना? ... विद्युल्लता तुला प्रेमानें आलिंगन देतेना? आणि तुझ्याकडे जलकण मागणारे चातक तुझा आश्रय करितातना? तसेंच पूर्वेकडचा चांगला वारा तुझी सेवा करतोना? गड्या, हें चहूंकडे दिसणारें तुझें इंद्रधनुष्यरूप चिन्ह तुला फारच शोभतें.'

**माधवानें** मेघाला असा प्रश्न केला; पण तो अचेतन ढग त्याला काय उत्तर देणार! पण इतक्यांत त्याचा गडगडाट होऊन तो त्या पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांत चहूंकडे घुमला. तेणेंकरून मोरांनीं जिकडे तिकडे शब्द केले, ते एकून—हें मेघानें आपल्याला उत्तर दिलें असें समजून **माधव** त्याची प्रार्थना करूं लागला.

'हे भगवन् जीमूता, तुझा ह्या जगांत सर्वत्र संचार आहे, ह्मणून तुला विनंती करितों. फिरतां फिरतां कदाचित ती माझी प्रिया जर तुझ्या दृष्टीस पडली, तर माझ्याकरितां तूं तेथें क्षणभर खोटी करून आधीं तिचें समाधान कर आणि नंतर माझी अवस्था कशी झाली आहे, तें तिला सांग. पण असें करतांना तिचा आशातंतु अगदीं नाहींसा मात्र करूं नकोस. कारण एरवीं अशा वियोगदुःखांत तिचे प्राण राहिले नसते; पण केवळ त्या आशातंतूला धरूनच ती जिवंत राहिली आहे.'

मेघ वाऱ्याच्या योगानें पुढें पुढें चाललाच होता. तेव्हां **माधवाला** असें वाटलें कीं, आपली प्रार्थना मान्य करून हा निरोप सांगायला निघाला आहे; ह्मणून **माधवही**





राहून यावेळीं ग्रासलें आहे असें वाटतें. आतां काय करावें? अहो बाबा! अग आई! हे भगवति **कामंदकी**-आई, लौकर धांवा धांवा. ह्या **माधवा**ची अवस्था काय झाली आहे पहा!

इतक्यांत **माधव** शुद्धीवर आल्यासारखा होऊन ह्मणाला, ‘अरे, काय वेडेपणा हा. मी ह्या मेघाला दूत करून कोणाला निरोप पाठवीत आहें. ती जिवंत असेल, तर साऱ्या गोष्टी. तिचे अगदीं तुकडे तुकडे झाले आहेत. ह्या नवीन उगवलेल्या लोध्र वृक्षांच्या रोप्यांनीं तिची गोरीपान कांती घेतली. ह्या हरिणींनीं तिच्या नेत्रांची चपलता घेतली. तिच्या चालण्याची ढब हत्तींनीं घेतली, आणि ह्या कोमळ वेलींनीं तिचा नाजुकपणा घेतला. याप्रमाणें ती एकटी यांच्या हातांत सांपडल्यामुळें या दुष्टांनीं आपआपल्यांत तिला वांटून घेतली. असें असून मी वेड्यासारखा हा निरोप कोणाला पाठवितों आहें! हे प्रिये **मालति**, यावेळीं तूं कोठें आहेस!’

तो याप्रमाणें विलाप करतो आहे असें पाहून **मकरंद** आपल्या हृदयाला उद्देशून ह्मणाला, गुणांचें केवळ निधान असून आपला अत्यंत आवडता, व प्राणांचाही प्राण असून ज्याच्याशीं अगदीं लहानपणापासून विशेष सख्य आहे, असा प्रियमित्र **माधव** आपल्या हृदयवल्लभेच्या विरहव्यथेनें असा दुःखित झाला असून कपाळफुटक्या हृदया, तूं अद्यापि दुभागलें नाहींस याचें मला मोठें आश्चर्य वाटतें!

**माधव** ह्मणाला, ‘ह्या जमांत एकमेकाशीं सादृश्य पाव-

न केलें पाहिजे.'

असा विचार करून हात जोडून सर्वांला ह्मणाला, 'ह्या अरण्यांत राहणारे सर्व प्राणिमात्र हो! हा मी **माधव** तुह्मांला नमस्कार करून विनंती करितों, तर क्षणभर माझ्याकडे लक्ष्य पुरविण्याचा अनुग्रह करा. जिचे सर्व अवयव अत्यंत रमणीय आहेत, व जिच्या रूपांत उणेपणाचा लवलेश देखील नाहीं, अशी कुलवधु ती माझी प्रिया **मालती** तुह्मीं पाहिली आहे काय? अथवा तिचें काय झालें, हें तरी तुह्मांला ठाऊक आहे का? तिच्या सौंदर्याचें तर माझ्यानें विशेष वर्णन करवत नाहीं; पण तिचें वय किती आहे, तेवढें सांगतों तें ऐका. ज्या वयांत मदन हा परम मित्र होतो व तो हृदयांत यथेच्छ संचार करितो, आणि शरीरावर त्याच्या योगानें विलक्षण प्रकारचें सौंदर्य येतें, त्याच वयाची ती आहे.'

आसमंतात् पाहून ह्मणाला, 'हा प्रसंग मोठा कष्टकारक आहे, यांत कांहीं संशय नाहीं. आपल्या केकांनीं हा मोर आपल्या प्रियेचें वदन झांकून टाकतो आहे, तसाच हा चकोर, मोठ्या आनंदानें उन्मत्त होऊन, आपल्या प्रियेला अनुसरतो आहे, आणि हे काळ्या तोंडाचे वानर फुलांचे पराग आपल्या प्रियेच्या तोंडावर सारवितात! आतां मी याचना करावी तरी कोणाजवळ? ज्याला पहावें तो आपआपल्या प्रियेजवळ मागण्यालाच तयार झाला आहे!'

'हा वानर पहा, आपल्या दांतांच्या लाल कांतीनें

आपल्या प्रियेच्या दांतांवर लाली उठवीत होत्साता तोंड वर उचलून तिचें चुंबन घेत आहे. तसेंच या हत्तीकडे पहावें तों हाही मोठ्या चैनीनें हत्तिणीच्या खांद्यावर सोंड टाकून सुखाचा अनुभव घेत आहे. अशा वेळीं याच्या जवळ तरी—तूं माझ्या प्रियेला निरोप सांगण्याचें काम पतकर, असें सांगण्याला सवड कोठें आहे! जिच्या गालांला खाज उठली आहे, अशा आपल्या प्रियेला लांब दांतांच्या सुळ्यांनीं हा हत्ती मोठ्या प्रेमानें खाजवीत आहे, आणि ती डोळे झांकून त्या सुखाचा अनुभव घेत आहे. आपले कान फडफडां हलवून हा हत्ती आपल्या प्रियेला वारा घालीत आहे. तसेंच आपण अर्धे चावलेले कोमल पल्लव सोंडेच्या अग्रानें तिच्या तोंडांत घालीत आहे. खरोखर आपण मनुष्य असून व्यर्थ आहों. प्रियेच्या स्नेहसुखाचा अनुभव घेणारा हा जंगली हत्तीदेखील आमच्यापेक्षां धन्य आहे.'

दुसरीकडे हत्तिणीच्या वियोगानें म्लान झालेल्या एका हत्तीला पाहून ह्मणाला, 'हा तर माझ्यासारखा दुःखी आहे. मेघ गर्जना करीत असतां हा आपण गर्जना करीत नाहीं. हें सरोवर अगदीं जवळ आहे, पण त्यांतलीं कमळें तोडून खात नाहीं; तसेंच याचा मद नाहींसा झाल्यावरून गंडस्थळावर घोंघों करणारे भ्रमर दुसरीकडे संचार करूं लागल्यामुळें हा अगदीं दीन झाल्यासारखा दिसतो. याच्या या अवस्थेवरून प्राणप्रियेशीं याचा वियोग झाल्यामुळें हा दीन होऊन दुःखित आहे, यांत कांहीं संशय नाहीं.'

पुनः अम्मळ पुढें जाऊन ह्मणाला, 'असो. फार आयास

करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आनंदित होऊन बरोबर फिरणाऱ्या हत्तिणींनीं मधुर असून गंभीर अशी ज्याची गर्जना ऐकली आहे, असा हा मदोन्मत्त हत्तींच्या कळपांतला मुख्य हत्ती, प्रफुल्लित झालेल्या कळंबाच्या फुलांचा वास हरण करणाऱ्या मंद शितल वायूचें सेवन करीत आहे. व जो हत्तिणीसहवर्तमान सरोवरांत यथेच्छ क्रीडा करीत असून आपल्या सोंडेनें त्यांच्या अंगावर पाणी फेंकीत आहे, असा हा मतंगज मोठा रमणीय आहे. आपण आतां याच्याशीं थोडा परिचय करूं या.'

असा विचार करून त्या हत्तीला ह्मणाला, 'महाभागा नागपते! तुझें तारुण्य मोठें स्तुत्य आहे. आपल्या प्रियेला कसें खुष करावें, या कामांतही तूं मोठा चतुर आहेस असें वाटतें; पण गड्या, थोडेंसें चुकलास. लीलेनें उपटलेला कमलाचा देंट खात खात तूं आपल्या सोंडेनें प्रियेच्या अंगावर कमळाच्या वासानें सुगंधित झालेल्या पाण्याच्या चुळा भरून टाकल्यास हें तर ठीकच केलेंस; पण ह्या सरोवरांत स्नान करून जातेवेळीं तूं त्या आपल्या प्रियेच्या मस्तकावर प्रीतिपूर्वक कमलपत्राचें छत्र धारण करावयाचें तें मात्र केलें नाहींस हें काय?'

हत्तीच तो, तो याला काय उत्तर देणार! तो तसाच पुढें चालला आहे, असें पाहून पुनः ह्मणाला, 'अरे! हा तर माझी परवा न करतां मला तुच्छ मानून पुढें चालला आहे. अरे पण मी इतका मूढ कसा झालों! हा बोलून चालून वनचर. याच्याशीं **मकरंदा**सारख्या रसिक मित्राबरोबर करावयाच्या गोष्टी करतों हें काय?'

स्वारीला यावेळीं **मकरंदाची** आठवण झाली, तेंव्हां ह-

त्तीकडचें लक्ष्य सुटून **मकरंदा**कडे लागलें. **मकरंद** अगदीं जवळ होता; पण त्याच्याकडे पहातो कोण ? यावेळीं तो आपल्या जवळ नाहीं असें समजून ह्मणाला, 'हे प्रियमित्रा **मकरंदा**, याप्रमाणें तुझ्यावांचून मी एकटाच येथें जिवंत आहें, ह्या माझ्या जिण्याला धिक्कार असो ! तुझ्यावांचून मी ह्या रमणीय वस्तु पहात आहें, यांलाही धिक्कार असो ! तुझा सहवास ज्यांत घडला नाहीं, असा हा दिवसही नाहींसा होवो ! आणि मला जी आनंदाची मृगतृष्णा होते, तिलाही तुझ्यावांचून धिक्कार असो !'

**मकरंदा**ला हें त्याचें बडबडणें ऐकून फार भय वाटलें. कामी पुरुषाला प्रियेच्या वियोगकालीं ज्या अवस्था होतात, त्यांत उन्माद ही नववीअवस्था आहे. उन्मादांतून जर त्याचा बचाव झाला नाहीं तर सेवटची दहावी अवस्था ह्मणजे मरण, प्राप्त व्हावयाचें. **मकरंदा**ला ह्या उन्माद अवस्थेंतून याचा कोणत्या रीतीनें बचाव करावा, याची मोठी काळजी पडली होती. **माधवानें** आपलें स्मरण केलें असें पाहून **मकरंद** ह्मणाला, 'अरेरे ! हा यावेळीं उन्मत्त झाला असून मोहानें—जवळ असूनही मी याला दिसत नाहीं. तथापि कांहीं एका निमित्तानें माझ्यावर असलेल्या याच्या स्नेहाचा संस्कार प्रबुद्ध झाला आहे. पण मी जवळ नाहीं असेंच हा मानतो आहे. असो. याला आपण आठवण देऊं या.' असा विचार करून **माधवा**च्या पुढें उभा राहून ह्मणाला, 'गड्या, हा दुर्दैवी **मकरंद** तुझ्या जवळच उभा आहे.'

हें ऐकून **माधवानें** डोळे उघडले, आणि ह्मणाला, 'प्रियमित्रा **मकरंदा**, असा पुढें ये आणि मला आलिंगन दे.

प्रिया **मालति** तर कोठें दिसत नाहीं. शोधून शोधून मी तिच्याविषयीं आतां निराश होऊन फार श्रांत झालों आहें.' असें बोलून तो मूर्च्छित झाला.

**माधवानें** आपल्याला भेट ह्मणून सांगितलें, त्यावरून **मकरंदाला** फार आनंद झाला. हा मी माझ्या जीवितेश्वराला भेटतों—असें बोलून त्यानें **माधवाला** मिठी मारली, तों त्याला मूर्च्छा आली आहे, असें पाहून दयेनें ह्मणाला, 'हाय हाय ! हें मोठेंच दुःख. याला माझ्या भेटीची उत्कंठा झाली, आणि लगेच हा बेशुद्ध झाला. आतां ह्याच्या विषयीं आशा करून कांहीं उपयोग नाहीं. सर्वथा हा माझा मित्र नाहींच हा अगदीं निश्चयच !'

**माधवाला** उद्देशून ह्मणाला, 'गड्या **माधवा,** तुझ्यावर अतिशय स्नेह असल्यामुळें भ्रमाचें कारण नसतांही, उगीच कंपायमान होऊन मी ज्या भीतीचा हावेळपर्यंत अनुभव करीत होतों, तें सारें सांप्रतची तुझी आपत्ती पाहून क्षणमात्रांत नाहींसें झालें. आतां केव्हां काय होईल, अशी तुझ्याविषयीं भीति मुळींच बाळगायला नको. गड्या, या पूर्वीं ज्या कांहीं घटका गेल्या त्याच बऱ्या होत्या असें वाटतें. कारण त्या वेळीं तुझ्या मनाची स्थिति नीट नव्हती, तरी तूं शुद्धीवर होतास, ह्मणून मला अम्मळ बरें वाटत होतें. पण सांप्रत तुला बेशुद्ध पाहून ह्या माझ्या शरीराचें मला केवळ ओझें झालें आहे. माझा प्राण वज्राच्या खिळ्यासारखा मला बोंचत आहे. सर्व दिशा उजाड झाल्या आहेत आणि हीं इंद्रियें अगदीं निष्फल वाटतात. ही वेळ मो-

ठ्या कष्टानें जाते. तूं सोडून गेल्यामुळें हा सारा संसार मला अगदीं शांत झाल्यासारखा वाटतो!'

पुनः विचार करून ह्मणाला, 'ह्या प्रियमित्र माधवाच्या अंतकालाला साक्षिभूत झालेला मी, आणखीं काय व्हायचें ह्मणून अद्याप जिवंत राहिलों आहें. असो. आतां राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ह्या पर्वताच्या शिखरावर चढून खालीं पाटलावती नदींत उडी घ्यावी, असा विचार करून नदीकडे पाहून ह्मणाला, 'ओहो! या नदीचा प्रवाह मोठ्या जोरानें वाहतो आहे. या मार्गानें मी लौकर लौकर माधवाच्या पुढें जाऊन परलोक गांठीन.'

असें बोलून मकरंद कांहींसा पुढें गेला, आणि पुनः मागें फिरून मोठ्या दयेनें, मूर्च्छित झालेल्या माधवाकडे पाहून ह्मणाला, 'हाय हाय! अरे नीलकमलासारखें याचें हें शरीर वारंवार कितीही वेळ आलिंगन केलें तरी मला तृप्ति होत नव्हती. आणि ज्या शरीराला विस्मयाविष्ट झालेल्या मालतीची दृष्टि नवीन नवीन विलासयुक्त होऊन प्राशन करीत होती, तेंच हें ह्या माधवाचें शरीर अशा स्थितींत मी अवलोकन करण्याला वांचलों आहें. धिक्कार असो माझ्या जीविताला!'

माधवाचे गुण व त्याची विद्या यांला आठवून ह्मणाला, 'हें मोठेंच आश्चर्य. ह्या ह्याच्या लहानशा शरीरांत इतक्या गुणांचा अगदीं अल्पवयांत कसा समावेश झाला; याचा मोठा चमत्कार वाटतो. सख्या माधवा, सर्व कलांनीं परिपूर्ण असा निर्मल चंद्र आज राहूच्या तोंडांत पडला. निबिड मेघ वायूच्या वेगानें विस्कळ होऊन गेला. फळांच्या बहरानें ओथंबलेला उत्तम वृक्ष

दावाग्नीनें जाळला. ह्या जन्मांत परम श्रेष्ठ असा तूं मृत्यूच्या स्वाधीन झालास, या योगानें अशी स्थिति झाली. तूं अचेतन झाला आहेस, अशा स्थितींतही मी तुला प्रेमानें आलिंगन देतों. सांप्रत हीच गोष्ट मला मनापासून आवडली आहे.'

असें बोलून **माधवाला** आलिंगन देऊन ह्मणाला, 'हाय हाय! प्रियसख्या, विमल विद्यानिधि, गुणगुरो, **मालती**च्या प्राणनाथा, **कामंदकी** आणि **मकरंद** यांला आनंद देणाऱ्या चंद्रा, गड्या **माधवा**! ह्या जन्मांतलें हें माझें तुला शेवटचें आलिंगन आहे! सांप्रत एक घटकाभर तरी हा **मकरंद** जिवंत राहील असें मानूं नकोस. आजन्म एकत्र राहण्यानें व आईचें स्तनपान देखील बरोबरच केल्यामुळें तूं एकटाच उत्तर क्रियेचें तिलोदक प्राशन करणार, हें मला युक्त वाटत नाहीं; ह्मणून तुझ्याबरोबर मीही येतों. हा पहा निघालों.'

असें बोलून मूर्च्छित झालेल्या **माधवाला** सोडून **मकरंद** पर्वताच्या शिखरावर चढला, आणि त्या शिखराजवळून वहात असलेल्या **पाटलावती**नदीला हात जोडून ह्मणाला, 'भगवति **पाटलावति**! प्रियामित्र **माधव** जेथें गेला असेल, तेथें मला ने. जन्मांतरींदेखील जेथें तो जन्म घेईल तेथेंच मलाही जन्म प्राप्त होऊन मी त्याचा अनुचर व्हावें, अशी इच्छा करितों!'

याप्रमाणें प्रार्थना करून **मकरंद** खालीं उडी टाकणार इतक्यांत त्याला अकस्मात् कोणीं निवारण केलें. **कामंदकी**ची प्रिय मैत्रीण व शिष्यीण **सौदामिनी मालती**ला **कपालकुंडले**पासून रक्षण करून खुणेकरितां बकुळीची

माळ घेऊन **माधवाचा** शोध करीत आकाशमार्गानें येत होती हें वर सांगितलेंच आहे. **मकरंद** उडी टाकीत असलेला तिच्या दृष्टीस पडला. हें त्याचें साहस पाहून **सौदामिनी** तत्काळ तेथें आली, आणि तिणें हात धरून त्याला मागें ओढलें. एकाएकीं मागें ओढल्यावरून चकित होऊन **मकरंद सौदामिनी**च्या तोंडाकडे पहूं लागला; पण त्याला तिची ओळख मिळाली नाहीं. ह्मणून **मकरंद** ह्मणाला, ‘ बाई, तूं कोण आहेस? आणि मला विनाकारण तूं कां मागें ओढलेंस?’

यावर **सौदामिनी** ह्मणाली, ‘ तें मग सांगेन. पण **मकरंद** ह्मणतात तो तूंच का ? ’

**मकरंद** ह्मणाला, ‘ सोड सोड. तोच मी दुर्दैवी.’

**सौदामिनी** ह्मणाली, ‘ तर मग असें साहस करूं नको. मी योगिनी आहें. तूं जिवावर कां उदार झालास हें मला समजलें. **मालती** जिवंत आहे, आणि त्याबद्दलची खूणही माझ्याजवळ आहे. ही पहा ती.’ असें बोलून **सौदामिनीनें** बकुळीची माळ **मकरंदाला** दाखविली. ती पाहून सुस्कारा सोडून—आई, ती **मालती** अद्याप जिवंत आहे काय? असें **मकरंदानें** विचारलें.

यावर **सौदामिनी** ह्मणाली, ‘अरे, ती जिवंत आहे तर काय? पण बाळा, तूं असा प्राणत्याग करायला तयार झालास, यावरून **माधवाचा** कांहीं तरी वाईट परिणाम झाला असेल, असें समजून माझें हृदय कांपतें. बरें पण **माधव** यावेळीं कोठें आहे तें आधीं सांग.’

**मकरंद** ह्मणाला, ‘ आई, तो अगदीं मूर्च्छित झाला

असें पाहून निराशेनें मी त्याला सोडून आलों. तर आतां लवकर तिकडेच जाऊं या.' असें बोलून **मकरंद** **सौदामिनी**ला घेऊन **माधवा**कडे जाण्यास निघाला.

इकडे **माधव** कांहीं वेळानें सावध होऊन ह्मणाला, अरे, यावेळीं मला कोणीं सावध केलें ? होहो ! समजलें. नवीन मेघोदकाचे बिंदु धारण करणाऱ्या ह्या शीतल वायूनें—यावेळीं मला नको आहे तरी, हा उद्योग केला असावा. मूर्च्छित पडलों होतों, तेंच बरें होतें.

इकडे **माधव** सावध झाला हें दुरूनच पाहून **मकरंदा**ला फार आनंद झाला. **माधव** आणि **मकरंद** ह्या दोघांलाही पाहून **सौदामिनी** मनांत ह्मणाली, **मालती**नें ह्या दोघांच्या स्वरूपाचें जसें वर्णन केलें होतें, तसेच हे अगदीं हुबेहुब आहेत.

वायूनें आपल्याला सावध केलें हें चांगलें केलें नाहीं, असें समजून **माधव** त्याला उद्देशून ह्मणाला, 'भगवन् पूर्वेकडच्या वाऱ्या ! पाण्यानें भरलेल्या मेघाला आकाशांत चहूंकडे फिरीव. मेघांचें दर्शन करवून चातकांला आनंद दे. मोरांला नाचायला लाव. केतकीला कळीण कर. हीं कामें तुला योग्य आहेत. प्रियेच्या विरहदुःखानें मूर्च्छित होऊन दुःखाचा विसर पडलेल्या मनुष्याला निर्दयपणानें शुद्धीवर आणून पुनः व्यथा देऊन तुला काय करायचें आहे ?'

हें ऐकून **मकरंद** ह्मणाला, 'वाहवा ! सर्व प्राणिमात्रांना जिवंत राखणाऱ्या वाऱ्यानें याला जिवंत केलें हें फार चांगलें केलें.'

**माधव** हाताची ओंजळ करून वायूला उद्देशून ह्मणा-

ला, 'भगवन् वायो, मला जिवंत केलेस हें कांहीं तूं चांगलें केलें नाहींस. तथापि तुझ्याजवळ मी प्रार्थना करितों, ती ऐक. प्रफुल्लित झालेल्या कदंबाच्या फुलांच्या रजःकणांसहवर्तमान तूं माझे प्राण माझी प्रिया **मालती** जेथें असेल तेथें तिच्याकडे नेऊन पोहोंचव. नाहींतर तिच्या अंगाचा सुवास घेऊन तो थोडातरी मला आणून दे. कसें तरी एवढें माझें काम करच. तुझ्यावांचून मला दुसरी गतिच नाहीं.' याप्रमाणें प्रार्थना करून **माधव** हात पसरून तटस्थ उभा राहिला.

**सौदामिनी** यावेळीं अगदीं जवळच, पण आकाशांत उभी होती. **मालती**विषयीं **माधव** अगदीं निराश झाला होता. त्याला एकदम **मालती** सुखरूप असल्याचें वर्तमान सांगितलें तर कदाचित् हर्षवायु होईल, ह्मणूनच कीं काय तिणें हळू हळू त्याला तें वर्तमान कळविण्याचा विचार करून प्रथम ती जिवंत असल्याची खूण देण्याला हा चांगला अवसर आहे, असें पाहून **मालती**नें दिलेली बकुळीची माळ हळूच त्याच्या ओंजळींत सोडली.

अकस्मात् माळ हातांत पडतांच विस्मित होऊन हर्षानें **माधव** ह्मणाला, अरें, मींच गुंफलेली ही. प्रियतमेच्या उंच स्तन प्रदेशावर बरेच दिवस राहिलेली असून कामाचें मंदिर अशा बकुळीच्या फुलांनीं गुंफलेली ही माळ अकस्मात् येथें कशी आली? मी गुंफलेली तीच ही माळ याविषयीं कांहीं संशय नाहीं.

नीट पाहून ह्मणाला, हें पहा. नूतन उदय पावलेल्या चंद्रासारखें रमणीय अशा तिच्या मुखाचें अवलोकन करण्याकडे माझें लक्ष्य लागलें होतें, व **लवंगिका** तर

अत्यंत प्रिय झाली होती तीच ही माळ यांत कांहीं संशय नाहीं.

माळ दृष्टीस पडल्यामुळें माधवाला अतिशय हर्ष झाला होता. व आधीं तो उन्मत्तावस्थेंत होताच, त्यामुळें एकदम उभा राहून ह्मणाला, 'प्रिये **मालति**, दडून बसलीस काय? हा पहा तुला मी पकडतों.' असें बोलून कांहीं पावलें पुढें धांवला. पण **मालति** तेथें मुळींच नव्हती.

तेव्हां रागावल्यासारखा होऊन पुनः ह्मणाला, 'अग, माझी दुःखकारक अवस्था न जाणणारे **मालति** ! तुला आतां काय सांगूं मी? हे माझे प्राण जात आहेत कीं काय असें वाटतें. हृदय फुटल्यासारखें वाटतें. शरीर जळल्यासारखें वाटतें; जिकडे तिकडे अंधकार पसरल्यासारखा झाला आहे. ही माझी स्थिति मीं तुला सांगितली ती कसें तरी करून तूं लौकर यावेंस ह्मणून नव्हे, व थट्टेनेंही नव्हे, तर केवळ माझी खरी स्थिति काय आहे, हें तुला कळावें म्हणून. तर माझ्यावर आतां निर्दय होऊं नकोस. डोळ्यांना लौकर आनंद दे.'

**माधवानें मालती** दृष्टीस पडेल ह्मणून चहूंकडे लक्ष्यपूर्वक पाहिलें; पण ती यावेळीं **श्रीपर्वता**वर होती, ती त्याला तेथें कोठून दिसणार! ती कोठें दिसत नाहीं असें पाहून खिन्न होऊन ह्मणाला, अरे, काय मी वेडा आहें! येथें कुठली **मालती** ! बकुलमालेला उद्देशून ह्मणाला, 'गडे माले, माझ्या प्रियेची तूं फार आवडती आहेस आणि

माझ्यावर तूं पुष्कळ उपकार केले आहेस तेव्हां तुझें मी स्वागत करतों. प्रियसखे बकुलमाले, ज्या वेळीं त्या माझ्या प्रियेला कामाचे वेग फार दुःसह झाले, आणि तिच्या देहाची काहिली होऊं लागली, त्यावेळीं त्या कमलपत्राक्षीला तुझा स्पर्श मात्र माझ्या आलिंगनासारखा वाटून त्याच्यावर तिणें आपले प्राण धारण केले.'

पुनः करुणापूर्वक त्या माळेकडे पाहून ह्मणाला, 'सखे बकुलमाळे, आनंदमिश्रित अशा कामज्वराला प्रदिप्त करणारीं आणि गाढ अनुरागरस ज्यांत भरला आहे व निरनिराळ्या वेळीं स्नेहाचे ठसे उमटविणारीं अशीं त्या सुंदरीच्या आणि माझ्या गळ्यांत जीं तुझीं गतागतं झालीं आहेत, ह्मणजे तूं तिच्या गळ्यांत गेलीस पुनः माझ्या गळ्यांत आलीस असे निरनिराळ्या वेळीं तूं जे हेलपाटे खाल्ले आहेस त्यांचें मला वरचेवर स्मरण होतें. हाय हाय!' असें बोलून ती माळ आपल्या छातीवर ठेवून **माधव** एकाएकीं मूर्च्छित झाला.

इतक्यांत **मकरंद** त्याच्याजवळ येऊन वारा घालीत ह्मणाला, 'गड्या, सावध हो, सावध हो. आतां कां दुःख करतोस?'

**माधव** सावध होऊन ह्मणाला, 'अरे **मकरंदा**, हें नाहीं का तूं पाहिलेंस? **मालतीचा** जीवर विशेष स्नेह आहे, ती ही बकुळीची माळ अकस्मात् कोठूनशी मला मिळाली. पाहिलें तर आसपास येथें कोणी नाहीं आणि ही माळ आली कशी? बरें पण तुला ही कोठून आली असेल, असें वाटतें बरें?'

**मकरंद** ह्मणाला, '**गड्या माधवा!** ही मोठी सन्मान्य

योगेश्वरी आली आहे. तिच्याकडून ह्या माळेची तुला प्राप्ति झाली.'

**सौदामिनी** जवळच उभी होती. **मकरंदानें** तिच्याकडे बोट दाखवून सांगितलें, तेव्हां **माधव** हात जोडून **सौदामिनी**ला ह्मणाला, 'आर्ये योगेश्वरि, प्रसन्न हो. माझी प्रिया जिवंत आहे कीं काय तें आधीं सांग.'

हें एकून **सौदामिनी** ह्मणाली, ' वत्सा **माधवा**, स्वस्थ हो. ती तुझी प्रिया जिवंत आहे. कांहीं काळजी करूं नको.'

याप्रमाणें **सौदामिनीनें मालती** जिवंत आहे, असें सांगितल्यावरून **माधवा**चे प्राण ठिकणावर आले. तो आनंदित झाला. नंतर **मालती** नाहींशी कशी झाली, व ती आहे कोठें, वगैरे सर्व हकीकत उभयतांनीं विचारल्यावरून **सौदामिनी** ह्मणाली, ' पूर्वीं **कराला** देवीच्या स्थानांत **अघोरघंट मालती**चा देवीला बली देत असतां ह्या **माधवानें** त्याला मारलें.

**सौदामिनी** पुढें हकीकत सांगणार होती, इतक्यांत **माधव** मध्येंच ह्मणाला, ' आर्ये पुरे पुरे. पुढचा वृत्तांत काय तो मला समजला.'

**मकरंद** ह्मणाला,' गड्या, तुला कसला वृत्तांत समजला?'

**माधव** ह्मणाला, ' अरे, दुसरा कसला ? त्या **अघोरघंटा**ची शिष्यीण **कपालकुंडला** जिवंत आहे. तिणें माझा सूड घेण्याकरितां **मालती**ला चोरून नेऊन तिचा नाश करण्याचा हेतु धरला होता, तो तिणें पूर्ण केला असेल आणखी काय ?'

**मकरंदाला** असेंच असेलसें वाटलें नाहीं, ह्मणून

त्याणें **सौदामिनीला—माधव** ह्मणतो, तें खरें काय? ह्मणून विचारलें. तेव्हां तिनें—होय, असेंच खरें, ह्मणून सांगितलें. वस्तुतः **सौदामिनीनें मालती** जिवंत आहे, ह्मणून आधींच सांगितलें, तेव्हां आतां भलतीसलती कल्पना घेण्याचें कांहीं कारण नव्हतें. तथापि आपल्या गुरूला मारणाऱ्याचें वैर उगविण्याकरितां प्रवृत्त झालेल्या **कपालकुंडले**सारख्या भयंकर स्त्रीच्या हातून **मालती**चा बचाव होण्याचा मुळींच संभव नाहीं. **सौदामिनी** आपलें शांतवन करण्याकरितां ती जिवंत आहे ह्मणून कदाचित् सांगत असेल. **मालति** तर मेलीच, आणि तिच्या गळ्यांतली माळ उगीच हिणें आम्हांला दाखविली असेल, असें समजून **मकरंद** ह्मणाला, 'शरदृतूंतली चंद्रिका सौंदर्यगुणाला मोहित होऊन कुमुदाकराशीं संगत झाली असली, तर ती गोष्ट फार उत्तम आहे; पण तेथें हे कोण दुर्दैव! वळवाच्या मेघावलीनें त्यांचा वियोग केला, हें काय?'

**माधव मालती**ला उद्देशून ह्मणाला, 'हे प्रिये **मालति**! हायहाय! तुझा फार वाईट परिणाम झाला. हे कमलमुखि, उत्पातकारक धूमकेतूनें चंद्रकलेला ग्रासून टाकावी, तशी तूं **कपालकुंडले**च्या हातून कशी ग्रासली गेलीस?'

**कपालकुंडले**ला उद्देशून ह्मणाला, 'भगवति **कपालकुंडले**! त्या माझ्या प्रियेसारखी उत्तम स्त्री ह्या जगांत उत्पन्न झाली, हें मोठें भाग्य समजून तूं तिचें लालन करावेंस. **पूतना**पणाचा स्वीकार करूं नयेस. तिचें कल्याण चिंतन कर. सुवासित फूल मस्तकावर धारण करावें, ही त्याची स्वाभाविक योग्यता आहे. तें पायानें तुडविणें हें सहसा योग्य नाहीं.'

विनाकारण दोघेही भ्रमिष्टासारखे दुःख करीत आहेत, असें पासून **सौदामिनी** ह्मणाली, 'वत्सा **माधवा**, उगीच दुःखित होऊं नको. ती चांडाळीण **कपालकुंडला** अत्यंत निर्दय आहे. जर मी तिची वैरीण तेथें नसतें तर तिनें तसें वाईट काम केलें असतें !'

हें ऐकून **माधव** आणि **मकरंद** अतिशय आभारी होऊन तिला नमस्कार करून ह्मणाले, 'आर्ये, तूं आम्हांवर मोठा प्रसाद केलास; पण आमच्यावर असा अनुग्रह करणारी तूं अशी कोण हें सांग.'

यावर **सौदामिनी** म्हणाली, 'बाळांनों, आतांच कशाला ? तें समजेल तुम्हांला.' उठून उभी राहून **माधवा**ला म्हणाली, 'हीं पहा मी यावेळीं गुरुसेवा, तपश्चर्या, मंत्र, तंत्र आणि योग, यांच्या मला ज्या सिद्धि प्राप्त झाल्या आहेत त्यांच्या योगानें ही आकर्षणि सिद्धि सोडतें.' असें बोलून **माधवाला** बरोबर घेऊन अकस्मात् आकाशांत उडून गेली.

**सौदामिनी** एकाएकीं अदृश्य झाली, हें पाहून **मकरंद** मोठ्या आश्चर्यानें ह्मणाला, 'हा काय चमत्कार ! विद्युल्लता चकचकाट पाडून अकस्मात् नाहींशी होते, तशी ही (**सौदामिनी**) नाहींशी झाली. आणि तिच्या बरोबर प्रियमित्र **माधव**ही नाहींसा झाला, हें काय ?' विचार करून ह्मणाला, 'दुसरें काय असणार ? त्या योगेश्वरीचा प्रभाव विलक्षण आहे. ती आपल्या सामर्थ्यानें पाहिजे तें करूं शकेल.'

कांहींवेळ विचार करून संशयांत पडल्यासारखा होऊन ह्मणाला, 'बरें पण हें आहे तरी काय ? हें कांहीं चांगलें आहे, कीं वाईट आहे, हें कांहीं मला समजत नाहीं.

प्रियमित्र **माधवाला** **सौदामिनी**नेंच नेलें असेल तर त्यांत कांहीं वाईट नाहीं; पण **कपालकुंडले**चें आणि हिचें संगनमत होऊन जर हा प्रकार झाला असेल, तर मात्र मोठा अनर्थ होईल. कांहीं असो. एकंदरींत यावेळीं मी अगदीं मूढ झालों आहें, यांत कांहीं संशय नाहीं. आणखीं एकाएकीं विलक्षण प्रकारचें आश्चर्यकारक असें त्या योगिनीचें सामर्थ्य पाहून मी त्यांतच निमग्न झाल्यामुळें मागच्या साऱ्या गोष्टीचें विस्मरण झालें. पण **माधव** नाहींसा झाल्यामुळें नवेंच एक भय उत्पन्न होऊन माझें मन जर्जर झालें आहे. एका क्षणांत **मालती** जिवंत आहे असें समजल्यावरून हा वेळपर्यंत ज्या मोहांत मी अगदीं निमग्न झालों होतों, तो नाहींसा झाला. आणि लगेच **माधव** नाहींसा झाल्यामुळें दुसरा एक मोह उत्पन्न झाला. परस्पर विरुद्ध अशा दोन गोष्टी एका समयीं झाल्यामुळें आनंद आणि शोक दोन्ही विकार माझ्या मनांत मिश्र होऊन गेले आहेत. असो.

यावेळीं येथें पुष्कळ विचार करीत बसलों, तरी कांहीं उपयोग नाहीं. भगवति **कामंदकी**आईला मंत्रतंत्र वगैरे साऱ्या विद्या ठाऊक आहेत. ह्या योगेश्वरीनें काय केलें हें कदाचित् तिला समजेल. आणि हीं योगेश्वरी तिच्या माहितीची देखील असेल. तेव्हां ह्या जंगलांत आह्मांबरोबरच ती आली होती. **मदयंतिका**, **लवंगिका** ह्या देखील तिच्या बरोबर असतील. **माधवा**बरोबर भटकत फिरूं लागल्यामुळें तिची चुकामुक पडली. तेव्हां आतां तिचाच शोध करीत जावें, आणि तिला भेटून झालेली सर्व हकीकत सांगावी, ह्मणजे त्यांतला काय तो खुलासा कळेल.'

असा विचार करून **मकरंद कामंदकीच्या** शोधाला निघाला.

---

## प्रकरण दहावें.

इकडे **कामंदकी, मदयंतिका,** आणि **लवंगिका,** ह्या तिघी **मालतीचा** शोध करीत चालल्या होत्या. **कामंदकी** डोळ्यांला पाणी आणून कळवळून ह्मणाली, 'वत्से **मालति,** यावेळीं कुठें आहेस! मला उत्तर कां देत नाहींस? लहानपणापासून माझ्या मांडीवर खेळण्यांत तुझें सारें आयुष्य गेलें. प्रतिक्षणाला अधिकाधिक गोड वाटणाऱ्या तुझ्या त्या लीला आणि तुझीं तीं गोड गोड भाषणें आठवून माझ्या शरीराला संताप होतो, व हृदय तटतटां तुटतें. आणखीं मुली **मालति,** लहानपणीं कधीं निष्कारण रडवें व कधीं हसरें असें—लहान लहान कोंवळ्या दांतांच्या कळ्यांनीं शोभणारें तुझें मुखकमल वरचेवर माझ्या डोळ्यांपुढें दिसतें.'

**लवंगिका** आणि **मदयंतिका** ह्मणाल्या, 'हाय हाय! प्रियसखे **मालति,** कोठें गेलीस? शिरसाच्या फुलासारख्या अत्यंत सुकुमार तुझ्या शरीरावर—तुला एकटी पाहून, दुष्ट दैवानें हा काय घाला घातला!'

**माधवाला** उद्देशून ह्मणाल्या, 'महाभागा **माधवा,** हा जीवलोक नुकताच आनंदकारक होऊन पुनः यावेळीं अगदीं ओसाड झाल्यासारखा तुला वाटत असेल!'

**कामंदकी** विशेष खेद पावून **माधव** आणि **मालती** यांना उद्देशून ह्मणाली, 'वत्सा **माधवा,** वत्से **मालति,** ज्या-

पासून क्षणक्षणीं नवा नवा रस उत्पन्न होत आहे, असा हा तुह्मां उभयतांच्या भेटीचा योग, कोमल वेल आणि वृक्ष यांचा समागम जसा वावटळीनें विघडवून टाकावा, तसा दुर्दैवानें विघडवून टाकला.'

**लवंगिका** दुःखाच्या वेगानें उन्मत्त झाल्यासारखी होऊन आपल्या हृदयाला ह्मणाली, 'मेल्या हृदया! तूं फारच क्रूर आहेस. मला वाटतें तुला पोलादानें घडविलें असेल. इतके दुःखाचे आघात झाले तरी तूं अद्याप फुटत नाहींस. एकदाचें फुटून जाशील तर बरें होईल.' असें बोलून ती ऊर बडवीत खालीं पडली.

तिची ती अवस्था पाहून **मदयंतिका** ह्मणाली, 'सखे **लवंगिके**, माझें सांगणें ऐकून घे. पहा, इतकी घाबरी होऊं नकोस. क्षणभर तरी स्वस्थ हो.'

**लवंगिका** ह्मणाली, 'सखे **मदयंतिके**, काय करूं? वज्रलेपानें बळकट जडविल्यासारखे हे माझे प्राण कांहीं केल्या मला सोडून जात नाहींत.'

**कामंदकी** ह्मणाली, 'बाळे **मालति**, जन्मापासून ही **लवंगिका** तुझी फार आवडती असून यावेळीं हिचे प्राण गळ्याकडे आले आहेत. तरी तूं ह्या बिचारीवर दया करीत नाहींस, हें काय? सांप्रत ही—चकचकीत दिसणाऱ्या दिव्याच्या काळीनें सोडलेल्या काळ्या तोंडाच्या वातीसारखी—तूं सोडल्यामुळें अगदीं निस्तेज दिसत आहे.'

आपल्याकडे पाहून ह्मणाली, 'बाळे, अग **मालति**, ह्या **कामंदकीला** तरी तूं कशी सोडून जात आहेस? अग **निर्दये**, ह्या माझ्या छातीच्या उबेनेंच तूं लहानाची थोर

झालीस, त्याची तुला कांहीं आठवण नाहीं काय? प्रत्यक्ष आईपेक्षां देखील माझ्यावर तुझा विशेष स्नेह आहे. आणि तो कां नसेल? आईच्या अंगावरचें प्यायचें सोडल्यापासून हस्तिदंताच्या खेळायच्या बाहुलीसारखी तुला मी एक खेळायचें साधन झालें होतें. अम्मळ थोर झालीस तेंव्हां तुला शिकवायचें तेंदेखील मींच शिकविलें. लहानाची थोर मींच केली. सर्व लोकांत श्रेष्ठ अशा गुणवान् वराला मींच दिली. अर्थात् यामुळें स्नेह अधिक असायचाच. असें असून यावेळीं तूं इतकी निर्दय कशी झालीस ?'

अगदीं म्लान होऊन ह्मणाली, 'चंद्रमुखि, सांप्रत तुझ्याविषयीं मी अगदीं निराश झालें आहें. माझे सर्व हेतु जागच्या जागीं नाहींसे झाले. अकारण ज्याचें तोंड हंसरें आहे व ज्याच्या झुलपाला आणि पिंपळपानाला पांढरे तीळ लावले आहेत, अशा मुलाला मांडीवर घेऊन खेळवीत आहेस, अशा स्थितींत तुला पहावें अशी माझी फार आशा होती; पण दुर्दैवानें तें पाहण्याचें माझ्या कपाळीं नाहींसें वाटतें!'

लवंगिका कामंदकीला ह्मणाली, 'आई, रागाऊं नका—मी असें ह्मणतें ह्मणून. पण खरोखर माझ्यानें आतां हे प्राण धारण करवत नाहींत. मी ह्या डोंगराच्या कड्यावरून घालून घेऊन ह्या असह्य दुःखाचा शेवट करितें. जन्मांतरीं त्या प्रियसखीचा नेहमीं सहवास घडेल असा मला आशीर्वाद मात्र द्या.'

हें ऐकून **कामंदकी** उसासा टाकून ह्मणाली, 'बाई **लवंगिके**, मी तरी यापुढें जिवंत राहीन, असें नाहीं. त्या लाडकीच्या वियोगानें मला आपल्या जिवाचा भार

झाला आहे. तिच्या भेटीची उत्कंठा आपणा दोघांलाही सारखीच आहे. आपल्या कर्माच्या गति कशा आहेत कोणास ठाऊक. तेव्हां परलोकांत तरी आपल्या भेटी होतीलच, ह्मणून तरी काय नेम आहे. **मालती** न भेटली तर न भेटो; पण प्राणत्याग केल्यानें संताप नाहींसा होईल, हें एक फळ निश्चयानें मिळेलच, याविषयीं कांहीं संशय नाहीं. तेव्हां तूं विचार केलास त्याप्रमाणें मीही ह्या दुःखकारक जिण्याचा शेवट करतें.'

हें ऐकून **लवंगिका**—आईच्या आज्ञेप्रमाणें माझी तयारी आहे, असें ह्मणून ती उठून उभी राहिली. **कामंदकी मदयंतिके**कडे दयेनें पाहून ह्मणाली, 'वत्से **मदयंतिके**, आतां तुझें कसें होईल?'

**मदयंतिका** उठून उभी राहून हात जोडून ह्मणाली, 'भगवति आई, आपण परलोकाला जाण्याला पुढें हो, ह्मणून मला आज्ञा करितां काय? हो पहा, मी तयारच आहें. हूं, हूं, चला.'

**मदयंतिके**ची तयारी पाहून **लवंगिका** तिला आडवी होऊन ह्मणाली, 'गडे **मदयंतिके**, रागावूं नको. माझें एवढें ऐक. तूं ह्या जीव देण्याच्या कामास प्रवृत्त होऊं नको. खुशाल आपल्या प्रियपतीशीं सुखाचा उपभोग कर; पण आह्मांला मात्र विसरूं नकोस हां.'

हें ऐकून **मदयंतिका** रागावून ह्मणाली, 'चल. पलीकडे हो! मी काय तुझ्या हुकमांतली नाहीं, असें कर आणि तसें कर ह्मणून सांगायला. माझ्या जिवाची मी मालकीण आहें. मला वाटेल तसें मी करीन.'

**मदयंतिका लवंगिके**ला झिटकारून पुढें निघाली. तेव्हां

**कामंदकी** ह्मणाली, 'अरेरे! ह्या बिचारीनें पक्का निश्चय केला खरा; पण आतां काय करावें?'

**मदयंतिका** कड्यावरून उडी टाकण्याचा निश्चय करून मनांत ह्मणाली, 'प्राणनाथा **मकरंदा!** तुला नमस्कार असो. जन्मजन्मांतरीं ह्या तुझ्या दासीला विसरूं नकोस.'

याप्रमाणें **लवंगिका, कामंदकी,** आणि **मदयंतिका** ह्या तिघीही कड्यावर चढल्या. **लवंगिका** ह्मणाली, '**कामंदकी** आई, **मधुमती** नदीच्या प्रवाहानें लपेटल्यासारखा दिसणारा, हा ह्या डोंगराचा कडाच आहे. आतां काय करायची ता आज्ञा करा.'

**कामंदकी** ह्मणाली, 'आतां काय विचार करायचा आहे? आपण योजलेल्या गोष्टीला उगीच विलंब लावण्यांत कांहीं अर्थ नाहीं.' याप्रमाणें बोलून तिघीही खोचणें खोवून खालीं उड्या टाकण्यास तयार झाल्या.

इतक्यांत **मकरंद** तेथें येऊन पोहोंचला. **कामंदकी, लवंगिका** आणि **मदयंतिका** या तिघीही **मधुमती** नदीच्या प्रवाहाकडे तोंडें करून आपआपल्या मनांत प्रियजनाचें ध्यान करीत उभ्या राहिल्या होत्या. **मकरंद** फिरत फिरत त्यांच्यामागून येत होता. **सौदामिनीनें** जो विलक्षण चमत्कार दाखविला, त्याच्या आश्चर्यांत तो निमग्न झाल्यामुळें त्याला वरचेवर त्याचीच आठवण होत होती. तो त्याच नादांत—हा काय विद्युल्लतेचा प्रभाव आहे कीं काय? एका क्षणांत माझे डोळे दिपवून पुनः नाहींसा झाला, हें काय? असें बोलत होता.

**मकरंदाचा** शद्ब ऐकून **कामंदकीनें** हा तोच असावा, असें ओळखलें. आणि मागें फिरून पाहते तों तो तिच्या दृष्टीस

पडला, तेव्हां तिला मोठें आश्चर्य वाटून हर्ष झाला. लगेच **लवंगिका** आणि **मदयंतिका** यांना तिनें मागें ओढून घेतलें आणि–**मकरंद** येतो आहे, तेव्हां कांहीं तरी तिकडचें वर्तमान समजेल; तर थोडा वेळ दम धरूं या, असें ह्मणाली.

**मालतीचा** नाश झाला, हें वर्तमान **भूरिवसूला** समजलें-च होतें. तेव्हां **भूरिवसु** आपल्या घरांतली सर्व मंडळी घेऊन–**सुवर्णबिंदु** नांवाचें **शंकराचें** स्वयंभु स्थान नद्यांच्या संगमावर असल्याचें पूर्वीं वर्णन केलें आहे, तिकडे प्राणत्याग करण्याकरितां निघाला होता. ती मंडळी **मकरंदा**ला दुरून दिसली तथापि त्यांचें समाधान करण्यासारखी गोष्ट अद्याप कांहीं झालें नाहीं, ह्मणून तो तसाच पुढें निघाला.

**लवंगिका** आणि **मदयंतिका** यांनाहीं **भूरिवसु** वगैरे मंडळी प्राणत्याग करायला निघाली, हें दृष्टीस पडलें.त्या **कामंदकीला** ह्मणाल्या,'क्षणमात्रांत **मालती** आणि **माधव** यांचें दर्शन होण्याची आशा उत्पन्न होते, आणि क्षणांत पुनः नाहींशी होते; हें आहे तरी काय ? हे लोक हाय हाय करीत जात आहेत, त्यावरून यांना त्यांच्या दर्शनाविषयीं निराशा झाली असावी असें वाटतें.'

इतक्यांत **मकरंद** त्या तिघींच्या अगदीं जवळ येऊन पोहोंचला. तरी **भूरिवसु** इत्यादि मंडळी प्राणत्याग करायाला निघाली, त्यांच्याकडें त्याचें लक्ष्य लागलें होतें, यामुळें परस्परांची हकीकत विचारण्याला किंवा ऐकण्याला सवडच मिळाली नाहीं. या तिघीही त्या मंडळीकडे टक लावून पहात उभ्या

राहिल्या होत्या. **भूरिवसु** व त्याच्या बरोबर इतर सर्व मंडळी प्राणत्याग करतात याबद्दल त्यांना अतिशय दुःख झालें होतें.

**सौदामिनी माधवाला** घेऊन गेली, हें पूर्वीं सांगितलें-च आहे. ती आकाशमार्गानें एका क्षणांत **श्रीपर्वतावर** गेली, आणि तेथें दुःखित होऊन बसलेल्या **मालतीला** **माधवाच्या** खांद्यावर बसवून योगसामर्थ्यानें दोघांलाही **श्रीपर्वतावरून** क्षणमात्रांत **कामंदकी** ज्या ठिकाणीं होती त्या ठिकाणीं तिणें पोहोंचविलें. **सुवर्णबिंदु** नांवाचें स्वयंभु स्थान तेथून जवळच होतें.

**मालती माधवाच्या** खांद्यावर बसून आकाशमार्गानें येत होती, यामुळें तिला खालचा सर्व प्रदेश दिसत होता. आपल्याकरितां आपला पिता **भूरिवसु** व इतर आप्तजन प्राणत्याग करण्याच्या तयारींत आहेत, हें पाहून ती तेथूनच—'बाबा, अहो बाबा ! नको नको. असें करूं नका. मी तुमच्या दर्शनाविषयीं उत्सुक आहें. प्र-सन्न व्हा, आणि मला लौकर भेटा. माझ्याकरि-तां साऱ्या पृथ्वीवर प्रख्यात व सर्व संपत्तीचें माहेर-घर अशा आपल्या शरीराचा त्याग करण्याविषयीं कसें प्रवृत्त झालां ? हाय हाय ! खरोखर मी मोठी निर्दय आहें. तुह्मांला माझ्याविषयीं मुळींच काळजी नाहीं, असें मला वाटलें होतें; पण तुह्मी इतकी ममता करतां हें पाहून मला—मनांत तसे वाईट तरंग आले, याचें फार वाईट वाटतें,' असें ती म्हणाली.

**भूरिवसु** इत्यादि आपले आप्त प्राणत्याग करायला ज्या ठिकाणीं तयार झाले होते, त्या ठिकाणीं एकदम जाऊन बापाला भेटावें, असें **मालतीच्या** मनांत होतें व **माधवाला**-

ही तें इष्ट होतें. पण सौदामिनीनें आपल्या योगसामर्थ्यानें त्या दोघांना कामंदकी ज्या टेंकडीवर उभी होती तेथें उतरण्याची योजना केली होती यामुळें त्यांचा कांहीं इलाज चालला नाहीं.

मालतीनें आपल्या बापाला उद्देशून जो आक्रोश केला तो—अगदीं जवळ आल्यामुळें—कामंदकी, मकरंद इत्यादिकांना ऐकूं आला; पण भूरिवसूला ऐकूं आला नाहीं. आपल्याच्यानें जवळ जाववत नाहीं व आपण जिवंत असतां आप्तमंडळी व्यर्थ प्राणत्याग करीत आहे, हें पाहून मालती दुःखानें मूर्च्छित झाली.

मालतीचा आक्रोश ऐकून कामंदकी ह्मणाली, 'वत्से मालति, मरून दुसरा जन्म घेऊन आल्याप्रमाणें यावेळीं तूं मला भेटलीस; पण राहूच्या तोंडांतून सुटलेल्या चंद्रकलेला ग्रासायाला जसा केतु तयार होतो, तसा आप्तजन प्राणाचा त्याग करीत आहेत, हा एक दुसरा अनर्थ उपस्थित झाला आहे!'

लवंगिका आणि मदयंतिका मालतीला पाहून तिला भेटण्याविषयीं फार उत्कंठित झाल्या होत्या. इतक्यांत मूर्च्छित झालेल्या मालतीला खांद्यावर घेतलेला माधव जमिनीवर उतरला.

तो ह्मणाला, 'हें मोठेंच दुःख! ही (मालती) एवढा मोठा कठीण प्रवास करून आली आणि आतां येथें सुखरूप पोहोंचून—प्राण राहतो कीं जातो, अशी हिची स्थिति झाली, याला करावें तरी काय? चहूंकडून पाठीस लागलेल्या दैवाला अडविण्याविषयीं कोण समर्थ होईल!'

इतक्यांत मकरंद एकाएकीं पुढें होऊन माधवाला

ह्मणाला, 'सख्या **माधवा**! तूं आलास, हें फार चांगलें झालें; पण ती योगिनी (**सौदामिनी**) कोठें गेली ?'

यावर **माधव** ह्मणाला, 'गड्या, **श्रीपर्वता**वरून मोठ्या वेगानें मी जो उडालों तो येथें आलों. तीही बरोबर होती; पण मध्येंच कोठें नाहींशी झाली. त्यानंतर हावेळपर्यंत ती माझ्या दृष्टीस पडली नाहीं.'

हें ऐकून **कामंदकी** आणि **मकरंद** फारच चकित झाले. **मकरंद** आणि **माधव** यांनीं तिची जी हकीकत सांगितली तीवरून ती कोणी तरी योगिनी असावी, असें **कामंदकी**च्या लक्ष्यांत आलें. तरी अमुकच असेल, असें हावेळपर्यंत तिच्या लक्ष्यांत आलें नाहीं. यामुळें निष्कारण एवढा अनुग्रह करणारी ही कोण असावी ? याचें तिला मोठें गूढ पडलें होतें. तेव्हां आपल्यावर उपकार करणाऱ्या अशा त्या योगिनीनें पुनरपि दर्शन देऊन अनुग्रह करावा, अशी इच्छा करून **मकरंद** आणि **कामंदकी** हीं आकाशाकडे तोंडें करून हात जोडून ह्मणालीं, 'हे देवि, निष्कारण एवढा अनुग्रह करणारी तूं कोण आहेस ती पुनः दर्शन देऊन ह्या संकटांतून आमचें रक्षण कर. उगीच गुप्त कां झालीस ?' असें बोलून आकाशाकडे दृष्टि लावून योगिनीची प्रार्थना करीत सर्व उभे राहिले.

**मालती** कांहीं केल्या सावध होत नाहीं, असें पाहून **लवंगिका** आणि **मदयंतिका** ह्मणाल्या, 'गडे **मालति**! तूं आमची प्रियसखी ना? मग असें कां बरें करतेस ? हावेळपर्यंत आह्मी तुझ्याकरितां किती दुःख करीत होतों. दैवयोगानें पुनः तुझें दर्शन झालें असून तूं आमच्याशीं एक शब्ददेखील बोलत नाहींस हें काय ? '

इतक्यांत **मालतीला** दुःखाच्या ओढी आल्यासारख्या होऊन एकवेळ लांब श्वास सोडून एकाएकीं तिचा श्वास बंद झाला. हें पाहून **मदयंतिका** आणि **लवंगिका** घाबरून **कामंदकीला** ह्मणाल्या, 'आई आई, हिची काय अवस्था झाली आहे ती पहा. फार वेळ पोटांत सांठविलेला हिचा श्वास एकदम बंद झाला. हे अमात्य **भूरिवसो**! हे प्रियसखि **मालति**! तुम्ही दोघेंही एकमेकांच्या मरणाला कारण झालां.'

**मालतीची** ती अवस्था पाहून—हा वत्से **मालति**! हा प्रिये! हा प्रियसखि! असें बोलून **कामंदकी, माधव,** आणि **मकरंद** एकदम मूर्च्छित झालीं.

इतक्यांत बारीक बारीक पाऊस पडूं लागला. त्याच्या थंडाव्यानें प्रथम **कामंदकी** सावध झाली. ती आकाशाकडे पाहून ह्मणाली, 'मेघाला फोडून खालीं पडणारी ही उदकाची वृष्टि आम्हांवर उपकार करण्याकरितांच कीं काय यावेळीं पडूं लागली हें फार चांगलें झालें.'

क्षणमात्रानें **मालतीही** अम्मळ सावध झाली इतक्यांत **माधव** आणि **मकरंद** सावध झाले. **मालतीच्या** शरीरांत प्राण आले हें पाहून **माधवाच्या** जिवांत जीव आला. तो उसासा टाकून ह्मणाला, 'ही सावध झाली, असें वाटतें. होहो! लांब लांब श्वास येत असल्यामुळें हिचे स्तन कंपायमान झाले आहेत. हिचें उरस्थल आतां ऊन लागूं लागलें आहे. डोळेही पहिल्यासारखे साफ झाले आहेत. तसेंच मूर्च्छा गेल्यामुळें प्रभातकालीं हळू हळू उमलणाऱ्या कमळाप्रमाणें हिचें मुख टवटवीत दिसत आहे.'

**सौदामिनी**, **माधव** आणि **मालती** यांना सोडून मध्येंच नाहींशी झाली, असें वर सांगितलेंच आहे. ती नाहींशी होण्याचें कारण दुसरें कांहीं नसून **भूरिवसु** **मालती**करितां प्राणत्याग करायला तयार झाला आहे, हें आकाशांतून तिला दिसलें, म्हणून प्रथम **भूरिवसू**ला वाचविण्याकरितां ती **सूवर्णबिंदू**च्या स्थानाकडे गेली. तेथें **भूरिवसू**ची प्राणत्याग करण्याची अगदीं तयारी झाली होती. **मालती**चा शोध लागत नाहीं म्हणून **भूरिवसु** अग्नींत उडी टाकण्याला तयार झाला होता. आपला मुख्य प्रधान असें साहस करण्याला तयार झाला आहे, हें ऐकून **राजा** व लटुपटीचा जांवई झालेला खुषमस्कऱ्या **नंदन** हेही तेथें आले होते. ते **भूरिवसू**ला नको नको म्हणून सांगत होते; पण त्याणें त्यांचें ऐकलें नाहीं; शेवटीं **राजानें** त्याच्या पायां पडून सांगितलें, तथापि त्याणें अग्नीला प्रदक्षिणा करून—'देवा अग्निनारायणा, तूं आम्हां प्राणिमात्रांचे हेतु पूर्ण करणारा आहेस, मला दुसरें कांहीं नको, ( डोळ्यांत अश्रु आणून ) माझी ती लाडकी पोर ( **मालति** ) एकवेळ पुनः मला दिसेल असें कर म्हणजे झालें,' अशी प्रार्थना करून अग्नींत उडी टाकली.

**सौदामिनी** आकाशांतून हें पहातच होती. ती झटकन् तेथें येऊन पुढें झाली, आणि तिणें **भूरिवसू**ला वरच्यावर उचलून पुनः **राजा**जवळ नेऊन ठेविलें, आणि **मालती** जिवंत आहे, असें सांगून त्याचें समाधान केलें. नंतर **कपालकुंडलेनें** काय अनर्थ मांडला होता, वगैरे सर्व हकीकत तिनें **राजाला** सांगितली. ती ऐकून सर्वांना मोठें

आश्चर्य वाटलें. **मालती नंदना**ला मिळावी, असा **राजा**चा हेतु होता, तो सफळ झाला नाहीं व **नंदना**ची बहीण **मदयंतिका** हिला **मकरंदा**नें उपटली. या दोन्ही गोष्टी त्याला विशेष खेदकारक झाल्या होत्या. तरी **माधवाचें** व **मकरंदाचें** शौर्य, त्यांचें साहस, व **मालती** आणि **मदयंतिका** यांच्यावर त्यांचें प्रेम पाहून **राजा** फार खुष झाला होता. **माधव** आणि **मकरंद** यांची अद्याप पुर्ती खात्री झाली नव्हती ह्मणून त्याच वेळीं **नंदना**च्या व **भूरिवसू**च्या समक्ष त्याणें **मालती** आणि **मदयंतिका** यांचे झालेले विवाह आपणास मान्य आहेत, अशा अर्थाचें पत्र लिहून देऊन **सौदामिनी**ला लौकर त्यांच्याकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यांचा निरोप घेऊन **सौदामिनी** आकाशांत उडून गेली.

**सौदामिनी** तेथून निघाली ती परत **कामंदकी** वगैरे मंडळी ज्या टेंकडीवर होती त्यांच्याजवळ आली. **राजा** आणि **नंदन** नको ह्मणत असतांही जीव देण्याला तयार झालेल्या **भूरिवसू**ला आपण वांचविलें, असें ती आपल्याशींच बोलत होती. तें ऐकून व आकाशाकडे पाहून आनंदानें **मकरंद कामंदकी**ला ह्मणाला, '**कामंदकी**-आई, इकडे पहा! इकडे पहा! ज्या योगिनीनें **मालती**ला वांचविलें, तीच ही आपल्या वेगानें मेघांला कापीत आकाशमार्गानें लौकर इकडे येत आहे. आणि ही तिची वाणीरूप अमृताची वृष्टि होत आहे.'

हें ऐकून **कामंदकी**ला फार आनंद झाला. **भूरिवसू**ला आपण जिवंत केलें, हे **सौदामिनी**च्या तोंडचे शब्द ऐकून **मालती** सावध झाली. ती सावध झाली आहे, असें पाहून **कामंदकीनें** आनंदाश्रूंची वृष्टि करीत करीत

पायांवर उभी ठेवीत होती, पण तिला वर उचलून घेऊन **कामंदकीनें** तिचें मस्तक हुंगलें. आणि तिला आशीर्वाद देऊन ह्मणाली, 'मुली, फार दिवस जिवंत रहा आणि ह्या तुझ्या हृदयवल्लभाला (**माधवाला**) जिवंत ठेव! हे तुझे सर्व आप्तजन जिवंत राहोत! बर्फासारख्या शीतल शरीरानें मला आणि ह्या तुझ्या प्रियसख्या **लवंगिका** आणि **मदयंतिका** यांना आलिंगन देऊन सावध कर.'

**मालती** सावध झाली असें पाहून **माधव मकरंदा**ला ह्मणाला, 'गड्या **मकरंदा**, आतां मात्र मला जिवंत राहण्याला हें जग योग्य झालें. आतां फार वर्षें वाचावें असें वांटतें!'

हें ऐकून आनंदानें **मकरंद** ह्मणाला, 'होय असें खरें.'

**लवंगिका** आणि **मदयंतिका मालतीला** ह्मणाल्या, 'प्रियसखे, तुझी भेट होईल, अशी आह्मांला आशा देखील नव्हती. असें असून देवानें तुला दाखविलें, हें फार चांगलें झालें. आतां एकदां आह्मांला कडकडून भेट ह्मणजे हावेळपर्यंत दुःखानें होरपळलेलें आमचें अंग निवेल.'

**मालतीनें** त्या दोघींलाही प्रेमानें आलिंगन दिलें. तिघीही एकमेकांवर प्रेमाश्रूंची वृष्टि करीत एकमेकींच्या मानेवर मान टाकून फार वेळ सखीसमागमाच्या सुखाचा उपभोग करीत होत्या.

**मालती** नाहींशी झाली कशी, व पुनः भेटली कशी, यासंबंधानें **कामंदकी**ला हावेळपर्यंत मुळींच कांहीं माहीत नव्हतें. यासाठीं तिणें **माधव** आणि **मकरंद** यांना-





हा प्रकार कसा काय झाला, ह्मणून विचारलें. तेव्हां ते दोघे आकाशमार्गानें येणाऱ्या **सौदामिनी**कडे बोट दाखवून म्हणाले, 'आई **कामंदकि**, **कपालकुंडले**च्या रागानें आह्मी ह्या आपत्तींत पडलों होतों. आणि त्यापासून ह्या योगेश्वरीनें आम्हांला मोठ्या शर्थीनें वर काढलें.'

हें ऐकून **कामंदकि** समजली. ती म्हणाली, 'हांहां! आतां माझ्या लक्ष्यांत आलें. त्या **अघोरघंटा**ला मारलें त्याचें हें फळ. ती चांडिका **कपालकुंडला** आपल्या गुरूचा सूड उगवायला तयार झाली होती.'

**लवंगिका** आणि **मदयंतिका** यांना ही हकीकत ठाऊक नव्हती. त्या म्हणाल्या, 'हें बाई मोठेंच आश्चर्य! अत्यंत कठोर झालेल्या दैवानें परिणाम चांगला केला, हें बरें झालें.'

इतक्यांत **सौदामिनी** आकाशांतून खालीं उतरली, आणि **कामंदकी**जवळ जाऊन म्हणाली, 'भगवति **कामंदकि**, फार दिवसांची तुमची मैत्रीण आणि शिष्यीण मी तुम्हांला नमस्कार करीत आहें.'

हें ऐकून **कामंदकी**ला—फार दिवसांनीं तिचें दर्शन झाल्यामुळें व तिनें इतक्या जुन्या नात्याची आठवण ठेवून ऐन प्रसंगीं विशेष साह्य केलें, ह्मणून—मोठें आश्चर्य वाटलें. तिनें ही **सौदामिनी**च असें ओळखून तिच्या भेटीपासून आपल्याला विशेष आनंद झाल्याचें प्रदर्शित केलें.

**माधव** आणि **मकरंद** यांना हावेळपर्यंत **सौदामिनी**नें साह्य केलें, याचें मोठें गूढ पडलें होतें. कारण, चांगले लोक दयेनें किंवा परोपकारबुद्धीनें प्रसंगीं कोणालाही साह्य करतात; तथापि त्यांस इतकें विशेष अगत्य नसतें.

**कपालकुंडला** निरपराधी **मालती**चा वध करीत होती, तिच्यापासून **सौदामिनीनें** तिला सोडवून घेतलें. हें कदाचित् तिच्या भलेपणाचें कृत्य असें मानतां येईल; पण तिनें पुढें जी इतकी खटपट केली, तिला कांहीं तरी योग्य कारण असलेंच पाहिजे, असा त्यांला संशय येणें अगदीं साहजिक आहे.

वर सांगितलेल्या गूढाचा यावेळीं खुलासा झाला. **सौदामिनीनें कामंदकी**ला नमस्कार करतेवेळीं मैत्रिणीचें व शिष्यीणीचें नातें प्रकट केलें. त्यावरून **माधव** आणि **मकरंद** विस्मयानें ह्मणाले, 'हो, आतां बराबर जुळलें. **कामंदकी** आईची ही योगेश्वरी अगदीं प्रथमची शिष्यीण आहे; आणि ह्मणूनच हिच्याकडे तिचा एवढा पक्षपात आहे. यावरून पुढें तिनें ज्याज्या कांहीं गोष्टी केल्या त्या सर्व योग्यच आहेत. हावेळपर्यंत आपल्याला याचें मोठें गूढ पडलें होतें. पण आतां हिचा इतका पक्षपात असण्याचें कारण काय तें समजलें.'

इकडे **सौदामिनी**ची पुरती ओळख पटल्यावरून व तिनें उत्तम कार्य केल्यावरून **कामंदकि** फार संतुष्ट झाली, आणि प्रेमानें तिला भेटायला तयार होऊन ह्मणाली, 'अग बाई, फार दिवसांनीं दिसलीस. आधीं इकडे ये! बहुत लोकांना प्राणदान करून यावेळीं तूं जो कांहीं पुण्याचा भार धारण केला आहेस, त्याच्या योगानें आधींच मला आनंद झाला आहे. तरी पण आलिंगन देऊन त्याची वृद्धी विशेष कर.'

**सौदामिनी** नमस्कार करीत आहे असें पाहून ह्मणाली, 'पुरे पुरे, आतां ते नमस्कार बिमस्काराचे शिष्टाचार न-

कीत. आणखीं तूं मला आतां नमस्कार करावास हें योग्य ही नाहीं. सांप्रत तूं जीं कांहीं अमानुष कृत्यें केलीं आहेस, त्यांच्या योगानें केवळ आह्मालाच नव्हे, तर साऱ्या जगाला तूं वंद्य झाली आहेस. तुझ्याशीं पूर्वी जो कांहीं परिचय होऊन स्नेहाचें बीज पेरलें गेलें होतें, त्याचाच हा एवढा मोठा विस्तार वाढला.' असें बोलून **कामंदकीनें सौदामिनीला** आलिंगन दिलें.

**मदयंतिका** आणि **लवंगिका** यांनाही **सौदामिनीची** कांहीं ओळख नव्हती; पण यापूर्वीं **कामंदकीच्या** बोलण्यांत वरचेवर तिचें नांव येत होतें. त्यावरून—हीच ती, असें समजून त्या ह्मणाल्या, '**कामंदकी**आई, केव्हां केव्हां **सौदामिनी** नांवाची आपली एक शिष्यीण आहे असें आपण ह्मणत होतां, तीच ही **सौदामिनी** बाई का ?'.

यावर **मालती** ह्मणाली, 'खरेंच गड्यांनों, हिनें **कामंदकी**आईच्या पक्षपातानें **कपालकुंडलेची** छी थू करून मला आपल्या मठांत नेलें, आणि अगदीं **कामंदकी**-आईसारखें माझें समाधान केलें. व माझ्यापासून बकुळीची माळ मागून घेऊन तिच्या खुणेनें तुह्मां सर्वांला वांचविलें.'

हें ऐकून **लवंगिका** आणि **मदयंतिका** ह्मणाल्या, 'हो बाई ! आह्मांला ही **कामंदकी**आईसारखीच वाटते. ही आमची धाकटी आई आमच्यावर विशेष प्रसन्न झाली आहे यांत कांहीं संशय नाहीं.'

**माधव** आणि **मकरंद** ह्मणाले, 'चिंतामणी[१] इच्छित

१ कल्पवृक्ष व कामधेनु हे जसे इच्छित हेतु पूर्ण करतात अशी समजूत आहे, तसाच एक चिंतामणीही असल्याची समजूत असून तोही इच्छित हेतु पुरवितो, असें प्राचीनकवि मानतात.

हेतु पूर्ण करितो, तथापि चिंतन करण्याची तरी अपेक्षा असते. मनांत कोणत्याही गोष्टींचें चिंतन केलें नाहीं तर तो ती देत नाहीं. पण ही **सौदामिनी**आई चिंतामणीपेक्षांही विशेष आहे, असें ह्मटलें पाहिजे. कारण, ज्या गोष्टी होतील अशी आह्मांस कल्पना देखील झाली नव्हती, त्या गोष्टी हिनें घडवून आणल्या!'

**कामंदकी, माधव, मकरंद, लवंगिका** इत्यादिकांनीं **सौदामिनी**चे अतिशय आभार मानून मोठ्या प्रेमानें व पूज्यभावानें जो तिचा सत्कार केला, त्यानें ती मोठी उपकारी झाली. तिला त्यांचें सौजन्य पाहून एक प्रकारें मोठी लाज वाटूं लागली. उघडच आहे, सज्जनानें दुसऱ्याचें केवढें ही मोठें काम केलें तरी त्याचें त्याला कांहींच वाटत नाहीं, व त्याबद्दल दुसऱ्यानें आभार प्रदर्शित केले, तर तें देखील त्याला सहन होत नाहीं.

**सौदामिनी** सद्गदित होऊन **कामंदकी**ला ह्मणाली, 'भगवति! **पद्मावती** नगरीचा अधिपति राजा **चित्रसेन** यानें हें पत्र **माधवाला** पाठविलें आहे. झालेल्या गोष्टीवरून आनंदित झालेल्या **नंदनानें** या गोष्टीला पूर्ण अनुमोदन दिलें असून **भूरिवसू**च्या देखत हें पत्र लिहून दिलें आहे. यांत काय आहे तें पाहून घ्या.'

**सौदामिनीनें** राजाचें पत्र **कामंदकी**च्या हातांत दिलें, तें उघडून **कामंदकीनें** वाचलें. त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर होता—

"स्वस्ति श्रीनिखिलगुणगणालंकृत बाहुबलविजित रणधुरंधर मंत्रिसुत चिरंजीव **माधव** यांस—अनेक आशीर्वाद. **पद्मावतीश्वर चित्रसेन** राजा तुह्मांस अशी आज्ञा करीत

आहे कीं, उत्तम गुणवान् पुरुषांत श्रेष्ठ आणि प्रख्यात कुलांत उत्पन्न झालेले जे तुह्मी ते सर्व व्यसनांपासून केवळ आपल्या प्रभावानें मुक्त झालां. तुमचे अप्रतिम गुण व शौर्य पाहून मी फार खुष झालों आहें. जिला मी आपली कन्या मानली, त्या **मालतीला** तुह्मीं वरलें, ही गोष्ट मला संमत झाली असून मीं तुह्मांला आपले जांवई करून घेतलें आहे.

तसेंच तुमच्यावर माझें जें कांहीं प्रेम आहे, त्या प्रेमाला अनुसरूनच तुमचा प्रियमित्र—**मकरंद** याला—जिच्यावर पूर्वींपासून त्याचा अनुराग होता ती–**मदयंतिका** आह्मीं मोठ्या संतोषानें केवळ तुमच्या प्रीतीकरितां दिली आहे. व तुह्मां उभयतांचें मुलींसहवर्तमान अभिनंदन करीत आहों. तर आह्मांला भेटून संतुष्ट करावें. कळावें. इत्याशीः सहस्रमविरतम् "

**सुवर्णबिंदुस्थान** }
वैशाखकृष्ण १० }

पद्मावतीश्वर राजा,
**चित्रसेन.**

हें पत्र वाचून **कामंदकी माधवाला** ह्मणाली, वत्सा '**माधवा, राजानें** हें काय लिहिलें आहे, तें नीट ऐक.'

**माधव** ह्मणाला, 'हो, ऐकलें. सांप्रत आह्मीं कृतकृत्य झालों. आमचे सर्व हेतु पूर्ण झाले.'

ज्याप्रमाणें मनांत होतें त्याप्रमाणें विवाह झाला, व दुसरीं अनेक संकटें आलीं त्यांचाही परिहार झाला, तरी **मालतीचें** मन ठिकाणावर नव्हतें. कारण, ह्या चोरून मारून ज्या गोष्टी झाल्या त्यांच्या संबंधानें **राजा** रागावेल, व पुढें आपल्या बापाला काय काय दुःखें भोगावीं लागतील याची तिच्या मनांत मोठी धास्ती होती, ती यावेळीं

दूर झाली. **कामंदकीनें** राजाचें पत्र वाचलें. त्यांतील अभिप्राय समजून **मालती** ह्मणाली, 'माझ्या हृदयांत हा-वेळपर्यंत जो शंकेचा कांटा सलत होता, तो आतां स-मूळ नाहींसा झाला, हें फार चांगलें झालें.'

**लवंगिका** ह्मणाली, '**मालती** आणि **माधव** या दो-घांचेही मनोरथ आतां पूर्णपणें सफल झाले, हें फारच उत्तम झालें. माझा जीव बिनघोर झाला.'

**अवलोकिता**, **बुद्धरक्षिता**, आणि **कलहंसक** हीं ति-घेंही **सुवर्णबिंदू**कडे जी मंडळी गेली होती, त्यांच्या बरोबर गेलीं होतीं. **राजानें**, **माधव** आणि **मकरंद** यांच्यावर, अनुग्रह केल्याचें वर्तमान समजल्यावरून मोठ्या आनंदानें नाचत नाचत तीं तिघेंही इकडे आलीं. त्यांना पाहून स-र्वांला मोठा आनंद झाला. तिघांनींही प्रथम **कामंदकी**-ला नमस्कार करून **माधवाचा** जयजयकार केला. आ-नंदानें नाचणाऱ्या त्या तिघांलाही पाहून साऱ्यांना मोठें आश्चर्य वाटलें. तेव्हां **लवंगिका** ह्मणाली, 'ह्या अशा वेळीं सर्व प्रकारें आनंद झाला असल्यामुळें हीं नाचतात, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. सर्वांनाही अतिशय हर्ष व आश्चर्य झालेंच पाहिजे.'

**कामंदकी** ह्मणाली, 'हो हो! तूं ह्मणतेस तसें खरें. अशी आश्चर्यकारक गोष्ट कधींही कोणीं पाहिली नसेल, हींत सर्व रसांचा समावेश झाला आहे.'

**सौदामिनी** ह्मणाली, 'ही गोष्ट फारच चांगली झाली. अमात्य **भूरिवसु** आणि **देवरात** यांचा, परस्परांचें व्याह्यांचें नातें जुळावें, असा फार दिवसांचा हेतु होता, तो एकदांचा पूर्ण झाला.'

**मालती**ला हें बोलणें अम्मळ विपरित वाटलें. कारण, **भूरिवसू**च्या मनांत हा संबंध जुळवायचा होता, तरी बाह्यात्कारें त्याचें आचरण ह्याच्या विरुद्ध होतें. व **माल-तीला** अंतस्थ कारस्थान मुळींच माहीत नव्हतें; ह्मणून **सौदामिनीचें** भाषण ऐकून ती मनांत ह्मणाली, हें मात्र मला खरें वाटत नाहीं.

**माधव** आणि **मकरंद सौदामिनी**च्या भाषणाचें कौतुक मानून ह्मणाले, 'खरी गोष्ट निराळीच आहे. आणि आतां **सौदामिनी**आईनें निराळ्याच रितीनें तिचें वर्णन केलें.'

हें ऐकून **लवंगिका** हळूच **कामंदकी**च्या कानांत ह्म-णाली, 'आतां येथें काय सांगणार? हा **माधव** आणि **मकरंद** यांचा प्रश्न अम्मळ कठीण आहे.'

**कामंदकी** तिला ह्मणाली, 'छे! आतां त्यांबद्दल कांहीं शंका ठेवण्यास नको. **मालती**विषयीं तर शंका नव्ह-तीच! पण **मदयंतिके**विषयीं **नंदन** काय करील, याची मोठी काळजी होती; पण तीही आतां नाहींशी झाली.'

**कामंदकी**ही **माधव** आणि **मकरंद** यांना ह्मणाली,' खरी हकीकत दुसरीच होती,असें तुह्मी ह्मटलें तें योग्य नाहीं. पूर्वीं आह्मी **कुंडिन**पुरांतल्या पाठशाळेंत अध्ययन करीत होतों,त्या-वेळीं माझ्या आणि ह्या **सौदामिनी**च्या समक्ष **देवरात** आणि **भूरिवसु** यांची,परस्परांचे व्याही होण्याविषयीं, प्रतिज्ञा झाली होती; पण **राजा**ची मर्जी राखण्याकरितां **भूरिवसूचा** बाह्या-त्कारें निराळाच बेत चालला होता, हें तुम्हांला माहीतच आ-हे. यावरून **सौदामिनीनें** सांगितलें त्यांत कांहीं खोटें नाहीं.'

हें ऐकून **मालती**च्या मनांत संशय होता, तो निवृत्त झाला; व त्यांनीं बाह्याकारें जी मसलत चालविली होती,

तिचें तिला मोठें आश्चर्य वाटलें. **माधव** आणि **मकरंद** यांचीही शंका दूर झाली. ते चकित होऊन ह्मणाले, 'अंतर्गत हेतु निराळा असून बाह्यात्कारीं दुसरेंच स्वरूप दाखवावयाचें अशा प्रकारचीं थोरांचीं कारस्थानें फार विलक्षण असतात!'

याप्रमाणें **माधव** आणि **मकरंद** यांच्या विवाहाविषयीं **कामंदकीनें** जी एवढी मोठी खटपट आरंभिली होती, ती निर्विघ्नपणें शेवटास गेल्यावरून संतुष्ट होऊन ती **माधवाला** ह्मणाली, 'वत्सा **माधवा,** तुमचा विवाह करावयाचा अशी जी गोष्ट पूर्वीं निश्चित करून ठेविली होती, ती दैवाच्या अनुकूलतेनें आणि माझ्या प्रयत्नानें व माझ्या शिष्यिणींनीं या कामीं अतिशय मेहनत घेतल्यामुळें, शेवटास गेली. तुझा प्रियमित्र **मकरंद** यालाही **मदयंतिके**चा लाभ झाला; इतकेंही करून **राजा** आणि **नंदन** दोघेही खुष झाले. आतां याहून तुझें दुसरें काय प्रिय करावयाचें आहे तें सांग.'

हें ऐकून **माधव** आनंदानें **कामंदकीला** नमस्कार करून ह्मणाला, 'याहूनही आणखी प्रिय म्हणून कांहीं व्हावयाचें राहिलें आहे? तथापि आपण आज्ञा करितां म्हणून मागतों. भगवतीच्या चरणकमलाच्या प्रसादानें इतक्या गोष्टी होवोत. सत्पुरुष नेहमीं चांगल्या कृत्यांत निमग्न असोत! पापाचा त्यांना संपर्क देखील न होवो! राजे सार्वकाळ स्वधर्मनिष्ठ होऊन पृथ्वीचें पालन करोत! मेघ यथाकालीं वृष्टि करोत! मेघांच्या दर्शनानें सर्व लोक आनंदित होतात, तसे आपआपल्या प्रिय मित्रांच्या दर्शनानें सर्व लोक आनंद पावोत! एवढें माझें मागणें आहे.'

**कामंदकीनें** "तथास्तु" ह्मणून त्याचें अभिनंदन केलें.

## उपसंहार.

याप्रमाणें **कामंदकीनें** अनेक मसलती करून व मोठमोठ्या युक्ति लढवून हातीं धरिलेलें काम शेवटास नेलें. ह्या कार्यास आरंभ करण्यापूर्वी **अवलोकितेनें** विचारल्यावरून—आपण प्रत्यक्ष रितीनें आपलें अंग न दाखवितां **मालती** आणि **माधव** यांचा विवाह जमवून आणणार, असा जो तिणें आपला हेतु प्रदर्शित केला होता, त्याच प्रमाणें अखेरपर्यंत तिनें आपलें वर्तन ठेविलें व **माधव** आणि **मकरंद** यांचे विवाह करून मनोरथ पूर्ण केले.

राजा **चित्रसेन, भूरिवसु** आणि त्याच्या संबंधाची इतर सर्व मंडळी ही **सुवर्णबिंदु**क्षेत्रांत होती. ती सर्व **मालती** आणि **माधव** यांच्या भेटीविषयीं फार आतुर झाली होती. **राजानें** तत्काल आपल्या चोपदाराला **कामंदकी**कडे पाठविलें, आणि **मालती, माधव, मदयंतिका, मकरंद** इत्यादिकांना लौकर घेऊन येण्याविषयीं आज्ञा दिली.

राजाच्या हुकुमाप्रमाणें चोपदार ज्या ठिकाणीं **कामंदकी, माधव** इत्यादि मंडळी होती तेथें गेला आणि त्यांस **राजाचा** हुकूम कळवून **कामंदकी**सह सर्वांना **सुवर्णबिंदु** क्षेत्रांत घेऊन आला. ऐवढ्या मोठ्या अरिष्टांतून परमेश्वरानें आपणांस पार पाडलें; याबद्दल सर्वांना अत्यंत आनंद झाला होता. **सुवर्णबिंदु**क्षेत्रांत पोंचतांच **कामंदकीनें** **मालती** आणि **माधव** व **मदयंतिका** आणि **मकरंद** या दोघां दंपत्यांला देवळांत नेऊन तेथें त्यांच्याकडून आधीं **भगवान् शंकराची** पूजा करविली; आणि त्याची प्रार्थना

करून नंतर **भूरिवसु**, राजा **चित्रसेन** व **नंदन** इत्यादि सर्व मंडळीची भेट करविली.

**माधवा**ला आपली मुलगी द्यावी, असा **भूरिवसू**चा प्रथमपासूनच संकेत होता, व तो ईश्वरकृपेनें सिद्धीस गेला याबद्दल त्याला अतिशय समाधान वाटलें. या सर्व कृत्याबद्दल त्यानें **कामंदकी**चे फारफार आभार मानले. राजा **चित्रसेनानें माधव** आणि **मकरंद** या उभयतांला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन पुत्रांप्रमाणें त्यांचें अभिनंदन केलें. **नंदन** खरोखरी अगदीं विरल्या सारखा झाला होता. **लवंगिका, बुद्धरक्षिता** इत्यादिकांनीं आपल्याला फसविलें व आपली हेटाळणी केली ही गोष्ट त्याच्या मनाला लागून राहिली होती; पण **राजा**चा कल फिरला तेव्हां त्याचा कांहीं इलाज चालला नाहीं.

खरोखर **राजा**च्या कृपेवर अवलंबून असणारे लोक आपल्या मनाला देखील स्वतंत्रता देऊं शकत नाहींत. त्यांना हर्ष, विषाद इत्यादि मनोविकार जागच्या जागीं दाबून धरावे लागतात, व पोटांत आग पेटत असली तरी वर हंसावें लागतें! बिचाऱ्या **नंदना**ची त्या दांडग्या पोरीनें तशी थट्टा केली, यामुळें त्याच्या अंगाचा तिळपापड झाला होता; तरी राजाची मर्जी **माधवा**वर प्रसन्न होतांच त्याला त्याचें अनुकरण करावें लागलें. त्यानें **मदयंतिका** आणि **मकरंद** यांचें मोठें गौरव केलें आणि झालेल्या गोष्टीपासून आपणाला मोठा आनंद झाल्याचें प्रदर्शित केलें.

नंतर राजा **चित्रसेन** यासहवर्तमान सर्व मंडळी मोठ्या समारंभानें पुनः शहरांत आली. त्या दिवशीं **राजानें**, शहरांत जिकडे तिकडे नाच , रंग, तमाशे इत्यादिकांच्या

हें पाहून, मोठा आनंद झाला. राजा **चित्रसेन**, **माधव** आणि **मालती** यांना **भूरिवसू**च्या आणि **मदयंतिका** आणि **मकरंद** यांना **नंदना**च्या घरीं पोहोंचवून, आपण राजवाड्यांत गेला. **राजाचें माधवावर** फारच प्रेम बसलें, तें केवळ **मालती**च्या संबंधानेंच असें नाहीं, तर त्याच्या आंगच्या अप्रतिम शौर्यसाहसादि गुणांला लुब्ध होऊन बसलें. त्यानें **माधव** आणि **मकरंद** यांना कांहीं दिवस आपल्या जवळ ठेवून घेऊन त्यांचा मोठा सत्कार केला.

मनाजोगता जांवई मिळाल्यानें हर्षित झालेल्या **भूरिवसूनें माधवाला** आग्रहपूर्वक ठेवून घेऊन विवाहसंबंधी सोहाळे व शिष्टाचार केले. जांवयाच्या सहवाससुखाचा लाभ अंतरणें हें त्याला इष्ट वाटत नव्हतें, तरी **माधवा**चा पिता **देवरात** यानें **माधवाला** लवकर पाठवून देण्याविषयीं आग्रह केल्यावरून **भूरिवसूनें कामंदकी**च्या अनुमतानें **मालती**सहवर्तमान **माधवाला** आपल्या घरीं पाठविण्याचा विचार केला. ज्या दिवशीं त्याची रवानगी करावयाची त्या दिवशीं अमात्य **भूरिवसूनें** मोठा मेजवानीचा थाट केला. राजा **चित्रसेन** व त्याचे इतर मोठमोठे कामदार, सरदार, मानकरी, शहरांतील मोठे मोठे विद्वान् व संभावीत लोक यांना आमंत्रण केलें होतें.

राजा व सरदार इत्यादि सर्व मंडळी **भूरिवसू**च्या घरीं प्राप्त झाली, व मोठ्या थाटानें भोजनाचा समारंभ आटपला. नंतर मोठी कचेरी करून तींत राजा **चित्रसेन**

**मकरंदा**सहवर्तमान **माधवा**ला अगदीं आपल्या जवळ घेऊन बसला. **मालती**च्या विवाहाच्यासंबंधानें इतक्या भानगडी कशा झाल्या व आंतून काय काय मसलती चालल्या होत्या, त्याविषयीं पुष्कळ लोकांना मोठें गूढ पडलें होतें, व ती सर्व हकीकत सर्वांना कळावी अशी **कामंदकी**चीही फार इच्छा होती. हें पाहून राजानें **कामंदकी**ला सर्व हकीकत सांगण्याविषयीं विनंती केली.

तेव्हां **कामंदकी** सर्व लोकांना उद्देशून ह्मणाली, 'सज्जनहो, मी ऐहिक सर्व विषयांविषयीं अगदीं निरिच्छ होऊन हा जोग घेतला आहे, हें तुह्मांला माहितच आहे. मला प्रापंचिक मनुष्यांचा सहवास देखील आवडत नाहीं, मग त्यांच्या भानगडींत पडण्याचें कसें आवडेल? असें आहे, तथापि केवळ स्नेहपाशाला बद्ध होऊन मला आपल्या भगव्या छाट्यांच्या विरुद्ध गोष्टींत मन घालावें लागलें. हा अमात्य **भूरिवसु** आणि **माधवा**चा पिता **देवरात** या दोघांच्या स्नेहाला बद्ध होऊन मी या कामांत पडलें. **मालती** आणि **माधव** यांचा विवाह होणें हें साधारणतः योग्यच होतें. तरी **देवरात** आणि **भूरिवसु** यांनीं माझ्या समक्ष जो निश्चय केला होता तो पूर्ण व्हावा असें माझ्या मनापासून होतें; पण या कामांत मध्यें अनेक अडचणी उत्पन्न होऊन **भूरिवसू**ला आपली प्रतिज्ञा पूर्ण करतां येणार नाहीं, असें वाटल्यावरून मी यांत मन घातलें.'

याप्रमाणें आजपर्यंत झालेली सर्व हकीकत सांगून **कामंदकी** ह्मणाली, 'बस्स, माझें काम झालें. जें कार्य सिद्ध होण्याकरितां मी आपल्या तपाला आणि नियमाला विघ्न करून या कामांत पडलें तें ईश्वरकृपेनें सिद्धीस गे-

त्यामुळें माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले. आतां मला आपणां सर्वांचा निरोप असावा.' असें सांगून **कामंदकीनें** राजा **चित्रसेन, भूरिवसु, नंदन** इत्यादिकांचा निरोप घेतला.

**भूरिवसू**ला ह्मणाली, 'बंधुस्नेहाला उचित असें माझ्या हातून जें कांहीं झालें तें मीं केलें, आतां मी आपल्या तपाचरणाकडे मन लावणार.'

**माधव, मकरंद, मालती,** व **मदयंतिका** यांना प्रेमपूर्वक पोटाशीं धरून तिनें त्यांना प्रेमाश्रूंनीं स्नान घातलें. **माधवा**ची हनुवटी धरून ह्मणाली, 'वत्सा **माधवा,** तूं मोठ्या नामांकित कुलांत उत्पन्न झाला आहेस, विद्या, कला यांचा उत्तम अभ्यास केला आहेस, कुलीन व मोठ्या प्रतिष्ठीत अशा मनुष्याच्या अंगीं जे गुण अवश्य असले पाहिजेत, ते सर्व तुझ्या अंगीं आहेत. भर तारुण्यांत आला आहेस. ज्या श्लाघ्य संबंधाची सर्वांना इच्छा होती तोही घडून आला आहे. आतां तूं ही आपली प्रिय पत्नी **मालती** इच्यासहवर्तमान बापाकडे जाऊन पुत्रविरहानें संतप्त झालेलें त्याचें मन शांत कर. धर्म व न्याय यांला अनुसरून मोठमोठीं कार्यें करून कीर्ति आणि संपत्ति संपादन करून आपल्या आईबापांना व इतर सर्वांना आनंद देत होत्साता सुखानें संसार कर.'

**मालती**ला कुरवाळून ह्मणाली, 'मुली, परमेश्वरानें तुजवर मोठा अनुग्रह केला आहे. प्रेमानें गळा दाटून आल्यामुळें माझ्यानें अगदीं कांहीं बोलवत नाहीं. ज्याला तूं केवळ आपल्या मनानेंच वरलेंस, तो हा तुझा प्रियपति **माधव** याला सर्व प्रकारें अनुकूळ असें वर्तन कर.

आणि आपल्या माहेरच्या व सासरच्या माणसांना व त्याबरोबरच आमच्या सारख्यांला आनंद देणारी हो.'

**मकरंदा**वरही तिचा लोभ कमी होता असें नाहीं. **मकरंद** आणि **मदयंतिका** या दोघांलाही पोटाशीं धरून **कामंदकी**नें त्यांना दोन गोष्टी सांगितल्या, आणि मोठ्या संकटानें त्यांचा निरोप घेऊन ती जाण्यास निघाली. **कामंदकी** इतकी विरक्त होती तरी स्नेहपाशानें तिला अगदीं जखडून टाकलें होतें. बाकी सर्वांनीं तिला निरोप दिला; पण **मालती** तिला मुळींच जाऊं देईना व **कामंदकी**लाही तिचा लळा तोडवेना. **मालती**च्या आईनें तिला जन्म मात्र दिलें होतें, पण अगदीं लहानपणापासून तिची नड **कामंदकी**नेंच काढली होती. यामुळें **मालती**ला आईपेक्षांही **कामंदकी** अधिक वाटत होती. **मालती** तिच्या कमरेला विळखा घालून एकसारखी रडत होती, व कांहीं केल्या तिला सोडीना, तेव्हां तिच्या समाधानार्थ **कामंदकी**नें आपल्या जाण्याची वेळ थोडी लांबविली.

वर सांगितल्याप्रमाणें सर्व शिष्टाचार झाल्यावर **भूरिवसू**नें **मालती** आणि **माधव** यांच्या रवानगीची तयारी केली. त्यानें आपल्या गुणवान् जांवयाला पुष्कळ वस्तु आंदण दिल्या. हत्ती, घोडे, दास, दासी, रत्न, अलंकार, वस्त्र प्रावरण इत्यादि उत्तम उत्तम पदार्थ देऊन मुलीचें गौरव केलें. ज्योतिष्यांनीं सायंकाळीं मुहूर्त काढिला होता, त्याप्रमाणें मोठ्या थाटामाटानें वरात निघाली. **मालती**सहवर्तमान **माधवा**ला मोठ्या हत्तीवर रत्नखचित अंबारींत बसविलें. **मालती**ची जिवलग मैत्रीण

**लवंगिका** हिला मोठ्या आग्रहानें तिनें आपल्याबरोबर घेतली, व तीही तिच्या प्रेमपाशाला बद्ध होऊन जाण्यास तयार झाली. **मालतीनें** या वेळीं तिला अगदीं आपल्या जवळ अंबारींत घेतली होती.

**माधवाच्या** मागें **मकरंद** व **मदयंतिका** हीं उभयतां दुसऱ्या अंबारींत बसून निघालीं. **कामंदकी**ची शिष्यीण **बुद्धरक्षिता** हिच्यावर **मदयंतिके**चें फारच प्रेम होतें. तिला बरोबर घेतल्याशिवाय आपण जाणार नाहीं, असा तिनें हट्ट घेतला होता. **बुद्धरक्षिता** वयानें लहान होती तरी तिनें संसाराचा त्याग करून जोग घेतला होता. ती **कामंदकी**ची शिष्यीण असल्यामुळें तिच्या ताब्यांतली होती. तिला **मदयंतिके**बरोबर जाणें योग्य नव्हतें, तरी तिच्या आग्रहावरून **कामंदकीनें** **बुद्धरक्षिते**ला जाण्याविषयीं आज्ञा दिली, व त्याप्रमाणें ती **मदयंतिके**बरोबर जाण्यास निघाली.

राजानें **माधवा**बरोबर स्वार शिबंदी वगैरे बरेच लोक दिले. **भूरिवसु** व त्याची स्त्री यांनीं **मालती**ला सासरीं कसें वागावें सवरावें हें सांगून मोठ्या संकटानें निरोप दिला. स्वतः राजा **चित्रसेन** व **भूरिवसु** आणि **नंदन** व इतर सरदार वगैरे लोक फार दूरवर ही वरात पोंचविण्यास गेले. शेवटीं आप्तसंबंधी वगैरे पोंचवायास आलेल्या मंडळींनीं—वाटेंत प्रथम जी नदी आडवी लागेल तिच्या पुढें जाऊं नये असा संप्रदाय असल्यावरून, **भूरिवसु** व राजा **चित्रसेन** हे मोठ्या संकटानें मागें फिरले. याच गडबडींत **कामंदकी**ही आपली शिष्यीण **अवलोकिता** हिला बरोबर घेऊन तेथून निघाली ती थेट **श्रीपर्वता**वर गेली.

**माधव** मोठ्या समारंभानें सावकाश सावकाश **मालती** व **मकरंद** यांसहवर्तमान विश्रांति घेत घेत आपल्या पित्याच्या भेटीकरितां निघाला, तो **कुंडिनपुरा**च्या जवळ जवळ येऊन पोहोंचला. आपला पुत्र विजयी होऊन स्त्रीसहवर्तमान येत आहे हें ऐकून **माधवा**चा बाप **देवरात** ह्याला फार आनंद झाला. **कुंडिनपूर**च्या राजाला हें वर्तमान कळल्यावरून तोही फार खुष झाला. राजाच्या आज्ञेवरून मोठमोठे सरदार व मानकरी लोक व स्वतः **देवरात** पुत्राला भेटण्याकरितां सामोरा आला. पितापुत्रांच्या प्रेमपूर्वक भेटी झाल्या. **देवराता**नें आपल्या आवडत्या सुनेचें मोठें गौरव केलें. तसेंच **मकरंद** आणि **मदयंतिका** यांचेंही अभिनंदन करून सर्व मंडळी समारंभानें शहरांत आली.

**राजा**नें आज्ञा केल्यावरून त्या दिवशीं **कुंडिनपुरां**त सर्वत्र मोठा उत्सव झाला. **देवरात** व त्याची स्त्री व तसेच **मकरंदा**चे आईबाप यांना किती आनंद झाला असेल याचें वर्णन करितां येणार नाहीं. याप्रमाणें विद्यार्थिदशेंत असतांना जो संकल्प केला होता तो पूर्ण झाल्यामुळें **देवराता**ला मोठें समाधान वाटलें, व गुणवान् पुत्र व गुणवती सून यांच्या योगानें त्याला आपला संसार स्वर्गसुखापेक्षांही अधिक प्रिय वाटला.

**माधव** विद्येनें व गुणांनीं सर्व प्रकारें योग्य आहे, असें पाहून **राजा**नें हळू हळू त्याला दरबारच्या कामांत घेतलें व **देवरात**ही मुद्दाम राज्यकारभाराचीं कामें हळू हळू त्याच्यावर सोपवूं लागला. लवकरच तो मुख्य प्रधान होण्याला योग्य झाला, असें पाहून **देवराता**नें राजाला विनंती करून

आपलें काम **माधवाच्या** हातीं देवविलें व आपण विशेष प्रसंगीं त्याला सल्लामसलत देऊं लागला. याप्रमाणें **माधव कुंडिनपूरच्या** राज्याचीं सूत्रें हातांत घेऊन राज्य-कारभार उत्तम प्रकारें चालवूं लागला व लवकरच त्या कामांत त्याणें आपलें इतकें प्राविण्य दाखविलें कीं, **देवरा-तापेक्षांही** लोक त्याची तारीफ करूं लागले. याप्रमाणें **माधव** आपला सन्मान्य पिता **देवरात** व मातुश्री व प्रियपत्नी **मालती** व जिवलग मित्र **मकरंद** यांसहवर्तमान मोठ्या आनंदानें सर्व सौख्याचा उपभोग करीत होत्साता आपली कीर्ति चोहोंकडे स्थापन करिता झाला.

**समाप्त.**

# पोतदारांचीं

## अतिस्वस्त शालोपयोगी व इतर पुस्तकें

### ह्यांविषयीं महत्वाची सूचना.

पोतदारांचीं सर्व प्रकारचीं शालोपयोगी व इतर पुस्तकें विक्रीस तयार आहेत. टपालखर्चसुद्धां रोख पैसा पाठविला असतां पुस्तकें तावडतोब रवाना करूं किंवा 'व्हॅल्युपेएबल पार्सल' नें मागविलीं असतां तशीं पाठवूं. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' नें मागविलीं असतां बंगीवर जो किमतीचा आंकडा लिहिला असेल तो पाहून तितके पैसे टपालांत भरले ह्मणजे झालें. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' बद्दल मनी आर्डरचा जो खर्च, तोच सरकार घेतें. वाटेल त्या रीतीनें पुस्तकें मागवावीं. पुस्तकें उधार पाठविलीं जाणार नाहींत. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' मागविलें असतां तें परत घेतलें जाणार नाहीं. अगोदरच विचार करून 'व्हॅल्युपेएबल पार्सल' मागवावें. तें परत आलें असतां त्याचा कायदेशीर रीतीनें बंदोबस्त करतां येतो. याकरितां अगोदरच खबरदारी घेतली तर बरें. 'बुकपोस्टा'नें बंगी पाठविली असतां ती रजिस्टर करीत जाऊं. रजिस्टर करण्याबद्दल दोन आणे चार्ज जास्त पडेल. रजिस्टर न करितां तशींच पाठवा असें लिहून आल्यास ती गहाळ झाली असतां त्याची जबाबदारी आम्हांवर नाहीं.

**विशेषसूचना**—पोतदारांचीं शालोपयोगी पुस्तकें फारच स्वस्त, सुबक, लहान मुलांस फारच उपयुक्त, लोकप्रिय व सुलभ अशीं असल्याबद्दल सर्वत्र प्रसिद्धि आहे. पुस्तकांचा कागद व छापणी हीं विशेष मोहरेदार असतात. सारांश, जेणेंकरून विषयाची दुर्बोधता घालवून सुबोधता आणवेल व पुस्तकें शाळांतील मुलांस अत्युपयोगी होतील अशी तजवीज केली आहे. पुस्तकांच्या किमतीच्या स्वल्पतेनें तर सर्व पुस्तकांस हटविलें आहे. एकदम पुष्कळ पुस्तकें घेणाऱ्या व्यापाऱ्यास भरपूर कमिशन मिळेल. कमिशनचे दर व पुस्तकांच्या वगैरे माहिती करितां अर्धा आण्याचें तिकिट पाठविलें असतां आमचा छापी क्याटलाग पाठवून देऊं.

# बृहत्कथासागर.

प्रसिद्ध महाकवि श्रीगुणाढ्य यांनीं केलेल्या बृहत्कथा नांवाच्या ग्रंथाच्या आधारानें हें पुस्तक तयार केलें आहे. यांत सुमारें दोनहजार वर्षांपूर्वीं आपल्या देशांत राजकीय स्थिति, धर्मसंबंधानें लोकांच्या समजुती, सामाजिकस्थिति व विद्येचा प्रसार वगैरे गोष्टी कशा व कोणत्या स्थितींत होत्या तें, अनेक मनोरंजक व नीतिपर निरनिराळ्या कथांच्या द्वारें व्यक्त केलें आहे. सारांश मनाची करमणूक होऊन नीतिमार्गाकडे त्याची प्रवृत्ति होण्यास व अनेक विषयांची माहिती होण्यास आणि पूर्वींची आपल्या देशाची स्थिति समजण्यास या पुस्तकासारखें उपयुक्त दुसरें कोणतेंही नाहीं. प्रत्येकाचीं सुमारें चारशें पृष्ठें होतील असे त्याचे एकंदर दहा भाग केले आहेत. पहिला भाग विक्रीस तयार आहे.

**भाग पहिला । किं. २। रु. ट. ख. ३ आणे.**

**भाग दुसरा (छापत आहे). किं. २। रुपये.**

---

## पोतदारांची शालोपयोगी पुस्तकमाला.

| नं०. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| १ | अंकगणित (पोतदारांचें, आवृत्ति १४वी | ६ | ० |
| २ | मोडीवाचनसार भाग पहिला ... ... | ३ | ० |
| ३ | मोडीवाचनसार भाग दुसरा ... ... | ३ | ० |
| ४ | मोडीवाचनसार भाग तिसरा ... ... | ५ | ० |
| ५ | मोडीवाचनसार भाग चौथा ... ... | ७ | ० |
| ६ | मुंबई इलाख्याचें संक्षिप्त वर्णन ... | ० | ९ |
| ७ | हिंदुस्थानाचें संक्षिप्त वर्णन. ... ... | १ | ० |
| ८ | एशिया व यूरोप खंडांचें संक्षिप्त वर्णन. | १ | ० |
| ९ | आफ्रिका व अमेरिका खं० सं० वर्णन | १ | ६ |
| १० | महाराष्ट्रदेशाच्या इतिहासाचें सं० वर्णन | १ | ६ |
| ११ | हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहास (इतिहाससार) ... ... | २ | ६ |
| १२ | चित्रबोध भाग १ला पृष्ठें ५२ चित्रें १८६ | १ | ० |
| १३ | चित्रबोध भाग दुसरा ... ... | १ | ० |
| १४ | बालज्ञानसुधा (नवीन धुळाक्षर.) ... | १ | ६ |
| १५ | गद्यपद्यार्थ बोध भाग १ला व २रा (एकत्र) अथवा मराठी १ ल्या व २ऱ्या पु० कठिण श० अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण. | २ | ० |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| १६ | गद्यपद्यार्थ बोध भाग ३ रा अथवा मराठी ३ ऱ्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण ... ... | ३ | ० |
| १७ | गद्यपद्यार्थबोध भाग ४ था अथवा मराठी ४ थ्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण ... ... | ४ | ० |
| १८ | गद्यपद्यार्थबोध भाग ५ वा अथवा मराठी ५ व्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण ... ... | ८ | ० |
| १९ | हॉ० इं० पहिल्या पुस्तकांतील फक्त शब्दार्थसंग्रह. ... | १ | ० |
| २० | हॉ० इं० प० पुस्तकांतील शब्दार्थ व भाषांतर टीपांसह | २ | ६ |
| २१ | हॉ० इं० दु० पुस्तकांतील शब्दार्थ फ्रेजिससह ... ... | २ | ६ |
| २२ | हॉ० इं० सेकंड बुक सेकंड पार्टांतील शब्दार्थ फ्रेजिससह | ४ | ० |
| २३ | हॉ० इं० ति०पु० शब्दार्थ फ्रेजिससह | १० | ० |
| 24 | A Glossary of Sandfordand Merten ... | 8 | 0 |
| २५ | रॉयलप्रायमर पुस्तकाचें सार्थस्पष्टीकरण ... ... | २ | ० |
| २६ | रॉयलरीडर नंबर१चे शब्दार्थ फ्रेजिससह | २ | ३ |
| २७ | रॉयलरीडर नंबर२चे शब्दार्थ फ्रेजिससह | ३ | ६ |
| २८ | रॉयलरीडर नंबर३चे शब्दार्थ फ्रेजिससह | ४ | ६ |
| २९ | रॉयलरीडर नंबर४चे शब्दार्थ फ्रेजिससह | ६ | ० |
| ३० | सिक्कल टु रॉयलरीडर नं० १ चे शब्दार्थ | २ | ६ |
| ३१ | सिक्कल टु रॉयलरीडर नं० २ चे शब्दार्थ | ३ | ६ |
| ३२ | सिक्कल टु रॉयलरीडर नं०३ चे श०फ्रेजिससह ... ... | ४ | ६ |
| ३३ | सिक्कल टु रॉयलरीडर नं०४ चे श०फ्रेजिससह ... ... | ५ | ० |
| ३४ | मुंबईइलाख्यांतील सरकारी मोडी १ ल्या पुस्तकांतील शब्दार्थ व कवितान्वयार्थ ... ... | १ | ० |
| ३५ | ,, सरकारी मोडी २ ऱ्या पुस्तकांतील शब्दार्थ ... ... | १ | ० |
| ३६ | ,, सरकारी मोडी ३ ऱ्या पुस्तकांतील शब्दार्थ ... ... | १ | ६ |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| 37 | A Hand-Book for young Students ... | 0 | 9 |
| ३८ | सर्व देशी व विलायती चालीच्या कोष्टकांचें पुस्तक ... | ० | ९ |
| ३९ | मार्कबुक, सर्व मराठी व इंग्रजी शाळांत चालणारें ... | ० | ६ |
| ४० | लेखनदीपिका अथवा मराठी शुद्ध लिहिण्याचे सोपे नियम | १ | ० |
| ४१ | व्याकरणबोध ... | २ | ० |
| ४२ | मराठी शब्दरूपावलि व धातुरूपावलि | १ | ६ |
| ४३ | सुबोधव्याकरण ... | ४ | ० |
| ४४ | वाक्यमीमांसा (प्रो० आगरकरकृत) ... | ९ | ० |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| | भाषांतराकरितां उतारे. | | |
| ४५ | चवथे इयत्तेकरितां | ३ | ० |
| ४६ | पांचवे „ ... | ७ | ० |
| ४७ | सहावे „ ... | ८ | ० |
| ४८ | सातवे „ ... | ९ | ० |
| ४९ | धुळाक्षर शेंकडा १॥ दीड रुपया प्रत्येकास किंमत ... | ० | ६ |
| ५० | कित्ते मोडी नं० १ पासून नं० ६ पर्यंत व कित्ते बालबोध शेंकडा १॥ रु. दर कित्यास ... | ० | ६ |

धुळाक्षर व कित्ते शेंकड्यावर घेणारास वेगळें कमिशन नाहीं.

## मनोरंजक व नीतिपर पुस्तकें.

| नं० | पुस्तकांचीं नांवें. | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|
| १ | जर्मन भाषेंतील सुरस गोष्टी भाग १ | ० | १४ | ० |
| २ | जर्मन भाषेंतील सुरस गोष्टी भाग २... ... | १ | २ | ० |
| ३ | सुशिक्षितस्त्री. ... | ० | १० | ० |
| ४ | सुंदरी आणि वसंतसेन भाग १ (मूळ हिंदीभाषेंतील एका गोष्टीवरून रचिलेलें.) ... | ० | ४ | ० |
| ५ | सुंदरी आणि वसंतसेन भाग २ (सदरप्रमाणें.) ... | ० | ६ | ० |
| ६ | यशवंत विजया नाटिका. ... | ० | ४ | ० |
| ७ | सुंदराबाई (एक चटकदार गोष्ट.) | ० | १ | ० |
| ८ | चातुर्य रत्नावलि भाग १. ... | ० | ० | ६ |
| ९ | चातुर्य रत्नावलि भाग २. ... | ० | ० | ६ |
| १० | चातुर्य रत्नावलि भाग ३. ... | ० | ० | ६ |
| ११ | चातुर्य रत्नावलि भाग ४. ... | ० | ० | ६ |
| १२ | विचारमाला उपदेशपरवाक्यें ... | ० | ० | ६ |

# पोतदारांचीं धर्मविषयक पुस्तकें.

खालीं लिहिलेलीं पुस्तकें चांगलीं शुद्ध करून सुंदर टैपानें सफाईदार जाड कागदावर आह्मीं छापविलीं आहेत.

| नं०. | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| १ | शिवलीलामृत, पदच्छेद करून शुद्ध केलेली व कठिण शब्दांवर टीपा देऊन मोठ्या टैपानें उत्तम ग्लेज व जाड कागदावर छापलेली पोथी ... | १२ | ० |
| २ | आरतीसंग्रह (आरती संख्या ३१०) पदच्छेद करून शुद्ध केलेली आवृत्ति ३ री ... ... | १२ | ० |
| ३ | भूपाळ्या संग्रह (भूपाळ्या संख्या ८६) | ३ | ० |
| ४ | बालहितोपदेशिका सुधारून वाढविलेली आवृत्ति दुसरी. लहान मुलांचे फारच उपयोगी ... | ३ | ६ |
| ५ | शब्दरूपावलि, अव्यय व समासविचार एकत्र ... | ३ | ० |
| ६ | शनिमाहात्म्य सांचा मोठा व जाड टाइप | २ | ६ |
| ७ | एकादशी माहात्म्य सुधारलेलें ,, ... | २ | ० |
| ८ | सत्यनारायण कथा प्राकृत ओंवीबद्ध शुद्ध केलेली ... | २ | ० |
| ९ | व्यंकटेशस्तोत्रओंव्या | १ | ० |
| १० | करुणामृतस्तोत्र ,, | १ | ० |
| ११ | रामदासकृत मनाचे श्लोक ... ... | १ | ० |
| १२ | शनिमाहात्म्य लहान टाइप उत्तम छापलेलें बुक (ओंव्या) | १ | ० |
| १३ | आशौचनिर्णयसंस्कृत | १ | ० |
| १४ | पालीची कारिका ... | १ | ० |
| १५ | विष्णुसहस्रनाम मूल. | १ | ० |
| १६ | धावे संख्या ६० ... | १ | ० |
| १७ | सावित्री आख्यान ओंव्या ... ... | १ | ० |
| १८ | गयासुरआख्यान ,, | १ | ० |
| १९ | श्रीदत्तजन्म ,, ... | १ | ० |
| २० | संगीत पद्यावलि (नवीन) ... ... | १ | ० |
| २१ | संस्कृत सत्यनारायण पूजा व कथा (सुधारलेली) ... | १ | ० |
| २२ | पांडुरंगस्तोत्र ओंव्या. | १ | ० |
| २३ | चक्रविभु ,, ... | १ | ० |
| २४ | प्रश्नावलि (गर्गाचार्यकृत) ... ... | १ | ० |
| २५ | पाळणे (संख्या ३०) | १ | ० |
| २६ | मनोरंजक स्त्रीगीत . | १ | ० |
| २७ | प्रातःस्मरण मोठें ... | १ | ० |
| २८ | सुदामचरित्र (सुधारलेलें) ... ... | १ | ० |
| २९ | तुळसी आख्यान ... | १ | ० |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| ३० | स्वप्नाध्याय (प्राकृत अर्थासह शुद्ध केलेला) | १ | ० |
| ३१ | अगंदशिष्टाई प्रकार १ ला | १ | ० |
| ३२ | अगंदशिष्टाई प्रकार २ रा | १ | ० |
| ३३ | दामाजीपंताचें चरित्र | १ | ० |
| ३४ | सोळा सोमवार कथा ओंव्या | १ | ० |
| ३५ | मारुतिजन्म ओंव्या | १ | ० |
| ३६ | गर्भावळी (गर्भकांड ओंव्या) | १ | ० |
| ३७ | समासचक्र | १ | ० |
| ३८ | समासचंद्रिका | १ | ० |
| ३९ | शब्दरूपावलि संस्कृत | १ | ० |
| ४० | बावनश्लोकी गुरुचरित्र ओंव्या | ० | ९ |
| ४१ | शिवकवच | ० | ९ |
| ४२ | शिवमहिम्नस्तोत्र | ० | ९ |
| ४३ | राममंत्राचे श्लोक | ० | ९ |
| ४४ | ज्ञानदेवकृत हरिपाठ | ० | ९ |
| ४५ | एकनाथकृत हरिपाठ. | ० | ९ |
| ४६ | चोविसनामाचे अभंग | ० | ९ |
| ४७ | नित्यपाठाचे अभंग. | ० | ९ |
| ४८ | शिवपाठाचे अभंग. | ० | ९ |
| ४९ | तुकारामकृत हरिपाठ | ० | ९ |
| ५० | गुरुपाठाचे अभंग | ० | ९ |
| ५१ | कबिराचीं पदें | ० | ९ |
| ५२ | पोतदारकृत नवीन संगीत आरत्या | ० | ६ |
| ५३ | जीवितस्तोत्र | ० | ६ |
| ५४ | रामरक्षा | ० | ६ |
| ५५ | ध्रुवाख्यान | ० | ६ |
| ५६ | द्रौपदीवस्त्रहरणाचे अभंग | ० | ६ |
| ५७ | एकाक्षरी श्लोक | ० | ६ |
| ५८ | तुकारामकृत स्वर्गारोहणाचे अभंग | ० | ६ |
| ५९ | संस्कृत तुळसीमाहात्म्य | ० | ६ |
| ६० | शिवापराधक्षमापन स्तोत्र | ० | ६ |
| ६१ | ज्योतिर्लिंग स्तोत्र. | ० | ६ |
| ६२ | गुरुदत्त पंचक | ० | ६ |
| ६३ | गणपतीचे श्लोक | ० | ६ |
| ६४ | शिवस्तुति | ० | ६ |
| ६५ | लक्ष्मीस्तोत्र संस्कृत | ० | ६ |
| ६६ | मारुतिस्तोत्र व भीमाष्टक | ० | ६ |
| ६७ | गणपतिस्तोत्र ओंव्या | ० | ६ |
| ६८ | मिराबाई चरित्राचे अभंग | ० | ६ |
| ६९ | स्थालीपाकाचे अभंग | ० | ६ |
| ७० | दुर्गास्तोत्र ओंव्या | ० | ३ |
| ७१ | चर्पटपंजरी | ० | ३ |
| ७२ | शिवरक्षा | ० | ३ |
| ७३ | देव्यपराधक्षमापनस्तोत्र | ० | ३ |
| ७४ | शिवमानसपूजा | ० | ३ |
| ७५ | शिवतांडवस्तोत्र | ० | ३ |
| ७६ | नवग्रहस्तोत्र | ० | ३ |
| ७७ | ज्वरस्तोत्र | ० | ३ |
| ७८ | संकष्टनाशनस्तोत्र | ० | ३ |
| ७९ | दत्तात्रेयस्तोत्र | ० | ३ |
| ८० | गोविंदाष्टक | ० | ३ |
| ८१ | गंगाष्टक | ० | ३ |
| ८२ | नर्मदाष्टक | ० | ३ |
| ८३ | अन्नपूर्णाष्टक | ० | ३ |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| ८४ | सूर्यस्तुति... ... | ० | ३ |
| ८५ | रामस्तुति ... ... | ० | ३ |
| ८६ | नारायणस्तोत्र ... | ० | ३ |
| ८७ | शनिस्तोत्र ... | ० | ३ |
| ८८ | कालभैरवाष्टक ... | ० | ३ |
| ८९ | मणिकर्णिकाष्टक ... | ० | ३ |
| ९० | बिंदुमाधवाष्टक ... | ० | ३ |
| ९१ | गजेंद्रमोक्ष प्राकृत. | ० | ३ |
| ९२ | लक्ष्मीस्तोत्र प्राकृत. ... ... | ० | ३ |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| | स्त्रीपुरुषांनीं एकमेकांचीं नांवें घेण्याची पद्धत आणि मनोरंजक उखाणे व ह्मणी. | | |
| ९३ | भाग १. ... ... | ० | ३ |
| ९४ | भाग २. ... ... | ० | ३ |
| ९५ | भाग ३. ... ... | ० | ३ |
| ९६ | भाग ४. ... ... | ० | ३ |
| ९७ | हरिहराष्टोत्तरशतनामावलीस्तोत्र. ... | ० | ३ |

## प्राकृत ग्रंथ व पुस्तकें विक्रीस तयार.

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| सिद्धांतबोध ... ... | ६ | ० |
| भक्तलीलामृत ... ... | ५ | ० |
| ज्ञानेश्वरी ... ... | ४ | ८ |
| संतविजय ... ... | ४ | ० |
| नवनाथ भक्तिसार ... | ४ | ० |
| नवनाथ भक्तिसार ... | ३ | ० |
| एकनाथी भागवत ... | ५ | ० |
| पांडवप्रताप ... ... | ४ | ० |
| पांडवप्रताप ... ... | ३ | ० |
| पांडवप्रताप ... ... | २ | ० |
| भक्तविजय ... ... | ३ | ८ |
| भक्तविजय ... ... | २ | ८ |
| रामविजय ... ... | ३ | ० |
| रामविजय फळ्या व वेष्टणासह ... ... | २ | ० |
| रामविजय साधा ... | १ | ८ |
| रामाश्वमेध ... ... | ३ | ० |
| हरिविजय कागद ग्लेज | २ | ८ |
| हरिविजय कागद जाड व शब्दकोश ... ... | २ | ० |
| हरिविजय दुसरा ... | १ | ८ |
| हरिविजय बुक ... ... | १ | ६ |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| संतलीलामृत ... ... | २ | ० |
| संतलीलामृत ( बुक ) ... | १ | ६ |
| नाथलीलामृत ... ... | २ | ० |
| दासबोध ... ... ... | २ | ० |
| दासबोध दुसरा ... | १ | १२ |
| दासबोध (पु० बांधलेलें) | १ | १२ |
| कथासारामृत ... ... | ३ | ० |
| जैमिनीअश्वमेध ... | २ | ६ |
| जैमिनीअश्वमेध (बुक) ... | २ | ६ |
| श्रीगुरुचरित्र मोठें ... | ३ | ० |
| श्रीगुरुचरित्र लहान ... | १ | १० |
| श्रीगुरुचरित्र गुटका ... | २ | ० |
| काशीखंड ... ... | ४ | ८ |
| काशीखंड ... ... | ३ | ४ |
| शिवलीलामृत रेशमी बांधलेलें चित्रांसह ... | ० | ८ |
| शिवलीलामृत रेशमी गुटका ... ... | ० | ७ |
| गणेशलीलामृत सुटी पोथी | ० | ८ |
| " रेशमी बांधलली ... | ० | १२ |
| पंढरीमाहात्म्य पोथी अध्याय ३१ ... ... | ० | १२ |